# प्राचीन
# मराठी गद्य

संपादक
डॉ. शं. गो. तुळपुळे, एम्. ए., पीएच्. डी.
मराठीचे अध्यापक
राणी पार्वतीदेवी कॉलेज, बेळगांव

व्हीनस बुक स्टॉल : पुणे २

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

प्राचीन मराठी वाङमय प्रामुख्यानें पद्यमय असले तरी त्यातील गद्य उपेक्षणीय खचित नाही. त्याचें स्वरूप मात्र पद्याहून कांहीसे भिन्न आहे. एकंदरींतच पद्य हें कल्पनारम्य, तर गद्य हे वास्तव किंबहुना व्यावहारिक असते असा सर्वसाधारण नियम आहे प्राचीन मराठी साहित्य या नियमास अपवाद नाही. त्यातील गद्यकारांत ज्ञानेशमुक्तेशांच्या प्रतिभेची भरारी आढळत नसली तरी प्राक्कालीन महाराष्ट्राच्या सामाजिक मनाचा ठाव घेण्याच्या कामांत कोणताहि पद्यकार त्यांची बरोबरी करूं शकणार नाही. हें प्राचीन गद्य म्हणजे महाराष्ट्राचा जणु चालताबोलता इतिहासच आहे. मराठी मनाचीं सुखदु:खें, त्याचे रागलोभ, आशा-आकांक्षा ही सर्व त्यांत जशींच्या तशीं उमटली आहेत. स्वकालाचें यथार्थ दर्शन घडविण्याचें जें कार्य वामन-मयूरासारख्या शब्दसृष्टीच्या ईश्वरानाहि जमलें नाहीं तें एखादा रघुनाथ यादव आपल्या कलमाच्या अवघ्या दोनचार फटकाऱ्यात साधू शकतो हा त्या गद्याचा मोठाच विजय म्हटला पाहिजे. प्राचीन पद्याच्या मानानें या गद्याची उंची कदाचित् कमी भरेल, परंतु त्याचा व्याप मोठा असून त्याचें सर्वस्पर्शित्व असाधारण आहे यांत कांहींच शका नाही.

उपर्युक्त प्राचीन मराठी गद्याचें प्रथम दर्शन आपणास म्हैसूरप्रांतीं श्रवण-बेळगोळसारख्या महाराष्ट्रापासून अति दूर अशा ठिकाणी घडावें हा एक योगायोगच म्हटला पाहिजे. शके ९०५ मधील श्रवणबेळगोळचा शिलालेख हा आद्य मराठी लेख म्हणून सर्वमान्य होण्यास हरकत नाहीं. ज्या भव्य अशा शिल्पाच्या पायथ्याशीं तितकीच भव्य अशी ही मराठी 'श्री ' खोदली आहे तो गोमतेश्वराचा पुतळा आज हजार वर्षें सर्वांचें अहोरात्र स्वागत करीत तसाच उभा आहे (क्र १). पाटण शिलालेखाचें महत्व ऐतिहासिक व सामाजिक असें दुहेरी असून प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य यांच्या वंशावर या लेखानें चांगलाच प्रकाश पडतो (क्र.२). तासगांव ताम्रपटांत येणारीं

'वाल्गवाड' आणि 'हधिनौर' ही दोन ग्रामनामें उघड कन्नड वळणाचीं असून १३ व्या शतकांत साताऱ्याच्या दक्षिण सीमाप्रांतांत कानडी भाषा अवशेषरूपाने वावरत असल्याची ही एक साक्षच होय (क्र. ३). पंढरपूर येथील विठ्ठल-मंदिराच्या जीर्णोद्धारप्रसंगाने निर्माण झालेल्या व पाढरीफडमुख्य प्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीरामदेवराव यादव आणि त्याचा विद्वान् करणाधिप हेमाद्रि यांच्या भागवतनिष्ठेचें सूचक अशा 'चौऱ्यांयशी' च्या शिलालेखाचें मोल इतिहासास केवढें आहे हें निराळें सांगणें न लगे (क्र ४). यादवांच्या धर्मनिष्ठ राजकीय परंपरेची ओळख करून देणारे म्हणून वेळापूरचें शिलालिखितहि महत्वाचें आहे (क्र ५). वरील सर्व लेख शके ९०५ ते शके १२२२ मधील म्हणजे स्थूलमानानें यादवांच्या काळांतील आहेत. त्यांतील भाषा संस्कृतमिश्रित मराठी व लिपी देवनागरी आहे; मोडी नाहीं. चौदाव्या शतकाच्या अखेरपर्यंत मोडी लेख उपलब्ध होत नाही हें कै. राजवाड्यांचें म्हणणें या दृष्टीनें चिंतनीय आहे. राजवाडे[1] म्हणतात त्याप्रमाणें मोडी लिपीचा फारसींतील 'शिकस्ता' पद्धतीशी व हेमाडपंताच्या नांवाशी संबंध असो वा नसो, मोडी लिपी कांहींशी उत्तरकालीन आहे हें निश्चित. असो. वरील शिलालेखांशिवाय याच काळांतील आणखी पांचपंचवीस लेख उपलब्ध असून ते पळसदेव, सावरगांव, तेर, परळ, देऊळगांव, खोलेश्वर, नेवासें, उनकेश्वर, नागांव इत्यादि गांवीं म्हणजे साऱ्या महाराष्ट्रभर विखुरलेले आहेत. एक बाब विचारणीय वाटते. तेर, गोमंतक, मंडळ, चिक्कबागेवाडी व मंगळवेढें या पाच ठिकाणच्या कांही लेखांतून भाषा मराठी तर लिपी कानडी, व भाषा कानडी तर लिपी देवनागरी असा प्रकार दिसून येतो. याचा अर्थ एक तर यादवकालीन महाराष्ट्राच्या सीमा आजच्याहून भिन्न तरी असाव्या, किंवा पंढरीच्या वाळवंटांत एका भागवतधर्माच्या छत्राखालीं मराठी आणि कानडी या दोन संस्कृति एकवटून तरी गेल्या असाव्या. तें कसेहि असो, वरील सर्व लेख मिळून यादवकालीन राष्ट्राचें विविध दर्शन घडवितात यांत कांही संशय नाहीं. त्यांत देशाचा इतिहास, भूगोल, दान, धर्म, शासनरीति, उद्योग, व्यापार सर्वकांही प्रतिबिंबित आहे. हे लेख जीर्ण, तुटकेफुटके,

१. ऐतिहासिक प्रस्तावना, खं. ८, पृ. ३७३–८.

व भाषादृष्टया अशुद्ध वा अपभ्रष्टहि असतील; पण संशोधकाच्या दृष्टीनें त्यांचे हे दोषच गुणवत् ठरून तें इतिहासाचें अक्षर असें साहित्य होऊन बसतें.

पण संशोधकांस अमोल वाटणारा शिलाताम्रलेखांचा हा ठेवा रसिकांचें समाधान करूं शकणार नाही. त्यांच्यासाठीं कांहीं रसात्मकच हवें व तें पुरविण्यास महानुभाव गद्यकार सिद्ध आहेत. चरित्र, आठवणी, दिनचर्या, तत्त्वचर्चा, दृष्टांतपाठ इत्यादि साहित्याच्या नानाविध प्रकारांनीं संपन्न असे हें यादवकालीन गद्य क्वचित् प्रसंगीं रसाळपणांत पद्यासहि मागें टाकतें. जें काही लिहावयाचें तें स्त्रीशूद्रादि सर्वांना सुलभ व्हावें म्हणून मराठींतच लिहावें असा या पंथाचा संकेत होता व त्यानुसार ही अमोल अशी गद्यनिर्मिति त्यानें केली. केसोबासानी उद्धरण-प्रकरण संस्कृतमध्यें रचण्याची इच्छा व्यक्त केल्यावरून " नको गा केशवदेया, येणें माझिया म्हातारिया नागवतील " असें म्हणून नागदेवाचार्यांनीं त्यांस संस्कृत रचनेकडून परावृत्त केल्याचें प्रसिद्धच आहे ( स्मृतिस्थळ, १५ ). अन्य प्रसंगी केसोबासांनीं संस्कृतमध्ये प्रश्न केल्यावरून नागदेवाचार्य त्यांना स्पष्टपणें म्हणाले, " पंडिता केशवदेया, तुमचा अस्मात् कस्मात् मी नेणें गा। मज श्रीचक्रधरें निरूपिली मऱ्हाटी तियाचि पुसा " ( स्मृ. ६६ ). महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर यांनीं स्वतः एक ओळहि लिहिलेली नाहीं. त्यांच्या अनुयायांनी मात्र ' सर्वज्ञां ' ची भावना ध्यानांत घेऊन ' मार्गासि उपयोगा जाईल ' या बुद्धीनें त्यांचें बोलणें ' काळाक्षरीं प्रतिपन्न ' करून ठेवले. " शास्त्र घेइजे, घोकिजे, मग काळेंकरूनि उपयोगा जाए " असा खुद्द चक्रधराचा सिद्धांत होता, व त्यास अनुसरून प्रथम म्हाइंभटांनीं इ. स. १२७६ च्या सुमारास सर्वज्ञांच्या ' लीळाचरित्रा ' ची रचना केली. या कामीं या आद्य मराठी चरित्रकारानें अति श्रम घेतलेले दिसतात. ' स्मृतिस्थळ ' कार लिहितात, " खेइभट कृषी करावेया जाति, त्यांसरिसे म्हाइंभटहि जाति । खेइभट कृषीकर्म करिती, आणि म्हाइंभट तया मागां मागां गोसावियांचिया लीळा पुसति । खेइभटु साधति, म्हाइंभट नमस्करूनि घेति " ( स्मृ. १४० ). याप्रमाणें एकेक आठवणीची अक्षरशः भीक मागून म्हाइंभटांनीं प्रथम श्रीचक्रधरांचें ' लीळाचरित्र ' व पुढें श्रीगोविंद-प्रभूचें ' ऋद्धिपूरचरित्र ' सिद्ध केलें. नरेंद्र आणि परशराम या दोघांनीं

मिळून इ. स. १३१८ च्या सुमारास रचिलेला ' स्मृतिस्थळ ' हा ग्रंथहि याच धर्तीचा असून त्यांत पंथाचे आद्याचार्य नागदेव किंवा भटोबास याचें चरित्र आठवणींच्या रूपाने आलें आहे. 'स्मृतिस्थळा'चा आणखी एक विशेष हा, की त्यांत आघाडीच्या महानुभाव ग्रंथकारांची माहिती मिळते व त्यामुळें हा ग्रंथ वाङमयेतिहासदृष्टयाहि बहुमोल ठरतो 'लीळाचरित्र' 'गोविंदप्रभुचरित्र ' व 'स्मृतिस्थळ ' हे तीनहि ग्रंथ स्थूलमानानें समस्वरूप असून त्यांत अनुक्रमें चक्रधर, गोविंदप्रभु व नागदेवाचार्य यांचा जीवनचित्रपट स्मृतिरूपानें रंगविलेला आहे. त्या त्या चरित्रनायकाच्या आवडीनिवडी, आचारविचार, बोलणींबसणीं हीं सर्व आठवणींच्या रूपानें सांगणारे हे चरित्र-ग्रंथ म्हणजे यादवकालीन गद्याचा आदर्शच होय. गद्यरूप असले तरी त्यांत काव्य विपुल आहे. त्यांतील भाषा साधीसुधी व 'मऱ्हाठी' वळणाची असून त्यांत पांडित्याचें प्रदर्शन अगदीं नाही. मराठी वाक्प्रचारांच्या दृष्टीनेंहि हें प्राचीन गद्य संपन्न आहे. ' बीजें करणें, पहुड स्वीकारणे, वास पाणें, पाणि-पात्र करणे, आगणी वेढे करणें, न्याय सांगणें, भिक्षा करणें, हाकारा येणें, वेकास जाणें, जाणीव सांगणें, साउमे येणें, बाहे आफळणें, देह तुटणें, बैसकार देणें ' इ. अनेक वाक्प्रचार या चरित्रग्रंथांतून भेटतात. त्यात आढळणारे ' मासापाखा, मासादीसां, बाहिरवाहिरीं, घे–दे, वेचवेचू, उलथउलथूं, मर्दनामादणें, चीरचोळी ' यासारखे जोडशब्दहि मोठे वेधक वाटतात. मधूनच ' अहो दुष्टे गांजिलें तें रायापुढें सांघिजें, आणि रोगें अडिले तरि वैद्यापुढे सांधिजे' यासारखी सुंदर म्हण डोळयांपुढून चमकून जाते. या गद्यांतील प्राचीन शब्दभांडारास तर मोलच नाहीं इतके तें विपुल आणि समृद्ध आहे. तसेंच तें सरसहि आहे. गोविंदप्रभूच्या निधन-समयीं ' माझे माहेर गेले ' असें म्हणून शोक करणारी त्यांची लेक पाहून म्हाइंभटा प्रमाणे आपलेंहि 'हृदयस्फुट' होते व त्यांतील मूर्तिमंत कारुण्यानें आपणहि क्षणभर कासावीस होतों (क्र.८-५). ' गोसावियांचा व्यापारु चालवितां कोणा माझें वेकास गेलें असेल, तरि तुम्हीं समस्तीं क्षेमा करावी' असें म्हणून देह ठेवणाऱ्या भटोबासांचें शब्दचित्र आपणांस व्याकुळ करतें (क्र.९-१).तुम्हां जरि देवो नव्हे, तरि कोणाहि देव नव्हे ' हें नागदेवचार्यांचें आश्वासन ऐकून म्हाइंभटाविषयींचा आपल्या मनांतील आदर शतपट होतो

(क्र. ९ ७).विरक्त चक्रधरांचें चित्रहि असेंच हृद्य आहे (क्र. ७-३).तात्पर्य, भाषा आणि भावना अशा दोहीं दृष्टींनीं हे चरित्रग्रंथ अति थोर आहेत. लीळा किंवा आठवणी सांगतां सांगता त्या त्या महात्म्याचें चारित्र्य सहज वठविण्याची या ग्रंथकारांची हातवटी कांहीं विलक्षण आहे. असो. भावेदेव व्यासकृत 'पूजावसर' हा महानुभावांचा दुसरा एक गोड गद्य ग्रंथ थोडा निराळ्या स्वरूपाचा आहे. त्यांत चक्रधरांची दिनचर्चा सूक्ष्मपणें दिलेली असून यादवकालीन मराठी समाजाच्या चालीरीतीचें सम्यग्दर्शन घडविण्यास ती समर्थ आहे. 'पस्यातपाहारीं' म्हणजे झुजूमुजू होताच उठणें, कवाडाची खिळी फेडणें, चरणीं उपानौ' म्ह वहाणा घालून परिश्रयास जाणे, 'ऊष्णोदकाच्या तांबतौली' नें हातपाय धुणें, मुखमार्जनाच्या वेळीं आंब्याच्या, जांभळीच्या किंवा कधीं बोरीच्या दोन सीलिका म्ह काड्या घेऊन त्यांतील एकीनें 'दंतधावन' करणें व दुसरी धनुष्याकार वळून तिनें 'जिव्हामळ आर्कखिणें', स्नानोत्तर 'आंगीटोपरें' चढविणें, कणीक तिंबून, तांदुळे भिजत घालून तूपभात, निबलोण, साकवतिया म्ह. भाज्या, कानवडा, मांडा इ सिद्ध करून 'आरोगणा' करणें, भोजनोत्तर 'गुळळा' करून 'सकर्पूरा फोडीं' नीं मुखशुद्धि करीत 'आरोग्यवाउली' म्ह. शतपावली घालणें, नंतर घटकाभर पड्न झाल्यावर कांहीं 'धर्मवार्ता' करणे, याप्रमाणें भावेदेव व्यासांनीं सूक्ष्मपणें टिपलेली चक्रधरांची दिनचर्या पाहिली म्हणजे यादवकाल आणि वर्तमानकाल यांतील उण्यापुऱ्या सहाशें वर्षांचें अंतर नाहीसें होऊन सामाजिक चालीरीतीचें सातत्य ध्यानात येतें (क्र. १०) चक्रधरोक्त 'सूत्रपाठा' सारख्या तात्त्विक ग्रंथाचें स्वरूप याहून निराळे आहे. हा 'सूत्रपाठ' म्हाइंभटकृत 'लीळाचरित्रां' तून प्रथम केसोबायासांनीं इ. स. १२८० च्या सुमारास संकलित केला. त्यांतील उक्ति मूळच्या चक्रधरांच्या असल्या तरी त्या लेखनिविष्ट करण्याचें श्रेय म्हाइंभट व केसोबास या दोघांकडे जातें. सूत्रांतील अल्पाक्षररमणीयत्व पाहण्यासारखें आहे. प्रस्तुत आचारविषयक सूत्रांवरून चक्रधरोक्त नीतिशास्त्राची व संन्यासमार्गाची कल्पना चांगली येते. स्वदेश–स्वग्राम ही त्याज्य मानून, महाराष्ट्रीं भिक्षावृत्तीनें राहून, एषणात्रय त्यजून, आवडीनिवडी बाजूस सारून, पोटाची खळगी घृणात्यागपूर्वक रेंद्याचेंद्यानें भरून, साधी कोपरदुटी पांघरून, हातीं काडीहि न धरितां किंवा चित्रीचीहि स्त्री न पाहतां, 'अनु-

सरलेयाचा देवो' हें ओळखून शयनासनी वा भोजनी एका परमेश्वराचें चिंतन करीत 'झाडातळीं जन्म क्षेपावें,' हा चक्रधरांचा उपदेश थोडा एकांतिक तर खराच; पण त्यांतहि एक प्रकारची पारमार्थिक निष्ठा आहे, व ही निष्ठा 'सूत्रपाठां'तून बरोबर व्यक्त होते. पाठाची भाषासरणीहि तात्त्विक विवेचनास साजेल अशीच आहे ( क्र. ११ ). 'दृष्टांतपाठां'तील मूळ सूत्रें व त्यावरील दृष्टांत ही चक्रधरोक्त असून त्यातील दार्ष्टांतिक तेवढें केसोबासाचें आहे. हा फरक भाषासरणींतहि जाणवतो. सूत्रांची व त्यांवरील दृष्टांतांची भाषा चक्रधरी वळणाची म्हणजे साधी, सोपी व सुटसुटीत असून दार्ष्टांतिकाची भाषा पंडिती थाटाची आहे. मराठी भाषेस हे पंडिती वळण प्रथम केसोबासांनी लाविलें, हा त्यांचा एक प्रकारे गौरवच होय. त्यांच्या भाषेंत चक्रधरांच्या वाणींतील जिवंतपणा जरी नसला तरी अगच्या पांडित्यानें व गांभीर्यानें तीहि उठून दिसते. चक्रधरोक्त तत्त्वज्ञान विद्वानांना रुचेल अशा रीतीनें मराठीत मांडणें व अध्यात्मासारखे शास्त्र पेलण्यास समर्थ अशी शब्द-संपत्ति मराठींत रूढ करणें हें केसोबासाचें महत्कार्य होय. या दृष्टीनें ते प्राचीन मराठी गद्याचे आद्याचार्य ठरतात. शास्त्रीय परिभाषा मराठीत रूढ करून तिचें वाग्बल वाढविण्याचें सर्व श्रेय केसोबासांकडे जाते किंवा जावें. त्यांनी घालून दिलेल्या पद्धतीवर पुढे महानुभाव पंडितांनीं अनेक स्थळे म्ह. भाष्ये, बंध म्ह. महाभाष्यें, विधायकें, लापिका, व्याख्या, परीक्षा, इत्यादि विविध गद्य ग्रथ निर्माण केले असून ते सर्व तार्किक स्वरूपाचे आहेत. महानुभावीय वाङमय अशा टीपग्रंथांनीं अत्यंत समृद्ध आहे. एक 'दृष्टांतपाठ' घेतला तर त्यावर पाचपन्नास विवरणात्मक ग्रंथ आढळतात. पंडिती वळणाचें हें मराठी साहित्य खंडनमंडनकौशल्यांत किंवा केशविच्छेदनांत तत्सम अशा संस्कृत साहित्यास कदापि हार जाणार नाहीं. 'संस्कृताचा रंग देशी भाषेच्या पिचकारीत भरून' हे मानभाव पंडित जो तर्काचा खेळ खेळले आहेत तो एकवार पाहण्यासारखा आहे. नमुना म्हणून आचारसूत्रावरील 'स्थळ'-कारांचें भाष्य पुढें टीपांत दिलें आहे, तें पहावें. असो. केसोबासविरचित 'दृष्टांतपाठ' भाषादृष्ट्या सरस तर सामाजिक दृष्ट्या सूचक आहे. त्यांतील सर्वच दृष्टांत मोठे मार्मिक व समर्पक असून तत्कालीन समाजांतील चालीरीतींवर त्यांच्या योगें चांगला प्रकाश पडतो. उत्तर यादवांच्या राज-

वटींतील महाराष्ट्राचें हें एक समाजचित्रच आहे म्हटल्यास चालेल 'गोरा-गोमटा–धारेधाकुटा, आलेपाले, सेजिया–साइलिया, मरकाढी, तीटततीटत, आंबटवोले' इत्यादि शब्दप्रयोग अभ्यसनीय आहेत. वारंवार डुळकणाऱ्या लेंकरास 'आतु तऱ्ही लीतैल' असें म्हणून पुनः पुनः पाजगाऱ्या आईचा दृष्टांत किती हृद्य आहे! दृष्टांत आणि सिद्धांत यांची इतकी जोड फार क्वचित् आढळते (क्र. १२).

महानुभावीय गद्याचें स्वरूप हें असें आहे. त्यास भाषिक आणि सामाजिक असें दुहेरी महत्त्व आहे. यादवकालीन समाजाची स्थितिगति, त्याच्या चालीरीती, व्रतेवैकल्यें, सणवार, खाणीपिणीं, वस्त्रेंपात्रें, नाणींगाणी, शिक्षा-दीक्षा अशा विविध अंगांचें दर्शन हें गद्य घडवितें. 'लीळाचरित्रा' सारखे ग्रंथ म्हणजे केवळ चक्रधरांची वाङमयी मूर्ति नसून तत्कालीन समाजाचेहि तें चरित्रचित्र आहे. त्यांतील शब्दभांडार समाजाच्या विविध थरांतून सिद्ध झालेलें असून त्यास कृत्रिमतेचा स्पर्शहि नाहीं. महानुभावीय गद्यकाराच्या मराठी भाषेचें मऱ्हाटपणच काहीं वेगळे आहे. खरी लोकभाषा ते जाणत. त्यांची परंपरा अशीच पुढे चालती तर यापुढील इतिहास निराळा झाला असता परंतु दुर्दैवानें यादवाची राजवट लौकरच सपुष्टात आली आणि इस्लामचें आक्रमण साऱ्या महाराष्ट्रभर अविच्छिन्नपणे सुरू झालें. याचे अनिष्ट परिणाम मराठी भाषेसहि भोगावे लागले व तिची गति जणु वज्र–घात व्हावा त्याप्रमाणें एकदम कुंठित होऊन ती केवळ अगतिक झाली.

येथून जो मराठी भाषेच्या अज्ञातवासास आरंभ होतो तो थेट शिवकाला-पर्यन्त. या तीनशें वर्षांच्या मध्ययुगीन काळांत आधी वाङमयच फारसें नाहीं; तेथें गद्य तें किती असणार! तरीपण या काळांत 'पंचतंत्रा'सारख्या बोधपर कथा, फादर स्टीफन्सची चार ओळीची प्रस्तावना आणि एकनाथी भारुडें इतकें गद्य उपलब्ध होतें. पैकीं 'पंचतंत्रा' च्या प्रती अनेक असून भावे-प्रत, पोतदार-प्रत व नेने-प्रत या त्यांपैकी प्रमुख होत. त्यांतील शेवटली महानुभाव संप्रदायांतील असून याशिवाय पंचतंत्राची आणखी एक संपूर्ण व स्वतंत्र प्रत मला तंजावरीं मिळाली. याचा अर्थ, मूळ मराठी भाषांतराच्या अनेक प्रती झाल्या असा नव्हे, तर प्रो. पोतदार म्हणतात त्याप्रमाणें पंच-तंत्राची मूळ भाषांतरेंच अनेक झालीं. असो. आपल्या भाषांतरकानें मूळांतील

गोडी कायम ठेविली आहे इतकेंच नव्हे, तर आपल्या प्रसादपूर्ण वाणीनें त्यानें तीं वाढविली आहे. १५ व्या शतकांतील प्रस्तुत मराठी पंचतंत्राची भाषा १३ व्या शतकातील म्हाइंभटाच्या भाषेशी जुळती आहे याचें थोडें नवल वाटतें (क्र. १५). 'क्रिस्तपुराणा'च्या प्रस्तावनेंतील भाषा अशुद्ध, अपभ्रष्ट व कांहीशी गांवढळ वाटली तरी तिचें ऐतिहासिक मोल कांहीं निराळें आहे. इंग्लंडमधील विल्टशायर परगण्यांत ज्याचा जन्म असा थॉमस् स्टीफन्स एक मिशनरी म्हणून १६ व्या शतकांत हिंदुस्थानांत यावा आणि स्वधर्म-प्रसारार्थ का होईना पण मराठी भाषेवर प्रभुत्व मिळवून 'क्रिस्तपुराणा'सारखें ओवीबद्ध महाकाव्य त्यानें निर्माण करावें हा सर्वच नवलाव नाही काय? काव्यदृष्टीनें 'क्रिस्तपुराण' कसेहि असो, त्याची थोरवी केव्हाहि स्वयंसिद्धच आहे. स्टीफन्सनें या पुराणास लिहिलेली आटोपशीर अशी गद्य प्रस्तावना वक्तृत्वपूर्ण असून तींत लेखकाची स्वधर्मनिष्ठा व तळमळ ही स्पष्ट दिसतात (क्र. १४). एकनाथानी गद्यरचना केल्याचें कोठे ऐकिवांत नाहीं. तरीपण 'अर्जदस्त' किंवा 'कौलपत्र' यांसारखी त्यांची प्रकरणें वस्तुतः गद्यच होत (क्र. १५). नाथांचें रूपककौशल्य आणि व्यवहारचातुर्य असाधारण असून प्रपच व परमार्थ याचा समन्वय करून दाखविण्याची त्याची शैलीहि केवळ अनुपम आहे. या सर्व गुणाचा प्रत्यय प्रस्तुत भारुडातहि येत असून त्यातील साग रूपक खास एकनाथी वळणाचें आहे. रचना कांहीशी मुक्तछद पद्यासारखी वाटते. मधूनच यमकाचाहि भास होतो. म्हणून या प्रकारास सयमक गद्य म्हणणें अधिक बरे. नाथाचा 'हिंदुतुर्क संवाद' काहीसा याच पद्धतीवर आहे. १६ व्या शतकाच्या अखेरीस रचिल्या गेलेल्या या गद्यातील फारसी शब्दांचें प्रमाण ध्यानांत घेण्यासारखे आहे. मराठी भाषेचा अज्ञातवास सपून तिच्या इतिहासांतील नवयुगास नाथकालापासून प्रारंभ होतो, त्याचें हें द्योतक आहे. पद्याचें कसेंहि असो, मराठी गद्यानें निदान परभाषेतील शब्दाचे लोण पचवून स्वत:च्या सामर्थ्यात भर घालण्याचें ठरविलेले या काळापासून स्पष्ट दिसतें. प्राचीन मराठी गद्याचा पूर्वार्ध संपून त्याचा उत्तरार्ध सुरू झाल्याचें हें गमक आहे (क्र. १५).

येथें पारतंत्र्याचें मध्ययुग संपतें व स्वातंत्र्याच्या नवयुगास प्रारंभ होतो. येथून पुढील गद्यग्रंथ मुख्यतः बखरवजा असून त्यांवर स्वराज्याचें तेज

फांकलेलें स्पष्ट दिसतें. या बखर–गद्याचें महत्त्व वाङमयीन व ऐतिहासिक असें द्विविध आहे. बखरींत दिसून येणारा भाषेचा थाट, त्यांतील वर्णनांचा डौल, संभाषणातील ऐट, व्यक्तिदर्शनांतील जिवंतपणा, निरूपणाची बहार, शब्दाशब्दांतून व्यक्त होणारा स्वाभिमान, आणि बखरीच्या एकंदर उठावांतील जोम याविषयीं निराळें विवेचन करण्याचें कारण नाही. बखर म्हटली कीं वरील सर्व गुण बहुशः तींत असतातच. हनुमंतस्वामीच्या बखरींतील शिव–समर्थ–प्रसंगाचें गांभीर्य ( क्र. १६ ), तंजावरी बखरींतील वर्णनाची अतिशयोक्ति ( क्र. १७ ),सभासदकृत शिवचरित्रांतील स्वाभिमानी शिवाजी राजाचें सतेज शब्दचित्र ( क्र. १८, २० ), चिटणिशी बखरीतील वर्णनाचा बारकावा ( क्र. १९, २१, २२, २३ ), सोहनीकृत पेशव्यांच्या बखरींतील वर्णनाचा साधेपणा व घरगुतीपणा ( क्र. ३१ ), पानिपतच्या व भाऊसाहेबांच्या बखरीतील अपूर्व असें ओज, संभाषणांची बहार व करुणरम्यता ( क्र. २६, २७, २८ ), नाना फडणिसाच्या आत्मचरित्रांतील सहजता व स्पष्टता (क्र. २९), हरिवंशाच्या बखरीतील निरूपणाचा थाट व एकंदर उठाव (क्र. ३०), आणि आज्ञापत्रांतील सावधगिरीच्या राजनीतीचा उपदेश (क्र ३३) ही सर्व त्या त्या ठिकाणी अपेक्षितच आहेत. मधूनच येणारीं सुभाषितवजा वाक्ये, म्हणीवजा वाक्प्रचार, आणि पौराणिक दाखले यांच्या योगानें बखरींच्या भाषासौंदर्यांत भर पडली आहे. या बखरकाराचा विशेष हा, की ऐतिहासिक वातावरणाची निर्मिति करून ते गतकाळ जिवत करूं शकतात, वर्तमान कालातील वाचकांस भूत काळांतील अनुभवांचा पुनः प्रत्यय आणून देऊं शकतात. बखरीतील सुटसुटीत, आटोपशीर वाक्यें श्रोत्यास एक प्रकारचा मोह घालतात व त्यात रंगविलेलीं गतकालीन वैभवाचीं चित्रें पाहून आपल्या तोंडून ‘ कालाय तस्मै नमः ’ असे उद्गार आपोआप बाहेर पडतात. या उद्गारांत एक प्रकारचा उदास आनंद भरलेला आहे व त्यासाठीच आपण बखरी वाचतों.

बखरीचें हें वाङमयीन मोल झालें. ऐतिहासिक दृष्ट्याहि त्या तितक्याच मोलाच्या आहेत असें मात्र नाहीं. मराठेशाहीतील सुमारें पन्नास एक लहानमोठ्या बखरी आजवर छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. महाराष्ट्रांत स्वदेशाच्या इतिहासाची आस्था १८ व्या शतकांत बरीच होती व

तत्सम.धानार्थ या सर्व बखरी निर्माण झाल्या. हिंदुस्थानांत इतिहास असा दोनच भाषांत लिहिलेला आढळतो; एक फारसींत व दुसरा मराठीत. कारण संगतवार इतिहास ज्याच्या अभिमानानें सांगतां येईल अशीं दोनच प्रौढ राज्यें या देशांत झालीं; एक मुसलमानाचें व दुसरे मराठ्यांचें. पैकी मुसलमानांना इतिहासाची गोडी पूर्वींपासूनच आहे. त्याच्या सहवासानें, त्यांच्या 'तवारिखा' पाहून मराठ्यांनीहि बखरीचा उपक्रम सुरू केला. खुद्द पेशव्यांच्या पदरीं बखरनवीस असत व जुने कागदपत्र पाहून बखरी सजविणें हें त्यांचें कामच असे. कांही बखरी प्रांतोप्रांतीच्या माहितगारांनीं कर्णोपकर्णीं ऐकून लिहिलेल्या आहेत. त्यांत सत्यापलाप साहजिकच अधिक प्रमाणांत असे. खुद्द पेशव्याच्या येथील खास लिहवून घेतलेल्या बखरीतून यद्यपि कालानुक्रम साभाळला आहे, तथापि त्यातहि कालविपर्यासाचा दोष हा आहेच. कै. राजवाड्याच्या मताप्रमाणें हा दोष पुराणाच्या संसर्गानें व ऐतिहासिक सत्यासत्यतेसबंधी लोकांत असलेल्या औदासीन्यामुळें बखरीतून शिरला आहे. पौराणिक कथाच्या श्रवणानें विचारात अतिशयोक्तीचें प्राबल्य फार झाले व कालाच्या पौर्वापर्याचें महत्त्व बखरनविसांच्या लक्ष्यातून सुटले. 'भाऊसाहेबाच्या बखरी' त हा कालविपर्यासाचा दोष अत्यल्प असून सोहनीकृत 'पेशव्याच्या बखरी'त तो अमूप आहे. ऐतिहासिक बखरीचा दुसरा दोष हा, की त्यांत निरनिराळ्या प्रसंगाचें अन्योन्य महत्त्व दर्शविलेले नसून क्षुल्लक गोष्टीचा निरर्थक पाल्हाळ मात्र केला आहे. तसेंच कोणत्याहि मोहिमेची वा राजकारणाची संगतवार हकीगत या बखरीतून मिळू शकत नाही. जी काही थोडीबहुत मिळते ती 'असंबद्ध, परस्परविरोधी, संदिग्ध आणि प्रायः अविश्वसनीय' अशी आहे. शिवाय या बखरीतून जो मजकूर खरा असतो तो त्यांतील खोटया मजकुरापासून अलग काढतां येत नाहीं. सर्व बखरी मिळून ऐतिहासिक सत्य गवसेल म्हणावे तर तेंहि शक्य नाहीं. अनेक असत्यें मिळून एक सत्य कसें सिद्ध होणार? उदाहरणार्थ, एक पानिपतचा प्रसंग घेतला तर त्यावर भाऊसाहेबांची बखर, कैफियत, रघुनाथ यादवकृत पानपतची बखर, काशीराजकृत बखर याप्रमाणें चारपांच बखरी उपलब्ध आहेत. परंतु त्यापैकीं प्रत्येकींत तपशीलाचा थोडाफार फरक पडतो, व त्या सर्व बखरी मिळून सत्यदर्शन

घडतेंच असें नाहीं. म्हणून कै. राजवाडे[1] बखरीचे तीन वर्ग करतात. पहिला वर्ग समकालीन बखरनविसांचा असून त्यात सभासदकृत शिवचरित्र किंवा भाऊसाहेबांची बखर व कैफियत यांसारख्या बखरी येतात. समकालीनांनीं रचिलेल्या या बखरी पुष्कळच विश्वसनीय खऱ्या, पण त्यासहि कांहीं मर्यादा आहेत. पैकीं सभासदी बखर केवळ स्मृतीवर हवाला ठेऊन चंदी-सारख्या दूर प्रांतीं लिहिली गेल्यामुळें तीत कालानुक्रम सांभाळलेला नाही. या बखरीतील शके १५८१ पर्यंतची हकीगत धरसोडीची, त्रोटक, तुटक व कालविपर्यस्त अशी आहे. दुसऱ्या वर्गातील बखरी म्हणजे कर्णोपकर्णी ऐकलेल्या हकीकतीची बाडें होत. या सदरांत सोहनीकृत पेशव्यांची बखर येते. ती रचणारास सत्यासत्यनिर्णयाचे ज्ञान नसल्यामुळे 'मिळेल ती माहिती व सुचेल ती क्लृप्ति' असा येथील प्रकार होतो. तिसऱ्या वर्गातील बखरींत जुन्या बखरकारानी दिलेली माहिती जशीच्या तशी किंवा काहीं फेरफार करून इष्ट तेवढी दिलेली असते उदा. मल्हार रामराव चिटणीस-कृत शिवछत्रपतीचें सप्तप्रकरणात्मक चरित्र. या चरित्राचा रचनाकाल देताना प्रारंभीच चिटणीसानी काही विसंगत विधानें केली असल्यानें त्याच्या ऐतिहासिक प्रामाण्याविषयी मन साशक होतें. चिटणिसांनी विष्णुपुराण, दंड-नीति, राजधर्म, राजमयूख, रमलशास्त्र, वडिलार्जित कारकिर्दी, दिनचर्या वगैरे पाहून आपली बखर सजविली आहे. ग्रांट डफ् या चरित्रास 'व्हॉल्युमिनस' म्हणतो, तर कै. राजवाड्यांच्या मते तें बरेंच त्रोटक आहे. मल्हार रामरावानें आपल्या बखरीत जुन्या टिपणांचा उपयोग करून कोठें कोठें मित्याही दिल्या आहेत, हें खरे. पण 'शिवदिग्विजय' काराप्रमाणे यालाहि अप्रस्तुत अशी मागली पुढली माहिती वावदूकपणें सांगण्याची थोडी खोड आहेच. तात्पर्य, ऐतिहासिक सत्यदर्शनाच्या दृष्टीनें बखरीचें महत्त्व फार थोडें आहे. स्थल, काल आणि प्रसंग यांचा विपर्यास, सगतवार व तपशीलवार माहितीचा अभाव, असंबद्ध, संदिग्ध व परस्परविरुद्ध विधानें, इत्यादि दोष कमीजास्त प्रमाणांत सर्वच बखरींतून आढळतात. बखरकाराचें लिहिणें अपुरें व संशयात्मक असल्यानें त्यांचा मेळ घालण्याचा खटाटोप करणें व्यर्थ आहे. चिटणिसांसारख्या

१. ऐतिहासिक प्रस्तावना, खंड ४.

प्रभुज्ञातीयानी शिवछत्रपतींची व इतर वीरपुरुषाचीं चरित्रें लिहून आपला कायस्थ धर्म कायम ठेवला व आपण लेखणी आणि तलवार हीं दोहीं सारख्या सामर्थ्यानें वागवू शकतो हे सिद्ध केले, यासाठी या राजकार्यकुशल ज्ञातीचें आपण सर्वच ऋणी आहो हे खरे. पण येथे प्रश्न आहे तो ऐतिहासिक सत्याचा. त्या दृष्टीनें पाहिल्यास केवळ बखरींचा आधार अपुरा व पोकळ ठरतो. ग्रांट डफला हे उमगले नाही व त्यानें बखरीतील मजकूर परामार्थानें घेतला. यामुळे त्याची स्वतःची बखर अत्यंत विकृत होऊन बसली वरील सर्व अभिप्राय ध्यानात आणून कै. राजवाडे[१] म्हणतात, कीं एक अस्सल चिटोरें सर्व बखरीच्या बहुमताला हाणून पाडण्यास बस्स आहे.

याच ठिकाणी आपण बखरीकडून इतिहासाच्या अस्सल साधनांकडे म्हणजे ऐतिहासिक पत्रव्यवहाराकडे वळावें हें बरे. हा पत्रव्यवहार अति प्रचंड असून तो उपलब्ध करून देण्याचें कामी कै. राजवाडे, कै. खरे, कै. पारसनीस, श्री. सरदेसाई, यासारख्या सशोधकाचे जीवितश्रम खर्ची पडलेले आहेत. अक्षरशः अगणित अशी ही अस्सल पत्रें बखरीतील सत्यासत्य पारखण्याच्या कामीं महत्त्वाची आहेतच. पण त्यातील गद्याचें वैभव तर असे आहे कीं त्यांतून निवड करण्यास सवडच उरूं नये बहुतेक सर्व पत्रकारांनीं आपापलें मनोगत अशा रीतीनें प्रकट केलेले आहे, की त्यांतून त्या त्या लेखकाचें अंतश्चरित्र स्पष्टपणें उमटावें. हीं पत्रें म्हणजे महाराष्ट्राच्या इतिहासातील थोरांचीं छोटी छोटी आत्मचरित्रेच होत. त्यांत सर्वांना आत्मैक्यभावानें पाहणारे रामदास आहेत (क्र. ३४), आपल्या चुकार चाकरांस ‘ टीक ठीक ’ करून ‘ मनीं धरावे ते होते ’ हे समर्थवचन सार्थ करणारे शिवराय आहेत (क्र. ३६, ३८), श्रीच्या धर्मस्थापनेस अतर पडूं न देणारे समर्थशिष्य कल्याण आहेत ( क्र. ४० ), तुळशीबेलाचे श्रीवरील शफत घेऊन स्वामीचे मांडीवर उसें ठेवून निजणारे सताजी घोरपडे आहेत ( क्र. ४१ ), इकडे स्वतः कर्जदारांच्या नरकांत बुडून तिकडे अल्पवयी रघुनाथरावास ‘ सावध वर्तावें ’ असा उपदेश करणारा बाळाजी बाजीराव आहे ( क्र. ४२, ४३, ४४ ), आत्म्याचें अमरत्व कळूनहि वियोगसमयी ज्याना ‘ देहसंमंधैक ऊर्मि आंवरत नाही ’ असे मठपति आहेत ( क्र ४७ ), एकीकडे ‘ तुम्ही कालचक्रासहि फिरवाल ’ असें म्हणून

१. ऐतिहासिक प्रस्तावना, खंड १, पृ. ४.

सखारामबापूस गौरविणारी व दुसरीकडे त्यानें वृद्धपणीं केलेल्या लग्नाबद्दल त्याची नाजूक निंदा करणारी आनंदीबाई आहे ( क्र. ५० ), वर्षाकाळीं ज्यांच्या बुद्धीस मांद्य येई असे कविवर्य मोरोपंत आहेत ( क्र. ५१ ), अलिबहादरास राजकारणात शपथ वगैरे गुडाळून ठेवण्याचा सल्ला देणारी त्याची आई आहे ( क्र. ५४ ), आणि फर्मानिबाडीच्या दरबाराचें वृत्त ऐकून मराठेशाहीच्या त्रिखंडकीर्तीनें स्वतःस धन्य मानणारा गोविंदराव काळेहि आहे ( क्र. ५६ ). ही पत्रें म्हणजे ऐतिहासिक गद्याचा आदर्शच होय असें म्हटल्यास चालेल

परंतु प्राचीन मराठी गद्य केवळ तात्विक किंवा ऐतिहासिक स्वरूपाचें नाहीं. त्यांत नाट्यासारख्या ललित वाङ्मयाचाहि थोडाफार वाटा आहे. ललितांसारखे नाट्यप्रकार महाराष्ट्रांत अति पुरातन काळापासून चालत आले असले तरी ते लेखननिविष्ट नसल्यानें त्यांचा उपयोग एतत्प्रकरणीं करून घेतां येत नाही याचें वाईट वाटतें. त्याबरोबरच समाधानाची गोष्ट अशी, की ही उणीव तंजावरी नाटकांनी दूर केल्याचे दिसून येतें. दक्षिणेकडील विद्या-कलाचें माहेरघर म्हणून तंजावराची ख्याति फार जुनी असून तीत व्यंकोजीनंतरच्या मराठी राजांनीं चांगलीच भर घातली. शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी किंवा एकोजी हा इ. स. १६८५ मध्ये मरण पावल्यानंतर तंजावरचें राज्य त्याचा वडील पुत्र शहाजी किंवा शाहराज याजकडे आलें. हा शाहराज व तत्पश्चात् गादीवर येणारे अनुक्रमें सरफोजी, तुकोजी, प्रतापसिंह, तुळोजी, अमरसिंह इत्यादि, राजे विद्या-कलांचे भोक्ते व पोशिंदे होते. त्यांच्या सुसंस्कृतत्वाची 'सरस्वति–महाला'सारखी चिन्हें अद्यापिहि त्या प्रांतीं आढळतात. तंजावर येथील मासभराच्या मुक्कामांत मला तेथें उपरिनिर्दिष्ट राजांच्या नांवांवर चांगलीं पांचपंचवीस नाटकें आढळून आलीं. ही सर्व नाटकें तेथील 'सरस्वति–महालां'त सुरक्षित असून कोणी जाणता येईल आणि आपल्या भांडारातील हें वाग्धन सर्वांकरवी यथेच्छ लुटवील अशा आशेनें तो महाल आज अनेक वर्षे जणुं तपश्चर्या करीत उभा आहे. हीं नाटकें पौराणिक असून ज्या राजांच्या नांवांवर तीं मोडतात त्यांनीच तीं रचिलीं असतील असें निश्चयपूर्वक म्हणतां येतें नाही. कोणा आश्रित कवीनें काव्य रचावे व तें यजमानाच्या नांवें घालून आपण स्वतः 'नाम' शेषहि

उरूं नये हा प्रकार सनातन आहे, व तसें येथें झालें असणे असंभवनीय नाहीं. उलटपक्षी त्या त्या नृपवरांनीं ही नाट्यरचना केलीच नसेल असेंहि म्हणवत नाही कारण श्री व सरस्वति एका ठायीं नांदल्याचीं उदाहरणें तंजावर प्रांतीं अनेक आहेत. ही नाटकें शरफेंद्र म्ह. सरफोजी, शाहराज व प्रतापसिंह या तिघांच्या नांवांवर मुख्यत्वेंकरून आढळतात. पैकी 'गणेशलीलार्णव' नाटकाच्या शेवटीं कविनाममुद्रिका आहे ती अशी:—— "इति श्रीभोंसलकुलदुग्धसागरसुधाकरश्रीचंद्रमौलीश्वरप्रसादलब्धचौलसिंहासन संपत्संतति राजाधिराज छत्रपति भूलोकदेवेंद्र श्रीशरभेंद्र भूपाल-विरचित गणेशलीलार्णव नाटके पंचमोंक: ।" सर्व मुद्रिका स्थूल-मानानें याच धर्तीवर आहेत. एका नाटकावर मात्र मला खऱ्या लेखकाच्या नांवाचा कांहीसा पुसट असा उल्लेख आढळला. शरभेंद्रकृत 'गणेशविजय' नाटकाच्या एका प्रतीतील दुसऱ्या अंकाच्या मागील पानावर 'गणेशनाटक प्राकृत रगनाथकवि दुपट्टी द्रुपाचारे कृत' असा तो उल्लेख आहे. याच नाटकाच्या दुसऱ्या प्रतीतहि[१] असाच उल्लेख आढळतो. अर्थात् रंगनाथ कवि दुपट्टी हाच खरा नाटककर्ता असावा. तसेंच शाहराजकृत 'गंगाकावेरी' नाटकाच्या प्रारंभी कोणा 'पूर्णानंदशिष्या' चा उल्लेख आहे. 'राजकन्या परिणय' हें नाटक तर उघडच 'शाहराजमहाराजाश्रित त्रियंबक ज्योतिर्विदे यानें रचिलेलें दिसतें.[२] तात्पर्य, या तंजावरी नाटकांचें कर्तृत्व संशयित आहे. ती रचणारे लेखक भिन्नभिन्न असावे यात मात्र शंका नाही. कारण तुलना-त्मक दृष्टीनें पाहिल्यास शाहराजाच्या नांवावरील नाटके इतरांच्या मानानें थोडीं ग्राम्य किंबहुना अश्लील वाटतात. उलट प्रतापसिंहाच्या नांवावरील नाटकांचा दर्जा नि:संशय उच्च असून त्यांची रचनाहि प्रौढ आहे. १८ व्या शतकाचा पूर्वार्ध हा या नाटकांचा रचनाकाळ होय तीं कांहीं प्रसगानें रचिलीं जात असे दिसतें. सरफोजी राजे वार्षिक गणेशोत्सव व प्रतापसिंह शारदोत्सव करीत आणि त्या प्रसंगीं हीं नाटकें होत. 'सरस्वति-महालां' त 'नाटक-प्रस्तावना' या नावाचें एक प्रकरण आहे.[3] त्यांत महाराज एकदां तंजावर-

1 Marathi MSS. in Saraswati Mahal, No 1710-11.

2 Catalogue of M. MSS. (Tanjore) No. 1733.

3 " " " No 1953.

जवळील मध्यार्जुनास गेल्या वेळीं कमलापुराहून रत्नांगद या नावाचा एक नट तेथें येतो व ' सुभद्रापरिणय ' नाटक करून दाखवितो अशी नाट्यकथा आहे. तिचा प्रारंभ असा:– " महाराज पुष्यस्नानास मध्यार्जुनास गेले असतां तेथें पौर्णिमेचें स्नान करून सायकाळी बुधजनसहवर्तमान माडीवरी विटनटगायक-वेश्यापरिहासकभाटवरकडाशी सहवर्तमान बसले असता इतक्यात पूर्ण चंद्रोदय झाला असता, मलयानिल वहात असता, ...कमलापुरवासी रत्नांगद नामक नट आला आहे ... इ." ही नाटकें गद्यपद्यात्मक आहेत. त्यांत 'दरुवु' म्ह. पदे खूप असून हा तामीळ नाट्याचा परिणाम होय. तंजावरी नाटकात डौर व कोर्वजी हे दोन मौजेचे प्रकार मला आढळले. पैकीं केशवनाथ डौरे याचे डौर समाजातील विविध थरातील सोगानीं युक्त असून तमाशा आणि नाटक यांमधील हा दुवा महाराष्ट्रांतहि रूढ होता असें एकनाथी भारुडावरून वाटतें. ' कोर्वजी ' हा नाट्यप्रकार खास तामिळी आहे. तामिळी 'कुरवची' त कुरव जातीची शकुन सागणारी बाई नायिके-समोर येऊन नायकाचें स्तुतिस्तोत्र गाते असा प्रसग असतो. तामीळमध्यें सरफोजीराज कोरवची ' अत्यत प्रसिद्ध असून तिचे प्रयोग तजावर येथे प्रतिवर्षी होतात. तामीळच्या साहचर्यानें रचिलेली मराठी भाषेंतील दोन कोर्वजी नाटयें मला तंजावरी मिळालीं.[1] पैकीं एकात महामाया ही बुरडिणीच्या वेषानें येऊन इंद्राणीस शकुन सांगते व भूगोलवर्णन करते असा प्रसंग आहे. तात्पर्य, तंजावरी मराठी नाटकावर तामिळी नाटयाचा बराच परिणाम दिसत असून हीं नाटकें काव्यदृष्टचा सामान्य असली तरी त्याचें ऐतिहासिक महत्व हें मान्य केलेंच पाहिजे. कै. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे 'लक्ष्मी-नारायणकल्याणा' सारखें नाटक हें दृश्य असून श्राव्य नाटक नव्हे, हें तर खरेंच. पण त्यातहि नादीपासून प्रारभ करून अवघ्या एका अंकांत लक्ष्मी–नारायणाचें मंगलाष्टकपूर्वक 'शुभमंगल' करून देण्यातील नाटककाराचें कौशल्य कांही थोडे नाही ( क्र ५७ ). असो. मराठी नाट्यसृष्टीची परंपरा शोधणाऱ्यांनीं तंजावरी नाटकांसंबंधी आपलें अज्ञानच आजवर प्रकट केल्यामुळें वरील विवेचन येथे करावें लागलें.

1 Catalogue of M. MSS. (Tanjore). No 1721, 1745.

प्राचीन मराठी गद्याची ही उज्ज्वल परंपरा अशीच पुढें चालती तर पुढें १९ व्या शतकांत मराठी भाषेस आपला नवीन संसार थाटण्यासाठीं एका परकीय भाषेकडे पहाण्याचें कारण पडलें नसते. परंतु दुर्दैवानें तसें घडूं शकलें नाहीं व मराठेशाहीबरोबर मराठी गद्याचेंहि वैभव मावळलें. असो. जें झालें नाही त्याबद्दल खेद करून उपयोग काय ? प्राचीन गद्याची परंपरा चामुडरायाच्या 'श्री' कारापासून प्रारंभ करून ती तंजावरी नाटकाच्या 'शुभमंगलम्' पर्यंत नेऊन भिडविणें हें प्रस्तुत प्रस्तावनेचें काम येथें संपलें. पुढील पुराण पुढे !

याकामीं मुख्य ऋण देशभर पायपिटी करून प्राचीन गद्याचा हा अमोल ठेवा उपलब्ध करून देणाऱ्या संशोधकांचें. दप्तरांतून दडून बसलेलें त्यांचें संशोधन भर चवाठ्यावर आणून तें थोडें नीटनेटकेपणानें माडून दाखविणें हा त्याच्या ऋणांतून उतरायी होण्याचा एक मार्ग ! या कामीं माझे सोलापूर येथील तरुण मित्र श्री. सदाशिव मंगरूळकर, बी. ए. यांनी जी आस्था दाखविली व हातभार लावला त्याबद्दल मी त्याचा अत्यंत कृतज्ञ आहें.

बेळगांव.
ता. २५ जानेवारी १९४९

शं. गो. तुळपुळे.

★ क्र. १

## श्रवणबेळगोळ शिलालेख (शके ९०५)

श्री चावुण्डरायें करवियलें
गंगराजे सुत्ताले करवियले

★ क्र. २

## पाटण शिलालेख (शके ११२८)

स्वस्ति श्री शके ११२८ प्रभव संवत्सरे श्रावण मासे पौर्णमास्यां चंद्रग्रहणसमये श्री सोइदेवेन सर्वजनसंसिद्धौ हस्तोदकपूर्व्वकं निजगुरुरचित मठायायस्थानं दत्तं ॥ तद्यथा ॥ इयां पाटणीं जें केणें उघटे तेहाचा असि आउं जो राउला होता ग्राहकापासी तो मठा दिन्हला ॥ ब्राह्मणा जें विकतेयापासी ब्रह्मोत्तर तें ब्राह्मणीं दिन्हले ॥ ग्राहकापासी दामाचा वीसोवा आसूपाठी नग दिन्हला ॥ ...पहिलेआ घाणेआ दाणाची लोटि मढा दिन्हली ॥ जेती घाणे वाहती तेतीयांप्रति पली पली तेला ॥ येथ मविजे तें मढीचेन मापें मवावें ॥...

★ क्र. ३

## तासगांव–ताम्रपट (शके ११७० सुमारें)

मंजरबाडे गावु अर्धु कलिदेवा अष्टांगभोगा अर्धु पंचवीसा ब्राह्मणभोजना। ग्रामासि पूर्वदिसे गोवरु मर्यादं सीमा। दक्षिण दिसे वालगवाड सीमा। पश्चिमे हधिनौर मर्यादं सीमा। उत्तर पेढ मर्यादं सीमा। एया धर्मकार्या चिंता करिते वेदांगराशि गुरोस्छानापती कांतबाहू नरसिंघभट्ट अण्णंभट्ट गंगाधरभट्ट महादेवभट्ट गोहूंदभट्ट विष्णुभट्ट चांचरसु लाखणभट्ट हे आठ मुख्य करुनु चौदाही वृत्तिमंत सत्रपालक देवस्छलासि गुरवि ओडेरि सत्रस्छलासि ब्राह्मण ओडेर सत्रभोगु प (पा) लावा गुरवी देवभोगु प (पा) लावा ब्राह्मणी देवासि नित्य पंचामृत त्रिकाळ धूपारति नैवेद्यु दीपवर्त्ति पुष्पे ॥...

(ओळी ८२ तें ९७)

(दक्षिणच्या मध्ययुगीन इति. स.धनें, खं. ३)

★ क्र. ४

## पंढरपूर शिलालेख ( शके ११९५ ते ९९ )

स्वस्ति श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपुर श्रीविठलदेवरायासि तिसाथिती फुलें दांडे आचंद्रार्क चालावेआ नाना भक्तिमालिआं दत्त पैकाचा विवरु ।...

सकु ११९८ धाता संवत्सरे माग वदि ३ वृषे सोडवीकार हेमाडी पंडिती बामना दत्त ग १ देय दांडा १

स्वस्ति श्री सकु ११९९ ईस्वर संवछरे मार्गसिर सुदि १५ सुक्रे। श्री विठलदेवरायासि पांडरी–फ.ड–मुख्य समंतातभाग आचंद्रार्क श्री जादव नारायण प्रौढ–प्रताप–चक्रवर्ति श्रीरामचंद्रदेवराएं द।

—( 'ग्रंथमाला'–वि. का. राजवाडे )

★ क्र. ५

## वेळापूर शिलालेख ( शके १२२२ )

स्वस्ति श्री शकु १२२२ सर्वरी संसरे ज्येष्ठादौ श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ति श्रीरामचंद्रदेव विजयराज्योदयि तदुपादपदुमोपजीवी सर्वाधिकारी श्रीजोइदेव तंनिरोपित ब्रह्मदेॐ राणे तद्भ्रातर बाइदेॐ राणे माणदेशासंबंध वेलापुर तेथल घ (र्म) स्थल वटेस्वराचें गुण मठअ केले...वोवर बाइदेवें दत। पाली तो स्वर्गा जाए न पली तो नरका जाए। लेषक दामोदरपंडितसुत माइदेव। मंगलं महश्री

( दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें, खं. २ )

★ क्र. ६

## श्रीकृष्णचरित्र ( म्हाइंभटकृत ? )

युधिष्ठिरें रायें राजसूययज्ञ आरंभिला : दुर्योधनासि मूळ पाठविलें : दुर्योधनु परिवारेंसी आला : मग युद्धिष्ठिरें दुर्योधनासि जळस्थळें दाखैवीलीं : तेथ राजपुत्रु जळकेली खेळतु असेति : अैसें देखौनि दुर्योधनें जळ भणौनि उडी घातुनैली : तेणें तयाचें गुढगें कोपरूं फुटौन्निलें : तें देखौनि भीतरीं रायें मुखा मुख करौनि समस्त सैन्यें हासीन्नलीं : मग कव्हणी एकी ठाइं स्थळ म्हणौनि रिगौं बैसान्निला तंव उदकांतु उडी पडिली : वस्त्रें वोलीं जालीं : तंव द्रौपदी हांसीन्नली : ऐसा दुर्योधनाचेया चातुर्याचा उपहासु जाला : थोरु लाजीन्निला :

मग युद्धिष्ठिरें अग्रपूजा मांडिन्निलि : तेथ अठयासी सहस्त्रऋषी : आन समस्त कुळियाचे राये : रायारायाचें कुमरु बैसलें होति : युधिष्ठिरुयें येवौनि हात जोडौनि पुढें उभा टाकिन्नला : समस्तातें भणितिलें : माझा यज्ञ सिद्धी पावला : आता अग्रपूजा कवणासि करावी तें आज्ञा दीजो : तेव्हळिं तेंहीं अवघां ऋषीं विचारिलें : शुकदेवो ज्ञानिया होए आन तपोवृद्ध होए : तो पूजे योग्य होए तेयासि अग्रपूजा करावी : तेव्हळिं शुकदेवु लेकुरुवांतु उभा ठाकौनि श्रीचक्रवर्तीची लीळाचरित्रें पांतुचि होता : अवघा तेआतें बोलावों पाठविले तैसाचि शुकदेवो आला : बैसकारु दीन्हला : अवघां शुकदेवातें भणितिलें : तुम्हीं अग्रपूजा अंगीकरावी : तेव्हळिं शुकें भणितिलें : हें काइं : आमासीं अग्रपूजा काइंसीं : तेव्हाळि तेहीं अवघां विवक्षा केली : जो बाळब्रह्मचारी आन ज्ञानी असैल तेयाची अग्रपूजा : आमामाजीं कव्हनी नाहीं : शुकदेवें भणितलें : अवघा तुम्हीं मज प्रमाणु मानिलें तर मी निर्द्धारैनु तें तुम्हीं अवघें मानालु : समस्ता भणितिलें अवश्यु : शुकदेवें भणितिलें : सकळ ज्ञानियां शिरोमणी सकळ ज्ञानियांचा बापु श्रीकृष्ण असेचि : तरी यासी अग्रपूजा कराना कां पां : हें आईकौनि दुर्योधनादिकु क्षोभैले : तेव्हळीं श्रीकृष्ण चक्रवर्ती श्रीकरीं कनकाचें भाजनु घेवौनि ब्राह्मणां ऋषीसि क्षीरु वाढीत होते : इतुका श्रीकरु अन्नें माखिन्निले होते : श्रीकरींचा अनुकारु : आंगीचिया बाहिंया वरौतिया खोवीनिलिया होतियां : मोकळे कैस कळापु : कटिप्रदेसीं फूटा : युधिष्ठिरें

चक्रवर्तीसी बोलावों पाठविलें : तैसेचि श्रीकृष्णचक्रवर्ती बीजें केलें...समस्तां ऋषीं प्रार्थौनि भाणितले : आगा ए श्रीकृष्णा अवतारु : परमेश्वर पूर्ण ब्रह्म : आमुतें काइसेया झकवितासी :...

मग यज्ञमंडपीं आसनु रचिलें : श्रीचरण प्रक्षाळनु करौनि आसनीं उपविष्ट होआवेयां प्रार्थिले : आसनी उपविष्ट जाले : मग युधिष्ठिरें मंगल महाछाॲनर्वी श्रीचक्रवर्तांची अथोचितु अग्रपूजा केली : बैसोनि अग्रपूजा स्वीकारीन्निली : मग युधिष्ठिरें येथानुक्रमें ऋषी : मुनी : देव : दानव : राये पूजिले : ऐसां समइं तेथ शिशुपाळु आला : श्रीकृष्णचक्रवर्तीसि सवियां देओं लागैला : तंॲ वेळीं श्रीकृष्णचक्रवर्ती तेयाचियां शतभरी सवियां साहीनिलियां : एकी आगळी आली आन सुदर्शनचक्रा प्रेसैनि शिशुपाळाचें शिर छेदिलें : मां तें सिरकमळु यागीं पडिले : आन तेयाचें देहो बाणवेन्ही पीटौनि यागीं घातलें : आन हाःहाःकारु प्रवर्तला :

★ क ७

# लीळाचरित्र ( म्हाइंभटकृत )

## ( १ ) चक्रधराचें पूर्वचरित्र

गोसावीं केतुले एक दीस राज्य केलें : पूत जाला : गोसावी सारीचें जुं प्रत्येहीं खेळति : जिंकति : म्हणौनि हारि स्वीकरिली : बहुत द्रव्य हारावेिले : जुआरीं म्हणीतलें : जि जि हारविलें असे तें वेचिजो : दीजो : मग खेळिजो : मग गोसावीं तेथौनि बीजें केलें : दारवठा जुआरीं म्हणीतलें : जि जि गोसावीं आमुचें आधीं देयावें : मग बीजें करावें : सर्वज्ञें म्हणीतलें : तुमचें दीधलेयावीण हे आरोगण करी : तरी गोपाळण्ही आण गोसावीं भीतरीं बीजें केलें : कमळाइसातें म्हणीतलें : आपुला अळंकारु आणा : तेहीं म्हणीतलें : कां : एथौनि जूं हारविलें तयातें म्हणीतलें : तुमचें दीधलेयावीण हें आरोगण करी : तरी गोपाळण्ही आण : कमळाइसीं म्हणीतलें : आम्ही देओं तरि आम्हां हि तोचि आण : मग : गोसावीं उपरीयेवरि पहुडु स्वीकरीला : माता मर्दनीया पाठविला :

सर्वज्ञें म्हणीतलें क्षुधा नाहीं : माता उठवावेया आली : गोसावी नुठति : मग माता कमळाइसाते पुसों लागली : तेहीं मागील वृत्तांतु सांघीतलें : प्रधान राउळीनि आला : आणि पुसीलें : गोसावीया आरोगणा : राणियां म्हणीतलें : आजि नाहीं : आझुइं कां नाहीं : मग : तेहीं मागील वृत्तांतु सांघीतले : मग प्रधान गोसावीयापासि आला : गोसावी पहुडले असति : उपंगळिए घेउनि उठविले : मग पुसीलें : आजि आझुइं आरोगण कां नाहीं : सर्वज्ञें म्हणीतलें एथौनि जुं हारविलें तयाते म्हणीतलें : तुमचें दीधलेंयावीण हें आरोगण करीं तरि गोपाळण्ही आण : प्रधानें म्हणितलें : जोडिलें असे तें तुझें नव्हे : प्रधानें वाखारी आणविली : जुआरीयांचें द्रव्य पाठवीलें : मग : गोसावीया आरोगणा जाली । ६ ॥

## ( २ ) चक्रधर : दीक्षाग्रहण

एक वेळु सर्वज्ञें म्हणीतलें : रामयात्रे जावें : प्रधानें म्हणीतलें : तो देसु पारका : तेथ जाओं नैए : ऐसें मोडिलें : गोसावीं व्रत घेतलें : रामु देखिजैल तैं मर्दना : मादनें : व्याळी : गोसावी ताकभातु आरोगण करीति : मूर्ति कृश जाली : गोसावीयांचीया माता म्हणीतलें : प्रधानातें . सौदर मूर्ति कृश जाली : दुवाहीं राउत पाइक जाति तैसा पाठवावा : केतुलनि एके परिवारेंसी दांडिए वरि आरूहण करूनि बीजें केलें : सरिसा उगाणा : कोठी : चाटे : बडुवू : तैसे निगाले : पुणें प्रति एकुएकें नीरोपेंसी एकुएकातें पाठविती : मग : दोघेजण सरीसे होते : तयातें चुकौनि गोसावीं परमेश्वरपुरा बीजें केलें : श्रीप्रभु : राघवणहाटीं क्रिडा करीत असति : स्याम मूर्ति : नाभिचुंबित खाड : उतरिए वस्त्र : गगनाचां वास पाति : आपणेया आपण बोलत रांघवणाचां घरीं तिहीं पदार्थीसीं खेळ करीत असति : ते क्रीडा आमचें गोसावी पांत असति : श्रीप्रभु राघवणीं सेंगुळें बुडडें वोळगविलें : तें श्रीप्रभु प्रसाद करूनि : आरे : घे घे : घेना म्हणे : ऐसें भणौनि : गोसावियाकडे टाकिलें : गोसावीं चरिचेयावरि झेलिलें असतां वरि धरिलें : मग आरोगिलें : तेथ गोसावीं ज्ञानशक्ति स्वीकारिली ॥ ७ ॥

## ( ३ ) चक्रधराचें वैराग्य

गोसावीं अवस्था स्वीकरिली : मार्गीं चालावेयाची प्रवृत्ति नाहीं : कांटेयां केसकळाप गुंपति : ते वारोनि उगवति : कां : कव्हणि मनुष्य उगवी तेव्हळिं : मूर्ति वोरखडे : काटे रूपति : असुधाचे बिंदु नीगति : तें साहाजें पन्हरेयावरि मानकुलीं तैसीं मिरवति ॥ ८ ॥

## ( ४ ) स्थितप्रज्ञ चक्रधर

वोरंगळ प्रदेसीं गांवीं एकीं पाणिपात्रासि बीजें केलें : सेवटिली एकी घरीं ब्राह्मणें एकें म्हणीतलें : जी जी : गोसावी ए नगरीं जवं असति : तवं माझीए घरी उपरी असे : तेथ बिढार करावें : माझी बहिणी सेवादास्य करील : गोसावीं विनती स्वीकारिली : तेथ बीजें केलें : उपरिएवरि बाज सुपवती घातली : केतुले एक दीस तेथ होते : ऐसां लोकु भको लागला : कोण्हीं कांहीं बोले : कोण्हीं काहीं बोले : तेहीं म्हणितले मी आपुला डोळा देखैन : मग : जें करावें तें करीन : मग : ते प हीं टाकले : तवं : गोसावी पहुडले असति : तें बाइ : चरणसंवाहन करीति होती : तैसीचि निद्रा आली : ऐसें देखोनि तिहीं म्हणितले : हे नव्हे : हें प्रवर्तवीति असे : मग : क्षोभले : खांडें काढुनि : खर्ग घेउनि : ओखटिया बुधी आले : तव गोसावी श्रीमुख उघडुनि : कृपादृष्टि अवलोकुनि प्रेम : उत्तमसाधन संचरिलें : तैसेंचि बीजें केलें : ते भक्तही सरिसें नीगाले : मास दोनी संनिधानीं : ऐसा केतुलेया एका काळां : सर्वज्ञें म्हणितलें : भटो तुम्ही ए गावीं असा : हें पैली गांवीं असैल : मासा पाखा : मग : ते भक्त गावींची सींववेन्ही एति : तवं : गोसावीचिए गांवींहुनि ब्राह्मणु एकु कनवृतिसि ए : तयातें ते नीच पुसति : हां भटो : तुमचां गांवीं : पुरुष एक असति कीं : गौर श्रीमुर्ति : लांब कान : विसाळ नेत्र : ऐसिया खुणा सांघति : ते नीकेनि असति : तो म्हणे : नीकेनि असति : सींवेसि एउनि ऐसें प्रत्येही पुसति : एकु दिनीं तेणें ब्राह्मणें म्हणितलें : स्त्रिया पुरुषाचा ऐसा वेधु नाहीं : पुरुषा पुरुषाचा काइसा वेधु : पां : ऐसें म्हणौनि म्हणीतलें : आन साधीतलें : तें तुम्हीं नेणां : ते तैसेनि तैसें वर्तले : सर्प निमित्यें : हां भटो सत्य : ना : सत्य : ऐसें त्रिसुधि पुसीलें : तिहीं सत्यचि

म्हणीतलें : तैसेचि ते भक्त उभेचि पडले : देहत्यागु केला : देह विसर्जिलें : मग : तो ब्राह्मणु भियाला : गोसावियांपासि आला : अवघें वृत्तात सांघीतलें : सर्वज्ञें म्हणीतलें : हां भटो ऐसा सत्यही अर्थु न संगिजे : न बोलिजे : मा एसणें असत्य कैसेनि तुम्हां बोलावलें : मग : कुदळी पाटी घेववीली : त्यासि नीक्षेपु करविला : बाई : यासि तेथ मग राहावेंचि ना : हें तेथौनि निगालें ॥ १४ ॥

## ( ५ ) चक्रधर गुरें राखतात

गावीं एकीं पाणिपात्रासि बीजें केलें : ब्राह्मणा एकाचेया घरासि : तेणें म्हणितलें : कोण्हाचीं गोरुवें राखा का : सर्वज्ञें म्हणितलें : यासि कव्हणी राखों नेदी : तेणें म्हणितलें : आम्ही देऊनि : आमचीं राखा : सर्वज्ञें म्हणितलें हें राखैल : परि दोहे ना : सोडील परि बांधे ना : तेणें म्हणितलें : आम्हीं बांधौनि : आम्ही दोहौनि : मग गोसावीं मानीले : उदीयाचि तिये गोसावी-यासि मोट घालीति : गोसावी गाइ सोडीति : राना चारावेया नेति : गोसावी मोटेचें अन्न आरोगण करीति : मुडा धुति : श्रीमुकुटावरि घालीति : सीळा-तळावरि बैसति : गाई श्रीमूर्ति अवलोकीत बैसलिया असति : आनंदु रोवतीति : वीळीचा गोसावी गाई घेउनि बीजें करीति : तिया गाईसि बहुत दुध होए : मग : तेणें ब्राह्मणें म्हणितलें : आपुलिये ब्राह्मणीतें : पै : आजि दूध बहुत जालें : गाई निकेया चारीलिया : यासि न्हावेया लोणी घालावें : याचीयें मोटे दही घालावें : यापरि निचाचेयापासि निच अधिक गाईसि दुध होए : मग तो ब्राह्मणु राखों गेला : गाई कव्हणा राना नेतु असे पा : तवं गोसावीयासि एका सीळातळासि आसन : गाई श्रीमूर्ती आनंदु रोवतीति देखिलिया : वाळवेन्हीं चारु नाहीं : पाणी नाहीं : ऐसें देखोनि थोर विस्मयो जाला : मग : घरीं ब्राह्मणीपुढां सांघों लागला : पै : आमचेया गाई राखते तो साक्षात् श्रीकृष्णु : मग : तेथींचे वृतांतु सांघितलें : तिये दीसीं गाई गावामध्यें घातलिया : मग : बीजें केलें ॥ ४० ॥

★ क्र. ८

# गोविंदप्रभुचरित्र ( म्हाइंभटकृत )

## ( १ ) मृत्य बाळक जीववणें : ॥

एकाचें लेंकरु गोसावी खेळवीति : तें सरलें : तें नेउनि वाजेस्वरा इसान्य कोणीं पांनदीं पुरिलें : तवं गोसावीं तयाचेया घरासि बीजें केलें : तवं गोसावी-यातें देखिलें : आणि रडों लागली : मग तिहीं म्हणीतले : " राउळो ! जीया लेंकुरवातें तुम्हीं खेळवा : तें आजि सरलें : " म्हणौनि अवघीं रडों लागलीं : आणि राउळासि अनुकंपा उपनली : मग गोसावीं म्हणीतलें : " आवो मेला जाये : आंणि आंणी नां म्हणे : " तेहीं म्हणीतलें : " आतां काइ आणींन राउळो ? " "आवो मेली जाये : आंणि आंणी आंणी नां म्हणे : " तिहीं म्हणीतलें : " आतां काइ आंणीनं राउळो ?" "आवो मेली जाये : आंणावें म्हणे आवो आंणावेंचि म्हणे : " म्हणौनि दुडुदुडु-करि धांव घेतली : तेथ बीजें केलें : दगड फेडीले : उकरीलें : मग काढिलें : झाडीलें : पुसीलें : आनंदभरीत वास पाहों लागलें : मग उपंगळीए घेउनि आले : तेहीं देखीलें : आंणि कवाड घातलें : " नेया नेया राउळो ! सव परते नेया " तवं तयांचा सेजारीं म्हातारी एकि होती : तीचीए उपंगळीए नेउनि घातलें : तीया म्हणीतलें : " राउळो ! मीं काइ करींन : मी सतानीक बाइल : " मग गोसावी तीची चुची तयाचा तोंडीं घातली : आणि व्हाटीत पान्हावो आला : तें चुटचुटां पेवों लागले : तवं तीहीं कवाड उघडीलें : पाहाति तवं तैसें देखीलें : तवं गोसावी बीजें केलें : तीयें मागों लागलीं : म्हातारीया म्हणीतलें : " तुम्हासि देत होते तेहवाळि कां नेघाचि ? मां आतां मीं कां देईन ? " तैसींचि महाजनां-पासि न्यावो सांघावेया नीगाली : महाजनीं म्हणीतलें : " राउळीं इसि दीधलें तें लेंकरु इचेंची : तुम्हा लोभ करूं लाभे परि लेंकरु न लभे : आतां तुं ऐसें करि : याचां सेजारीं अस : " मग तयाचां सेजारीं असों लागली : मग तेहीं बाज सुपवती दीघली : एकि गाए दीघली : मग तो सतानीकु जाला : गोपी प्रवीणू जाला : तया नांव दामोधरु : जवं जीयाला : तवं तयासि जरु तावो नाहीं : आपुलीए अनुभवीचीया केलि लीळा : भक्तिजनापुढें साधे :

## ( २ ) म्हाइंभटाचा गूळ गोविंदप्रभु आवडीनें खातात

म्हाइंभट सरळाहुनि मात्रेचां चतुर्दसीं आले : पाटाऊ दुटी पांगुरले होते : ते एकां ब्राह्मणासि दीधली : तयाची घोंगडी आपण घेतली : ते सतरा दिसां रीधपुरासी आले : ते वाटे सीराळां पासवडीची पाटी आठे दामीं वीकीली : तेथ एका दामीयाची पाटी घेतली : साता दामांचा गुळु घेतला : मग रीधपुरासि आले : तवं श्रीप्रभु गोसावीयासी तीकोपाध्याचीए आवारीं अवस्थान असे : आगणीं वेढे करीत असति : तेवीची म्हणेति : "आवो मेला जाए म्हाइंया येइल म्हणे : गुळु आणील म्हणे : गुळ खावा म्हणे : ना खावा म्हणे : आवों खावाचि म्हणे : तैसेन्चि पटीसोळवरी गोसावीं बीजें केलें : वोटेयावरि आसन जालें : आणि श्रीदोंदाकडे अवलोकुं लागले : श्रीकरीचीया आगुळीया करूनि रेघा काढीति : ऐसे अनुकार करूं लागले : तवं म्हाइंभट दक्षीणीलेनि दारवठेनि आले : दारवठेया आंतु रीगतां मागु भेटला : तयातें म्हाइंभटीं पुसीलें : " श्रीप्रभु कवणी ठाईं राज्य करीत असेति : ?" मातंगें म्हणीतलें : "हें नव्हे : आतांचि एथ खेळत होते :" ऐसेंचि तीकोपाध्यांचेया आवारासि बीजें केलें : तो गावांबहीरि नीगाला : म्हाइंभट गावांतु गेले : तो पाठिमोरा जाला : आणि म्हाइंभटीं साष्टांग दंडवत घातलें : मग तीकोपाध्यांचेया आवारासि आले : श्रीप्रभु गोसावियांसि दर्सन जालें : गुळाची पाटी दरिसना केली : सोनेसळा फुटा ओळगवीला : मग दंडवत घातलें : श्रीचरणा लागले : मग गोसावीं म्हणीतलें " मेला जाए : आतां होये म्हणे : " म्हणौनि श्रीकरीं गुळु घेतला : श्रीमुखीं घातला : खावों लागले : " आवो मेला जाए : गोड आहे म्हणे : म्हणौनि दुसरेनि श्रीकरें भेली श्रीमुखीं घातली : आणि आंरोगुं लागले : ते श्रीमुखुनि ओघळु निगेति : तें खाडु माखे : दोंदावरी गळे : ऐसा गुळु आरोगीला : म्हाइंभटासी प्रसादु दीधला : तव आबाइसें जेवीतें होतीं : तीए लवकरि आंचवली : बाहीरि आली : " जी जी : पुरे कीजो : पोटु दुखेल : म्हणौनि आबाइसीं दुरडी भीतरीं नेली : मग उदक आणिलें : गोसावियांसी गुळला करूं घातला : श्रीदोंदे प्रमार्जीति : मग आबाइसीं पुसिलें : "भटो कवणीं ठाऊनि एत असा ? :" म्हाइंभटीं म्हणीतलें : " मी सराला होऊनि आला : " मग आबाइसीं म्हणीतलें " आमचे गोसावी कवनीं ठाइं राज्य करीत असेति ? " : मग

आवेसीं पाये धुतले : भीतरीं ठाओ केला : " भटो या : भीतरीं ठाओ केला असे : " मग म्हाइंभट जेवीले : आंचवले : मग म्हाइंभटीं आबाइसासि दंडवत घातलें: " मज चुलीची राख–पुंजा सांडुं देयावा : " मग म्हाइंभट गोसावियांचें सेवा–दास्य करूं लागले : ॥ ९७ ॥

## ( ३ ) दामुर्तांच्या कपाळीं नारळाचा प्रसाद

मग गोसांवीं दामुर्तासि पाठवणी दीधली : परि तो उगाचि बैसला होता : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेला जाए : जाए नां म्हणे : " एकु वेळ पाठवणीं दीधली : दोनि वेळ दीधली : तीसरेनी दीधली : परि तो न वचेचि : तवं भेटीसि नारीएळें आलीं होतीं : तें गोसावियां पुढें असेति : गोसावीं एकु नारीएळ श्रीकरीं घेतलें : मग गोसावीं म्हणीतले : " मेला जाए उठि उठि ना म्हणे : " म्हणौनि कोपु नटले : आणि नारीएळें दामुर्तातें हाणितलें : तो उठीला : घरासी गेला : भक्तिजनीं म्हणीतलें : " तेथ तरि तें केलें : आणि एथहि ऐसे गोसावीं काइ करूं लागले ! " म्हणौनि भेवों लागले : मग गोसावियासी मर्दना मादणें जालें : पुजा आरोगणा जाली : मग पहुडु जाला : मग भट म्हाइंभट पडीताळावया गेले : भट म्हाइंभट आले म्हणौनि दामुर्त उठीला : बैसावया घातलें : मग बैसले : मग भटीं म्हणीतलें : " दामुर्तो ! तुमचें कपाळ कैसें असे ? " तीहीं म्हणीतलें " बरवें असें : हें नव्हे : राउळ आतांचि पडीताळावया आले होते : श्रीकरें कपाळ स्पर्शीलें : मग म्हणीतलें : ' आवो मेला जाए : दुखावला म्हणे : ' तें माझें दुख नीरपौनी गोसावीं फेडिलें : ' आवो दुखवलासि म्हणे ' म्हणौनि श्रीकरें माथा स्पर्शीला " : मग भटां म्हाइंभटां थोर सुख जालें : मग भटीं म्हणीतलें "गोसावियांसि मर्दना मादणें जालें : पुजा आरोगणा पहुडु जाला : संदी पडिली मग आम्हीं आलों : " मग दामुर्तें म्हणीतलें : " हा भटो ! आंणीकीं आवांचीका धुरांचां ठांइं पाठवणी दीधलेया अवघि बैसों न ये : ऐसे जरि तयाचा ठांइं तरि गोसावीं पाठवणी देतां मीं न वचें : एकु वेळु पाठवणी दीधली : दोनि वेळ दीधली : तीसरेंही दीधली : परि मीं न वचेंचि : मग गोसावीं सीक लाविली : माझी खोडी सांडविली : " ॥ १०९ ॥

## ( ४ ) गोविंदप्रभूचा विऱ्हावो स्वीकारु ॥

एकु दी भक्तिजनें भीक्षेसि गेलीं होतीं : तवं तेलीण वोहुरासि बार्सींगें नेत होतीं : तीतें माहादाइसीं म्हणीतलें : " आवो तेलीणीं मेहरी : एक बार्सींग आमचेया गोसावियांसि दे : " मग तीशा आंगीक बरवें केलें : आणु ने गोसावियांचीये श्रीमुगुटीं बांधलें : मग गोसांवीं श्रीमुगुट हालवीति : आणि दोन्हीं तोंगलें हालवीति : " आवो मेली जाये · काकण बाध म्हणे : डाउ बांधावा म्हणे : हळदी उटावें म्हणे : तुरें बाजवावें म्हणे : तुपें पऱ्हीवे वाहावावे म्हणे : बौलें करावें म्हणे : माडौ घालावा म्हणे : " तुरें वाजों लागलीं : वडे मांडे केले : भातु वेळीला : वळिवट वेळिलें : तुपाचे सांगड आंणीले : मग इस्वरनायकें म्हणीतिलें : " गोसावियासि वीव्हायाची प्रवृत्ति जरि होइल तरि मीं आपुली कन्या देइन : " मग भगतजनीं गोसावियातें वीनवीलें : " जी जी : इस्वरनायक आपुली कन्या देत असेति : तरि गोसावीं स्वीकरावी जी " आंणि गोसांवी कोपु नटले : मग म्हणीतलें : " आवो मेला जाए : ना म्हणे" मग उगेचि राहीले : मग तुपाचे सागड उलवीले : आवघेयां लोका जेवणावळि केली : मग माहादाइसीं धवळे गाइले : गोसावीं म्हणीतलें : " आवो मेली जाये : गाए गाए म्हणे : " माहादाइसीं म्हणीतलें : " काइ गाओं जी ?" गोसांवीं म्हणीतलें : "आवो कृष्ण रुक्मीणि गाय म्हणे : तुरया थाट गाय म्हणे : " आणि माहादाइसासि स्फुर्ति जाली : इतुकेन रुक्मीणि-स्वयंवर गाओंचि लागली : " नीरुता लागला जीवीं : " हें कडीवें गाइलें : आणि गोसावीं म्हणीतलें : " आवो होवो होवो : नीरुता लागला जीवीं : " मग आबैसीं म्हणीतलें : " जी जी उठीजो जी : व्याळी कीजो : " गोसावीं म्हणीतलें : " आवो हें जेवीलें म्हणे : " आबैसीं म्हणीतलें : 'कवणी ठांई जेवीलें जी ' गोसांवीं म्हणीतलें : "आवो हें जेवीलें म्हणे : आवो हें रुकुमीणीचां राऊळीं :" " जी : तें द्वापर : आंणि हें कळियुग कीं : " आणि गोसांवीं हास्य केलें : मग आबैसी ताट केलें : गोसांवीं आसनीं उपविष्ट जाले मग माडे पुरीया : धारीया : वडे : उंबरें : ऐसे आवघें उलथ उलथुं अवलोकिलें : मग गोसांवीं म्हणीतलें : " आवो मेली जाय : भाकरि नाहीं म्हणे " आबाइसीं म्हणीतलें " जी जी : वऱ्हाडीं भाकरि कैसी जी ? " मग त्याऱ्ही दीस गोसावीं रुकुमीणि

सैंवर आइकीलें : चौथां दीसीं साडे जाले : मग प्रवृत्ति भंगली : ऐसा वऱ्हाडीकेसि आवघा गांऊं जेवीला : वैलैरें जेववीलें : साचोकारे तुपें पऱ्हीवे वाहावीले : मग वऱ्हाडीचें अण भक्तिजनें जेवीलीं होतीं : तें नासावयाकारणें अवचीती कटकै केली : ॥ २२४ ॥

## ( ५ ) माहेरास मुकलेली चक्रधराची लेक

सावळापुरी गोसावीयाची लेंकि होती : तिया घरीं आइकीलें : जें गोसांवी नीजधामा बीजें केलें : एकी वासना : तें पाणिया गेली होती : तेथ पाणिवठा आइकीलें : आणि पाणिवठा घागरि ठेविली : तें रीघौरेयासि आली : तें दुखें करूनि डोळां काइ देखे ना : आवघी वाट बापाकारणें रडीजे : तैसी रडत आली : तवं श्रीमूर्तिसि सर्वांगीं चंदन वोळगवीलें : फुलें वोळगवीली : तांबोळ ठेंचौनि श्रीमुखीं घातलें : नवा वोलि साउला श्रीमूर्तिवरि वोळगवीला पांघुरवीला : मग कीडडीएवरि सयन केलें : मग भट म्हाइंभट लक्ष्मींद्रभट चौथा कोणु तें नेणिजें : ऐसी कीडडी घेउनि गेलें : चींचेतळीं पूर्वीलीं पालवी उतरीली : नीक्षेपु खाणत होते : तवं पैलाकडौनि गोसांवियांची लेंकि आली : कीडडी देखीली : आणि धडकरि आंग टाकिलें : तें मुर्छना आली : तवं भट म्हाइंभट धावत आले : तेंहीं साउधी केली : मग हाळळ वीव्हळीं रडों लागली : श्रीमूर्तिवरि पडे : " माझें माहेर गेलें : " म्हणौनि आळाप आळापीं रडो लागली : ऐसें तिचें दुख देखौनि भट म्हाइंभट हृदयस्फुट जाले : आवघेया भक्तां थोर दूख जालें : भटीं म्हाइंभटी म्हणीतलें : " हें साचोकारी गोसांवियांची लेंकी होए : " मग भटीं म्हणीतलें : "आंमतें लाळिलें : ताळिलें : इस्वरु ऐसा प्रतीति : आम्हांसि एवढें दुख नांहीं : " मग नीक्षेपु खाणीतला : भटीं हातुभरि सुपवती कापिली : ते खालि घातली : वरि श्रीमूर्ति पहुडवीली : मग वोलि साउला पांगुरवीला : एकी वासना : उघडी श्रीमूर्ति : ऐसा नीक्षेप केला : मग भट म्हाइंभट मुक्षकरूनि आवघे भक्त मढासि निगाले : भट म्हाइंभट गोसावियाचे लेकीतें नेत होते : परि तें नवचेचि : चीर चोळी देत होते : परि ते नेंघेची : " आतां कांइ घेईन ? काइ माझें माहेर आहे ? : " मग ते गेली : मग भटीं म्हाइंभटीं विचारूनि म्हणितलें " माहाजन पाहाति : म्हणौनि : तेथौनि काढुनि तेया निक्षेपा दक्षीणे पौळीसी निक्षेप केला : काइ

इस्वरीचें पुर तें कर्पूरवत की : तरि राहिलें तें काइ ? नां तें कव्हणी एकीं हेतु म्हणौनि : मग माहाजनीं वरि देउळी केली :

—( गोविंदप्रभुचरित्र : ८,९७,१०९,२२४,३२५. )

★ क्र. ९

# स्मृतिस्थळ.

## ( १ ) भटोवासांचा अंतकाळ

एकु दिसु पंडितबासीं स्वप्न देखीलें : मढाबाहीर कोणिं खळीव साउला : मोकळे केश : ऐसी स्त्री एकि मढाबाहीरि : पौळीचा वोणिं : आता काइ करीन वो : ऐसें पुनः पुन शद्वीं रडो लागली : ते शद्ब पंडितबासाचा कानि पडति : कैसें काइ पां देखीलें : म्हणौनि गजबजोनि उठीले : बैसले : तवं ते शब्द कानिं पडताचि होते : मग तेथ जाउनि पाहीलें : तवं प्रकासु देखीला : येर कोण्हीं नाहीं : मग येउनि बैसले : उदयासीचि भटोबासापुढे साधीतलें : तरि भटो म्यां कैसें काइं देखीलें : यावरि भटोबासीं म्हणितलें : आता मज गोसावियांचा हाकारा येईल : ते ये स्थळींची देवता : तुम्हा सुचीक दाखविलें: तवं अवघेयासि दूख वाटलें ॥ २५८ ॥

एकु दिसु भटोबासीं म्हणितलें : आजि मज गोसावियाचा हाकारा येइल गा: तवं पंडितमुख्य : अवघे गजबजीले : कोण्ही काहीं निरुवणुकेचें पुसे : भटोबासीं म्हणितलें : हें ऐसें मज पुसों नको : कांहीं मज 'निर्वचन'— 'महावाक्य' —'उधरणीं' चें पुसा : मग पंडित पुसति : भटोबास निरूपिति : मग केतुलेनि काळें म्हणितलें : पंडिता : आतां पुसों नको : आतां अति सम्येक वर्तत असे : आतां तुम्हां पांचांस्या गुरुकुळातें हात जोडूनि म्हणत असें : गोसावियांचा व्यापारु चालविता कोण्हा माझें वेकास गेलें असेल : तरि तुम्हीं समस्तीं क्षेमा करावी : ऐसें म्हणौनि जये केलें : ॥ २५९ ॥

भटोबासां ईश्वरदर्शन :॥ मग भटोबासीं म्हणितलें : आता कोण्ही बोलों नको : रडों नको : अवसान जालेयां पाहार दीं हात लावूं नको : आतां मी श्रीचक्रधरा

बाइसांचेया देवातें आठवीतों : ऐसें म्हणौनि निजैले : आणि निगाले : ॥ मग वासनिकीं वीमान केलें : विमानिं ताट-तांबीये लाविले : वोवाळनियां घातलीया: वाद्यें लावीलीं : थैसे गंगेचिये थडिये आनिले : योगु–संस्कारु केला : ॥ शके ॥ १२२४ ॥ सुभकृत नाम संवत्सरे : ॥ : भाद्रपद वधि द्वादसि : भटोबासांसि ईश्वरदर्शन जालें : बतीसां वर्षा अनुसरण : च्यारि वर्षें गोसावियांचें सन्निधान : त्यांतु सा मास श्रीप्रभूचां सन्निधानिं । मग गोसावियांमागां श्रीप्रभूचां सन्निधानिं वर्षे १४ : मागां वर्षें १६ : येसें सा [स] टि वर्षें राज्य केलें : लीळादानिंचें आयुष्य ३४ वर्षें : ॥ २६० ॥

## ( २ ) म्हाइंभटाचे अमृते मायांबा होतात.

भटोबासांचा विभाग आइकौनि भटोबासांचे वडिल पुत्र महेस्वरपंडित आले : तेहीं पंडितबासां–केशोबासातें म्हणितलें : भटांचें धन असे तें द्यावें : तवं पंडितबासीं केशोबासीं म्हणितलें : ते महात्मे निवृत : त्यांतें कैचें धन : तवं महेस्वर पंडितीं म्हणितलें : नाहीं कैसें : अहे तें मी जाणतु असें : मग केशोबासीं पंडितबासीं म्हणितलें : असीलें तरि निवृत्ताचेया धना तुम्ही प्रवृत्त न पवा : तवं महेस्वरपंडितीं म्हणितलें : न पवे कैसा : न्याया चला : मां न्यायें होइ (ल) तरि द्या : तवं तेहीं म्हणितलें : न्याया तरि रायेरा–नांदेडा चला : ना यैसें तरि नासिका–त्र्यंबका चाला : मग केशोबासीं म्हणितले : माइभटो तुम्ही यासि न्यावो सांधों जा : महाजन देतील तें पत्र घेउनि या : हो कां : मग माइभट महेस्वरपंडित न्याव साधावेया निगाले : मग वाटे जातां जेथ राहाति तेथ माइभट महेस्वरपंडिताची श्रमनिवृति करीति : पाये धूति : भिक्षा करूनि बरवें जेऊं घालिती : महेस्वरपंडित म्हणाति : तुम्ही ऐसें काइं करितां : मज बळवंडें पाप घडवीतां : तवं माइदेवभट म्हणाति : तुम्ही गोसावीयांचेया संबंधाचे : आम्ही आपुली प्रसादसेवा करीतों : तुम्हां पाप काइसें : यैसीयापरी पेणें दोनि च्यारि गेले : मग महेस्वरपंडितीं म्हणितलें : मी पापीया : तुम्हा वीष होउनि प्रवर्तला : आणि तुम्हीं अमृत होउनि प्रवर्तलेति : आतां म्यां हारवीलें : तुम्हीं जीतीलें : आतां तुम्हीं गावां जा : तव माइभटीं म्हणितलें : मज पत्रेंवीण जावों नए : मग एकी गावीं संन्यासी महाजन बैसोनि महेस्वरपंडितीं जैतपत्र दीधलें : मग महेस्वरपंडित माइदेवभट उभेवर्ग पंडितबासां–केशोबासांपासि आले : मग

महेस्वरपंडितीं म्हणितलें : मी चुकलां : तरि तुम्हीं माझेया अपराधां क्षेमा करावी : म्हणौनि समस्तांसि साष्टांग दंडवत घातलें : आणि माइदेवभट मज अमृत होउनि प्रवर्तले : तरि तुम्हीं समस्तीं आजिलागौनि यातें 'अमृते माइभट' येसें म्हणावें : तैंलागौनि 'अमृते मायाबा' येसें म्हणति : ॥ १ ॥

## ( ३ ) कवीश्वरबासांची वृद्धावस्था

एक वेळ कवीस्वरबास आणि दांतिगोपाळबास अटणा गेले : कवीस्वरबासांचें देह थोर तुटलें : मग गोपाळबातें म्हणितलें : गोपाळा आतां फांकणि करूं गा : तीं मानिलें : मग फांकले : तवं केतुलेनि काळें कवीस्वरबासांची गति कुंठली : एकी कांटीतळीं राहीले : तवं हींडत हींडत गोपाळबास तया गांवासि आले : भिक्षा करूनि विजना तेचि कांटीयेपासि गेले : तवं तेथ कवीस्वरबासातें देखीलें : चिन्ह पालटीलें होतें : जवळि जाउनि पाहीलें : तवं वीस्मृति प्रवर्तली देखीली : ऐसा उदकाचा बोळा मुखीं पीळीला : तो स्वीकरीला : आणि नावेक सावध जाले : पुडती सावध केले : मग येसी वास पाहीली : तवं गोपाळबासांतें वोळखीले : डोळे आस्त्रपातीं भरीले : आहा गोपाळा : ऐसे कां केलें : तिहीं म्हणितलें : गोसावीयां प्रवृत्ति नाहीं ऐसें तुम्ही जाणा : ऐसांचि काळीं मजसी भेटि केली : तुम्हीं बहुतांसि धर्मरक्षेण : म्हणौनि उपंगळीये धरूनि उठवीलें : मग गावांत घेउनि गेले : एकी ठाइं ठावो पाहोनि आंथरुण घालौनि निजवीलें : एकातें पुसीलें : येथ कोण्ही वैद्य असे : एकीं म्हणितलें : पैल घोडेया बैसोनि जातु असे : तैसेचि गोपाळबास लाहें तयापासि आले : पुढां उभेया ठाकौनि म्हणितलें :(आहो दुष्टें गाजीलें ते राबापुढें सांघीजे : आणि रोगें अडी (लें) : तरि वैद्यापुढें सांघीजे) : म्हणौनि मागील सांगीतलें : तेणें म्हणितलें : ते कोणे ठाइ असति : मग तो आला : कवीस्वरबासांचा हातु पाहीला : आणि म्हणितलें : यांसि रोग नाहीं : धातुसाम्य असे : येहीं सोखन केलें असे : कवणा कारणें तें हेचि जाणति : आतां यासि अन्न द्या : म्हणौनि तांदुळाचा भातु दूध पथ्य सांघितलें : गोपाळबासीं म्हणितलें : तेंही तुम्हीचि जाणा : मग वैद्यें दूध : भात : साकर ऐसें तिन दीं पथ्य सूदलें : कवीस्वरबास सावध जाले : मग गोपाळबासीं म्हणितलें : म्यां तुमची जाणिव यांपुढें सांघितली असे : तरि याहांसीं कांहीं बोलावें : मग

कवीस्वरबासां कांहीं गीतावाक्य वाखाणीलें : येतुलेनि तेणें आपुलीयें मार्गीचा उपदेशु द्यावा : म्हणौनि सष्टांग दंडवतें घातलें : तवं कवीस्वरबासीं म्हणितलें : उठा : आम्हीं आतांचि काइ जात असों : म्हणौनि उठवीलें : मग येरी दीं सकाळिं न पुसताचि निगालें : ॥ ९ ॥

## ( ४ ) विरक्त लुखाइसा

लुखाइसें तिथें बाबुळगावकरें : भटोबासांपासौनि श्रवण जालें होतें : तिथें सकळ भोगापासौनि विरमली : उदासीनता असति : ताक भात जेवीति : संग्रहें तोडगाळसुरीवाचौनि अवघेचि तेजिलें : भातारु वर्जिला : गंगे जाति . स्नान करीति : नावेक बैसति : अनुष्ठान करीति . यापरी असेति : आपणचि जाउनि भातारासि बरवी उपवर नोवरी पाहीली : भाताराचा वीवाहो केला : मग एकु दीसु गंगे आघोळिसि म्हणौनि आली : तैसीचि बाहीर-बाहीरी भटोबासापासि निंबेयासि आली : भटोबासासि भेटली : भीक्षा केली : भीक्षा देता भटोबासीं शोधनी करवीली : तेहीं मागील व्रत—नेमु साधितला : मग बाइसाचेनि सांगातें परमेश्वरपुरा पाठवीलीं : सवेंचि मागीलाकडौनि धावणें आलें : भटोबासासि म्हणितलें : भटो येथ लुखाइ आली . ते आम्हासि भेटवा : भटोबासीं म्हणितलें . येथ नाहीं : पाहा पा . म्हणौनि परीहार दीधला : आणि ते निगाले : आपुलेया गावा गेले : लुखाइसें ऋद्धिपुरासि गेलीं : ऋद्धिपुर नमस्करीलें : वरिष—दीस उत्कर्षें वैराग्य केलें : देह थोर तुटलें : मग वरीखा एका भटोबासाचियें भेटीसि आलीं : भेटि जालीं : मग एकु दीसु तयाचें अती दृढत्व जाणौनि भटोबासीं म्हणितलें : लुखाइसें आता यैसीचि तुम्ही बाबुळगावा जा . तेथ भीक्षा करा आणि या . मग लुखाइसें बाबुळगांवा गेलीं : भिक्षाअवसरीं तयाचि घरा गेलीं : तवं तो दारीं बैसला होता : तेणें नोळखोनि म्हणितलें : आइ दंडवत . लुखाइसीं म्हणितलें : आमतें वोळखतां : आणि तेणें ऐसें वोळखोनि म्हणितलें : होय वोळखतों : आता दुसरें दंडवत : म्हणौनि साउमा आला : माथाची पाग फेडीली : आणि लुखाइसांचीया पायावरि भावपूर्वक डोइ ठेवीली : बैसों घातलें : ताटीं पाये धुतले : पायेवणि भीतरि घेतलें : कपाळीं लावीलें : मग लुखाइसीं माघौतें येउनि भटोबासांपुढां सांघितलें : भटोबासां थोर सुख जालें : ॥ ९७ ॥

## ( ५ ) केशोबास पंथ राखतात.

अनिष्टत्यागीं केशवुमार्गरक्षणानुवादु ॥ एकवेळ केशोबास अटना एकलेचि गेले होते : तवं अन्नकाळ पाणि लागलें एका गावां भीक्षे गेले : तवं एकी घरीं वेव्हारेयाची कन्या तिया देखीलें . केशोबास रूपें सुंदर होतें : देहयुक्त होते · तिया मनिं अभिळासिलें · आपणाचि भीक्षा घातली : आणि पुसिलें · कोठें असणें : तिहीं यैसा माथेयाचा अनुकारु केला . आणि उदासीनताचि चालिले · तिया वीळवेऱ्हीं दृष्टीचें राखण घातलें · तवं वीळचा प्रजन्य आला: गावांतु वेसेसि लिंगाचें देउळ होतें तेथ वीळचा निद्रास्थाना आले . सरीसां इउला यैसा फुटा होता : तो पुढां ठेउनी एकी कोणी बैसले : गुरवु रात्रीं घरा गेला · तेणें देखीलें होतें परी उगाचि नीगाला . तवं केतुकेया एका काळां ते बाइ कांबळयाची बुंथि घालूनि देवळांतु आली · यैसें पाहीलें . तवं केशोबासातें देखीलें : आणि जानुवरि बैसली : केशोबासीं म्हणितलें · उठा : तुम्ही म्हणाल तें आइकों म्हणौनि खालि बैसवीलि · आणि तिये बाइयेतें म्हणितलें : मी उवायां जातों . तुम्ही येथ यैसीं बैसा : म्हणौनि फुटा . काहीं परीग्रहो होता तो तैसाचि ठेवीला · तिथेसि विस्वासु वाटला : ऐसे देउळाबाहीरी निगाले आणि तैसेचि 'श्रीचक्रधरु' म्हणौनि चालीले : तिया बाइया यैसी नावेक वाट पाहीली : नैयेती यैसें मान जालें . आणि भीयाली · ते आपुलेया घरा गेली : तिये दीसीं केशोबासीं राणी पाठीं घातली : आणि येरी दीसींचि भटोबासांचीये भेटि निगाले : तव सकाळि भटोबास तथा समस्त मार्गु आस्थानि जाली असे : धर्मवार्ता होति असे : येतुलां काळीं भटोबासीं म्हणितले : केशवद्या येतु असे : फुटा देउळीं सांडिला असे : तव समस्तीं म्हणितलें : भटो केवि जाणितलें : भटोबासीं म्हणितलें · मी श्रीचक्रधराचेनि प्रसादें जाणे गा : तवं केशोबास आले : भेटि जालीया : पुढां बैसों घातलें : मग भटोबासीं म्हणितलें : केशवहो : तुम्ही कैसीयापरी आलेति तें आम्हा सांघा : मग केशोबासीं अवघें वृत्तांत सांगितलें : येतुलेनि भटोबासीं म्हणितलें : एकें अनिष्ट आलेयां आपणयांतें राखीलें : एकें एकांतें राखीलें : केशवदेनि मार्गातें राखीलें गा : यैसें भटोबासीं प्रसंसीलें :

मग भटोबासीं केशोबासातें म्हणतलें : आतां तूं माघौता तेथ जाये : केशोबासिं मानिलें : केशोबासिं आपुला मनिं म्हणितलें : हें देह येतुलेयासि कारण : मग माघौतें गेले : अटंनाचेनि क्रमें : देह तुटलें : अत्यंत अप्रास्थ केले : मग तयाचि गावां तिये बाइचेया घरा भीक्षे गेले : तंव समैचि ते उभी असे : केशोबासातें देखीलें : आणि यैसी पचकरूनि थुंकली : भनंग म्हणौनि स्वभावीकचि : आणि घरांतु गेली : येतुलेनि केशोबासीं बाहे आफळीली : हा नव्हे मी श्रीचक्रधराचा केशवद्या ? : म्हणौनि नावं सारीलें : ॥ शोधु॥ तैसेचि तया गुरवाचेया ठाया गेले : तेथ फुट'मुख्य अवघेचि दीधलें : गुरवें ठेविलें होतें : ॥ मग केतुलेनि काळें भटोबासांचीये भेटी आले : तंव आधींचि भटोबासीं म्हणितलें : केशोद्या येतु असे गा : काळातें पाठीमोरे करूनि : मग येउनि माधौतें सांधितले : भटोबासां थोर सुख जालें : यावरि भटोबासीं म्हणितलें : एकलेया अटन न करावें गां : एकवेळ मी अटनिं वीळीचां निद्रास्थाना एका देउळा गेलां . तव तेथ जोगिणि एकि आली : तिया म्हणितलें : या : पिंडें पिंड खेळों : तवं मीयां म्हणितलें : जाये परतें : आणि तेथौनि निगालां : त्या म्हणितलें : पळतां काइ तुमचें पोतें जाइल : मीयां म्हणिनलें : पोतें जाईल तें माझेंचि किं : तुज असावें : मां जावें : यैसें म्हणौनि आणिका निद्रास्थाना गेलां : म्हणौंनि अनुभवीचि गोष्टि सांगीतली : म्हणौनि एकलेया अटन न करावें गा : मग दोघदोघीं दादा : आणि चौघचौघी बाइ : यैसी व्यवस्था केली :

## ( ६ ) म्हाइंभटकृत ' लीळाचरित्रा 'ची रचना

म्हाइंभट अटनवीशेषें खेइभटांचेया गावां गेले : तेथ तयांसि भेटि जाली : म्हाइभटां हेतु : जें गोसावियांचीया लीळा शोधावीया : तवं खेइभट कृषी करावेया जाति : त्यांसरीसे म्हाइंभटही जाति : खेइभट कृषीकर्म करीति : आणि म्हाइंभट तयां मागां मागां गोसावियांचीया लीळा पुसति : खेइभट सांघति : त्या म्हाइंभट नमस्करूनि घेति : मग भिक्षा करूनि जेवीति : त्यांचें कांहीं नेघेति : एकु दीसि म्हाइंभटीं म्हणितलें : खेइभटो तुम्हापासि प्रसादाचि रोटी असे ते धूनि पाणि पाजा : तवं तेहीं म्हणितलें : आमचें कांहीं घेयाल तेरि पाजूनि : मग ( म्हाइभटीं ) म्हणितलें : घेइन : मग तीं प्रसादाचि रोटी

धूनि म्हाइंभटा उदक पाजीलें : मग म्हाइंभटीं तयांचें कांहीं अंगीकरीलें : मग निगाले : भटोबासांपासि आले : ॥ १४० ॥

मग म्हाइंभटीं भटोबासांपुढां अवघें सांघीतलें : गोसावीयांचीया लीळा शोधूनि आणिलीया : तिया संवादिलीया : होये तें भटोबास मानिति : नव्हे तेथ म्हणति : हे श्रीमुखीचे शब्द नव्हेति : हे होति : मग म्हाइंभटातें म्हणितलें : उपाध्याचिये अनुभवीचिया त्या उपाध्यातें पुसावीया : नाथोचिये अनुभवीचीया तिया नाथोतें पुसावीया : साधांचीये अनुभवीचीया तिया साधातें पुसावीया : यैसीयाचिपरी ज्याचीये अनुभवीचीया त्या त्यातेंचि पुसावीया : यैसें भटोबासीं म्हाइंभटातें विहीलें : मग म्हाइंभटबासीं तैसेंचि करूनि मागीलाचिपरी भटोबासीं संवादिलीया : मग उत्तरार्ध–पूर्वार्ध दोनि विभाग केले : ॥ १४१ ॥

एक वेळ म्हाइंभट लीळा शोधीत प्रतिष्ठानासि गेले : सारंगपंडीतासि भेटले : तेहीं अभ्यागता प्रार्थू आदरीलें : तवं म्हाइंभटीं म्हणितलें : आधीं मज गोसावियांची लीळा सांघा : मग घेइन : तिं आधीं गोसावियाचि लीळा सांघितलीया : तवं उमाइसीं क्षीरप्राधान्य अवघें निफजवीलें : म्हाइंभटासि ताट केलें : अनुज्ञासमै म्हाइंभटीं म्हणितलें : गोसावियांचेया प्रसादाचा लाडु घालाल तरि जेवीन : मग उमाइसीं प्रसादाचा लाडु चूर करूनि क्षीरीवरि घातला : मग म्हाइंभटीं लाडुवाचिया सेवा वेंचूं वेंचूं खादलीया : वरील क्षीर घांस दोनि जेवीले : आणि वमनाचेनी मीसें उठीले : भिक्षा करूनि गंगेसि जेवीले : मग भटोबासांसि भेटावेयासि आले : अवघे सांघितलें : मग भटोबासीं म्हणितलें : आहा म्हाइंभटो अनुचीत केलें : ॥ १४२ ॥

## (७) म्हाइंभटाचें देहावसान

एक वेळ म्हाइंभट अटना गेले होते : तवं अटनिं तयांसि असक्ति उपनली :॥: शोधु : तेणेंचि प्रांतें उमाइसें आलीं होति : तवं म्हाइंभटांसि भेटि जाली : तयांतें म्हाइंभटीं म्हणितलें : उमाइ तुम्हीं मज ऋद्धिपुरासि नेयावें : तिहीं म्हणितलें : हो कां म्हाइंभटो : नेइन : मग उमाइसांपासि वांकि सांखळेयाची मुदी होति : ते तिहीं गाहाण घातली : मग मोलें दांडि करूनि ऋधिपुरासि आणिलें : महाद्वारीं दांडी उतरली : म्हाइंभट आले आइकौनि भटोबास साउमे

आले . माहाद्वारापासि भेटि जाली : भटोबासांतें म्हाइंभटीं म्हणेतलें : भटो निडळावरि पावो ठेवा : म्हणोनि भटोबासांचा पावो हातीं धरिला : भटोबासीं म्हणितलें : निडळावरी श्रीचरणु तो गोसावियांचा किं : मियां निडळावरि हातु ठेवावा कीं · म्हणौनि हातु ठेविला · ॥ शोधु ॥ : मग जगतीआंतु आणिले : बरविये टाइं ठावो केला : ॥ मग एकु दीसु म्हाइंभटीं भटोबासांतें म्हणितलें : भटो मज देवो होइल ?. तव यैसें येहीं का म्हणितलें : म्हणौनि भटोबास नावेक उगेचि राहीले : तवं तेणें तयां अधिकचि दुःख वाटलें · म्हाइंभटीं म्हणितलें : मीं पापीया · मज देवो काइ होइल ! : म्हणौनि दुःख केलें : मग भटोबासीं म्हणितलें म्हाइंभटो तुम्हासि दोहिं देवांचें सन्निधानदास्य : आणि तुम्ही ऐसें कां बोलीलेति · म्हाइंभटीं म्हणितलें : भटो तुमचेनि मुखें अन्यथा न निगे कीं : भटोबासीं म्हणितलें · जैं गोसावी निंबासां राज्य करित होते : तैं तेथ तुम्ही महाजनांसरिसें आले होतेति : आणि गोसावियांचें दर्शन नेघत गेलेति : तेव्हेळी मीयां कटाक्षुनि गोसावियातें म्हणितलें : जी जी गोसावियांचा म्हांथा आला होता · परि दर्शना न येचि : यावरि गोसावीं म्हणितलें · न यो कां गा : येइल तैं तोचि येउं जाणैल कि · यैसा गोसावीं तुमचा निर्वचु केला : तुम्हां जरि देवो नव्हे तरि कोण्हाहीं देव नव्हे · म्हणौनि तुम्हां देवो होइल : यैसें भटोबासीं निर्वचीलें · मग म्हाइंभटीं म्हणितलें : माझें काहीं वोखटें नेघावें : म्हणौनि हात जोडूनि निडळावरि ठेविले · आणि माझा निक्षेपु चणाख्यपासि करावा : येतुलेनि म्हाइंभटांचें देहावसान जालें : मग भटोबासीं तेथ निक्षेपु केला ·॥शोधुः॥ भटोबास—मुख्य अवघेया थोर दुख जालें : मग तैसोचि भटोबास गंगातीरा निगाले · ॥१९८॥

★ क्र. १०

# पूजावसर—चक्रधरांची दिनचर्या

## ( भावे देव व्यासकृत )

॥ श्रीपरेशाय नमः ॥ नीत्यदीनी लीला : डोंबेग्रामीं तीनि मठ : एकु पूर्वाभिमूखः एकु उतराभिमूख : एकू दक्षीणाभिमूख : तीये दक्षीणाभिमूखे राजमठीं : सर्वज्ञास

अवस्थान : रीगतां डावेया हाता : पश्चीमीली भींतीसीं : उतरदखीण ओटा : तया ओटेया वरि : सर्वज्ञास : पहुडु होए : नागाम्बा : उपाणहौ पालवें गुंडौनि . आपूले उसीसा : कां आडवांगीं ठेविति : पाइतेया कडे खालि नीजेति : पस्चातपाहारों : सर्वज्ञा : उपहुड होए : इखीति खांकरिति : नागाम्बे : सूजगरें होति : साउमीं एति श्रीचरणा लागति : श्रीचरणीं उपानौ ओळगवीति : दुसरेया श्रीचरणा लागति : श्रीचरणीं उपानौ ओळगवीति : नागाम्बा : पूढें जाति : कवाडाचिया खीळी फेडीति : कवाड उघडीति . चक्रधर : बीजें करीति : तवं भटोबास उंबरा उसीसें करूनि वीसंवले असति : स्यालेया चे चाऱ्ही मास भीतरिं नीजति : उंबरा उसीसें करीति : उन्हाळे पाउसाळे बाहीरि नीजति उंबरा उसीसें करीति : सर्वज्ञ दोन्हीं दारसंका दोहीं श्रीकरीं धरूनि एकू श्रीचरणु ( भट्टाचेया ) वक्षेस्थलावरि ठेवीति : एकू उंबरवंटा वरि ठेवीति : भटोबासां जाड्य आलें असे : चक्रधर : श्रीचरणी चेनि आंगुठेनि वक्षेस्थळ दाटीति . भट जागे होति . श्रीचरण हृदइं सीं धरीति : आळंगीति : लल्लाटा वरि ठेवीति : नमस्करीति : मोमे देति : दुसरा श्रीचरणु मागथि : हृदइं सीं धरीति : आळंगीति : लल्लाटा वरि ठेवीति : नमस्करीति : मोमे देति : ऐसे वीळास करीति : भटोबासां सिं सूख थोर होए : तया सूखा परिमाण कव्हणी चि नेणति : तेया सूखा परिमाण भटोबास चि जाणति : श्रीचरणु कांहीं केलेयां सोडुं न सकति : चक्रधर : वाड वेळु एकें श्रीचरणें उभे असति : आणि परिश्रया ची प्रवृति म्हणौनि सोडीति : कदाचीति नागम्बा : म्हणति : सोडि सोडि नागदेया : बाबा सि उशीरू होतु असे : मग सोडीति : परीकडे : नागंबे दीपू उजळेति : मढु झाडीति : ओटेया वरि सयनासन असे : तें पद्मासन रचीति : उस्णोदका ची तांबतौली : बहीरवासा ची घडी : घेउनि दारवंठां उभी असति : चक्रधर : परीश्रयो सारुनि उभे होति : भटोबास साउमे एति : नागंबा : भटोबासां चा हातीं उस्णोदका ची तांबतौली बहीरवासाची घडी देति : भटोबास : चक्रधरा : ओळगवीति : कदाचीत भटोबासां जाड्य आलें असे : तरि : नागंबे चि ओळगवीतिं : चक्रधरा : उस्णोदका विनियोगु होए : चोखटु बहीरवासू वेढीत भीतरि बीजें करीति : आसनीं उपवीष्ट होति : बाइसें पालवें श्रीचरण परिमार्जीति : आसना वरि : ठेवीति : दुसरा श्रीचरणु पालवें परिमार्जीति : आसना वरि ठेवीति :

चक्रधर : स्वासनीं उपवीष्ट होति : तवं एकीकडे भटोबासां जाड्य आलें असें : तें परीहरे : चक्रधर म्हणति : बाइ रात्रि वडील असे : एत्रढेया वेळा बापूडें वानरें कें जाइल : बोलावा आरौता : ऐसा : चक्रधरां : चा शब्दु आइकति आणि एति · कदाचीति बाइसें म्हणति : ये नागदेया बाबा येथ आले असति : कदाचीत : चक्रधर : म्हणति ' या गा वानरेया : हें येथ आलें असे : भटोबास एति · श्रीचरणा लागति : पासि बैसति · समस्त भक्तजनें ऐति : श्रीचरणां लागति : पासि बैसति : सर्वज्ञास नीरूपणा ची प्रवृति असे : तरि : चक्रधर : नीरूपण करीति : ना रात्रि वडील असे : तरि पहुडु होए : ना तरि आसनीं नीश्चल बैसति : मागसें प्रस्नु करीति : जी जी आम्हीं : चक्रधरा तें चींतु : चक्रधर : काइ चींतीति : चक्रधर : म्हणति बाइ हें सकल जीवां तें चींती : कदाचीत : बाइसे · प्रस्नु करीति : बाबा आम्ही बाबा तें चींतु : बाबा काइ चींतीति : बाइ हें श्रीप्रभुची थापु चींती : हे खाडणी पस्यात पाहारीं आठवावी: तवं : अरुणोदयो होए : आधीली दीसीं भटोबासीं सीळीका दोनि आणुनी ठेवीलीया असति : आंबीया चीश्या · जांबूळी चीया : कदाचीत बोरी चीया : त्या दोन्ही : चक्रधरां : चा श्रीकरीं ओळगवीति : चक्रधर : एकि जानु वरि ठेवीति : एकीं दंतधावन करीति : दंतधावन करूं सरे : तें परीत्यजीति : दुसरी घेति : ते डावीये श्रीकरीचेया आगुठेया चेनि नखें : चीरूनि दोनि फोडि करीति : एकि आंगुळीया मध्यें धरीति : एकि धनुषाकार वळीति : त्या जीव्हामळ आकर्खीति : जीव्हामळ आकर्खूं सरे : आणि परीतेजीति : दुसरी घेति : ते ही धनुषाकार वळीति : जीव्हामळ आकर्खीति : जीव्हामळ आकर्खूं सरे : आणि परीत्यजीति : बाइसे पालमंडें उस्नोदकाची तांबतौली आणीति : मग : चक्रधरा : गुळळा होए : श्रीमूखप्रक्षालन होए : श्रीकर प्रक्षाळीति : श्रीकरीं सपूरु दाटणा ओळगवीति : श्रीमूख परमार्जीति : श्रीकर परमार्जीति : बाइसे श्रीचरण प्रक्षाळीति : पालवें परमार्जीति : आसना वरि ठेवीति : दुसरा श्रीचरणु प्रक्षाळीति : पालवें परमार्जीति · आसना वरि ठेवीति : चरणोदक असे तें समस्तां भक्तजनां प्रसादु होए : तेथ उदका चे बींदु बींदू पडले असति : ते पालवें परमार्जीति : तेथ : दोनि पद्में रेखीति : बाइसें बाहीरि जाति : हात पाए धूति : तोंड धूति : सूत्रेळें वस्त्र वेढीति : भटोबास गोपीचंदन उगाळीति : बाईसें गोसांवीयां चां भालप्रदेशीं

गोपीचंदना चा उर्धपौड्रटीळा रेखीति : आधीळां दीसीं पुष्पें आणुनि : घागरी वोलां दाटणां गुंडुनि ठेवीलीं असति : तो गळदंडा श्रीकंठीं ओळगवीति : श्रीमुगुटीं मुगुटमाळ : मोकळयां पूष्पां ची पूजा करीति : श्रवणीं झळबुंके : बाहुभूषणें : कळीकां चे हातसर : श्रीकरीं फुलां चा झेला ओळगवीति : धुपटणां आंगारा आणीति तया वरि दसाग धूपु घालीति : बाईसें : पांचै वाती उजळीति : आर्ती पालमंडां ठेवीति : चक्रधरा : धुपार्ती होए : मंगळार्ती होए : "जयतु मंगळमंगळा परममंगळरूपा" हे जतु ओळगवीति : बाईसां सि आठै सात्त्रीक प्रकटेति। बाइसांचे हातिचें पालमंडें थरारीलें देखौनि : चक्रधर : म्हणति : वाणरेया बाइसां चिए हाति चें पालमंडें धरा गा : भटोबास बाइसां चिए हाति चें पालमंडें धरीति : बाइसें हातांतु हातु सीरुनि नीरांजन करीति : खालि पालमंडें ठेवीति : सर्वज्ञास फोडी ओळगवीति : वीडीया करूनि देति : परि हातिचा कंपू जाए ना : भटोबास मंत्र-अवसरू (पुरुषसूक्त) म्हणति : चक्रधर · चुकि लावीति : चक्रधर : म्हणति हांगा येथ कोण्ही सामक नाहीं : सामक ते एथ वेळा दोनि तीनि आवर्तिजति कीं : जी जी नाथोबा तीथि वारू जाणवीति : या परी सपूजीत श्रीचक्रधरू आसनीं उपवीष्ट असतिं : ॥ ० ॥ उदयां चा अवस्वरू हे दुसरी खांडणी :

उदेयां चा पूजाअवसरू जालेया नंतरें : सपूजीत : चक्रधर : आसनीं उपवीष्ट असति : भटोबास प्रवृत्ति जाणौनि : श्रीचरणीं उपाणौ ओळगवीती : चक्रधर : राथांगणीं उभे ठाकति : भटोबास आंगीटोपरें सरीसें करूनि आणीति : दुनीचीया आंगीचीया बाहीया एकें वेळें लेववीति : कसेयां सि गांठी मारिनि : श्रीमूगुटीं टोपरें ओळगवीति : फुटा परावर्ण करीति : उन्हाळे दीस तरि एकू सोगा एकी कडे : एकू सोगा एकी कडे : स्याळे दीस तरि खोलबूंथि घालीति : पाउसाळे तरि चांदोवा धरीति : बाइसें कर्णीकी तीमीति : तादुळे भीजत घालीति : वीसदेया सेगि लावीनि : पुडुवाटोवा घेति : जाडी सागळ घेति : बाहीरि एति : मढाचें कवाड बांधति : का कोण्ही एकु राखण ठेवीति : चक्रधरां पासि एनि : चक्रधर : बाहीरि उभे ठाकति : दीसा अवलोकीति : अमंगळा असाने : तिया मंगळरूपा होति : चक्रधर : म्हणति खेळों जाइजैल केउतें : कोण्हीं कोण्हीं कडे म्हणति : कोण्हीं कोण्हीं कडे म्हणति : बाहुल्यें भटोबास प्रवृति जाणति : भटोबास ह्मणति तेउतें : चक्रधर बीजें करीति :

भटोबासीं आधीलां दीसीं एकाधें वीहरणस्थान पाहुनि ठेवीलें असे : कदाचीत कमळार्जूना कडे : कदाचीत छीन्नस्थळीये कडे : कदाचीत पींढाकडे : कदाचीत एकाधें वाळुवंट : तेथ चक्रधर · बीजें करीति : नागाम्बा : आसन रचीति : चक्रधर आसनीं उपवीष्ट होति : नागाम्बा पाश्वें श्रीचरण परमार्जीति: आसना वरि ठेवीति : दुसरा श्रीचरणु पाश्वें परमार्जीति · आसना वरि ठेवीति हें खांडणी विहरणीची · चक्रधरा नीरूपणाची प्रवृति : तरि नीरूपण करीति : नां तरि धांवडीति : पव्हडीति जुंझवीति : दरे दरकुटे बूजवीति : उंचें टेंकें असति : तीयें समस्तलें करवीति : पाषाण फोडवीति : ऐसें नानापरि वीहार करीति : या परी एकें कमें नासीति · तवं उष होए : चक्रधरां : चा भालप्रदेसीं स्वेदा चे बींदु बींदु ऐसे एति : ते मोतीयां चे कण ऐसे मीरवीति चक्रधर : तांबूळ प्रतेजति : गुळळा करीति : नागम्बा · फोडी ओळगवीति · वीडीया करूनि देति : तांबूळ असे तें भक्तजना प्रसादु वाटीति : मठीं असे तया कारणें बाइसें पाळवीं बांधौनि ठेवीति : नागाम्बा वीनवीति : बाबा उसीरू जाला · मठा बीजें कीजे ना · चक्रधर उगे चि असति :चक्रधरा: प्रवृति होए: तेव्हळि बीजें करीति: कदाचीत: चक्रधर भटोबासां चीया खादा वरि : लोंबता श्रीकरू : कदाचीत खोळबुंथि : कदाचीत वरि चांदोवा : चक्रधर · बीजें करीति : नागाम्बा · पूढें जाति · अंतु बाहीरि मढू झाडीति · बाहिरिला ओटेया वरि आसन रचीति : चक्रधर एति : आंगीटोपरें फेडीति · भटां हातीं देति : भट खूंटीये सूकत घालीति :

भीतरि ओटेया वरि आसन रचीति : कानवडा लावीति : ताट करीति : चक्रधर : भीतरि बीजें करीति : आसनीं उपवीष्ट होति : चक्रधरा : आरोगण होय : नागाम्बा : नींवलोण करीति : तुपभातु सहीत : दोनि साकवतीया : कढी ऐसी आरोगण होए : पोळी तरी चौतकोर : मांडा तरि दीड : पुरी तरि एकि : पाठीं ताका भाताची आरोगण होए : चक्रधरां ची श्रीमंत आरोगणा चक्रधरा : गुळळा होए : श्रीकर प्रक्षाळीति : श्रीकरीं चंदन ओळगवीति : चंदनें श्रीकर उलळीति : सकर्पूरा फोडी भटोबास : श्रीकरीं ओळगवीति : वीडीया करूनि देति : चक्रधर : भटां चा हातु धरूनि : आरोग्यवाउलीं : सत पदें वेढे करीति : बाइसें ओटा झाडीति : ओटेया वरि पद्मासन असे : तें सयनासन रचीति : चक्रधर : पहुडु स्वीकरीति : नागाम्बा : भीक्षान्न

काढीति : काला करीति : मूदा करीति : वरि प्रसादु ठेवीति : भक्तजना पांती प्रसादुभोजन होए : मग : उंच उंच मढाधि जाति : हें आरोगणाच्या अवसरा ची खांडणी : नागाम्बा : चरणसंव्हान करीति : घडीया च्यारि पहुडु होए : घडीया चौं उपहडौनि : उंच मढा बीजें करीति : तवं तें अन्य वार्ता करीत असति : तरि चक्रधर : राजमढा बीजें करीति : आसनीं उपवीष्ट होति : ह्मणति बाइ पोरें अन्य वार्ता करीत असति : नागाम्बा : ह्मणति बाबा केवि जाणति : बाइ हें तेथ गेलें होतें : भटोबास एति : बाइसा आजि : चक्रधर : तेथ बीजें नाहीं केलें : पोरेंहो अन्य वार्ता करीत होतेति : बाइ : चक्रधर : केवि जाणति : बाबाएं तेथ बीजें केलें होतें : भट मूख्य करूनि : समस्त भक्तजन : भीत भीत : चक्रधरां पाधि एति : चक्रधर : पूसति : काइ गा धर्मवार्ता करीत होतेति : खालौतीया माना घालौनि भुइ सीं रेधा काढीति : चक्रधर म्हणति : मरा मरा पोरेहो : तुम्हा पसि ढोरें चांगें : जेंचि चरति : तेचि रोंवतीति : एथौनि जाइजे : मा एथचिया चि कथा वार्ता कीजति कीं : अन्य वार्ते पधि नीद्रा चांग : वर निद्रा कीजै परि अन्य वार्ता न कीजे : सूख : श्रय : श्रृंघारू : यें तीन्हीं नाहीं ते काइ गा गोष्टि : तें अरण्यरूदन कीं ।।: ऐसें नीरूपण होए : एणें नीरूपणें सीं जाति : रात्रीच्या अवस्वरा ची हे खांडणी : नागाम्बा : नाथोबा कर्रावि दूध आणवीति : आळीवां दुधातु साकर तुप भात साकर ऐसी : चक्रधरा : व्याळी होए : नागाम्बा : उदक ओळगवीति : चक्रधर गुळळा करीति : श्रीकर प्रक्षाळीति : नागाम्बा : सपूर दाटणा श्रीकरी ओळगवीति : चक्रधर : श्रीमूख प्रमार्जीति :श्रीकर परमार्जीति : भटोबास श्रीकरीं चंदन ओळगवीति : चक्रधर : दोन्हीं श्रीकर चंदनें परमार्जीति : भटोबास सकर्पूरा फोडी ओळगवीति : वीडीया करूनि देति : रात्रीच्या आरोगणाची हें खांडणी : नागाम्बा : पद्मासन असें तें सयनासन रचीति : चक्रधर : आसनीं उपवीष्ट होति : भटोबास : नागाम्बा : जेउं बैसति : कांहीं पदार्थु आला असे : तरि भटोबास बाइसां तें म्हणति : बाइसेया : नागाम्बा : कांहीं पदार्थु आला असे : तरि बाइसें भटोबासां तें म्हणति : नागदेया घेया : चक्रधरां चा प्रसादु असे तो दोघें वांटुनि जेवीति : मग : चक्रधर : भटा प्रति परावर नीरूपण करीति : नीरूपण करीतां भटोबासां सि जाड्य ये : तरि : चक्रधर : सागळेचेनि उदकें : सींपवीति : एकू दीं नीरूपण होत असे : भटोबास

जाड्य आलें असे : नागाम्बा . कोण्हा व्यापारा गेली होती : तीयें आलीं : नागाम्बा : म्हणीतलें : बाबा नागदेया सि जाड्य आलें असे . तरि बाबा हें कोणा प्रति बोलत असति : म्हटलें : एथ प्रवृत्ति जाली तरि : स्तंभा एका तें नीमीत्य करूनि बोलीजैल : म्हणौनि : श्रीकरें स्तंभू त्राहाटीला : एकू दीसीं नीरूपण होत होतें : नागाम्बा : कोण्हां व्यापारा गेली होतीं : तीएं आलीं : तवं नीरूपण जालें : नागाम्बें : म्हटलें : बाबा हें नीरूपण म्या आइकीलें नाहीं : असें : बाइ बाणरेसां तें पूसा : भटोबास : चक्रधरा : पासि बैसले असति : बाइसें भटोबासां तें पूसों लागली : भटोबास बोलों लागले : नागाम्बें : म्हणितलें : हां बाबा हें होए : असें : बाइ : हा काइ आपूलें बोलैल : हा एथचें चि बोलैल कीं : हे रात्रीच्या पहुडाची खांडणी : एकू दीसीं नीरूपण करीतां : पाहातपटि जाली : भटोबासीं : म्हटलें : जी जी पाहालें असें : येथौनि तुम्हां पाहालें चि बहुत : पुरूषां : चीश भेटी युगें जाति : या वरि : चक्रधरें : पुरुषां : ची गोष्टि सांघीतली : कोण्ही एकू राओ : पुरुषां : चीये भेटी आला : आपूला पाइकू परीवारू : बाहीरि राहाउनि : आपण विडा घेऊनि हातीं भीतरि आला : तवं तेया : पुरुषां : ची काष्टी लागली असे : तथा समाधी लागली असें : काष्टी भंगैल : मग : वीडा वाइन : नमस्कारू करीन : म्हणौनि राहीला : काष्टी भंगैली : वीडा वाइला : नमस्कारू केला : मग : नीगाला : तेहीं म्हटलें : कें नीगालेति : ना पाइकू परीवारू : बाहीरि उभा असे : तेहीं : म्हटलें : तें युग चि गेलें नव्हे : या उपरि : बाइसीं : म्हणीतलें : जी जी : एकी बासना : बाइसीं म्हणितलें . ऐसे ते आमचे बाबाचि होति : चक्रधर : उगे चि होते : ॥३॥ हे नीरूपणाची खांडणी रात्रीच्या.

★ क्र. ११

# चक्रधरोक्त सूत्रपाठ

## ( १ ) आचार

स्वदेशसंबंधु त्याज्य : स्वग्रामसंबंधु त्याज्य : संबंधियांचा संबंधु तो विशेषता त्याज्य ॥ नावडत नावडत सेवी : तोचि आवडौनि ठाके : मग सांडितांहि न

संडे ॥ ऐसा विखो बापुडा : जो सेवित सांता आपुलेया मोहरा न करी ॥ विषय संबंधमात्रें जीवु काइ गा जातु असे : परि सेवित साता तिये एकीं गडदरा घालीं : जेथ काइसेनिहीं उधंत नाहीं ॥ पुरुषु जेतुल जेतुलीं विषयसेवा करी : तेतुल तेतुला धर्मी निबळ जाए ॥ बाइ . पाप तरि नव्हे . परि धर्मापासौनि ऐसा निर्पौनि काढी ॥ स्त्री भणिजे मत्तद्रव्याचा रावो गा : आणिकें द्रव्यें सेविलेयां माजवीति : स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी ॥ चित्राची स्त्री न पाहावी ॥ स्त्री दर्शनें माजवी : द्रव्य अस्तित्वें माजवी ॥ जेणें संबंधें विकारु उपजे तेयाचा असंबंधु कीजे ॥ विषयाचिये एकासनीं न बैसावें ॥ विषया साक्षी न ठाकावें ॥ कोमळ ज्ञानीं विखो विघ्न ॥ नरवीरु आति परि विषयवीरु नाहीं ॥ धर्मनष्टु आति परि विषयनष्टु नाहीं ॥ पुरुषु जवं जवं पळे : तवं तवं विखो पाठीं लागे : पुरुषु पाठीं लागे तवं तवं विखो पळे ॥ तुष्टला जनु : तरि विखो संपादील : रुसला तरि प्राणा घेतील : भणौनि : उभयता जनसंबंधु त्याज्य ॥ जाणतेया विखो सुखातें नेदी ॥ आपणेंयातें कव्हणी नेणे आपण कव्हणातें नेणिजे ऐसा स्थानीं असावें ॥ महाराष्ट्रीं असावे ॥ मतापुरा कोल्हापुरा न वचावें : तिथें साभिमानिये स्थानें साधकासि विघ्न करीति ॥ देशांचा शेवटीं झाडातळीं जन्म क्षेपावें ॥ तुम्हा शयनासनीं : भोजनीं : परमेश्वरुचि होआवा कीं गा ॥ एक दोनि वेळा यातें आठवीजे : परि वंध्यु दिवसु जावों नेदिजे ॥ गडीं सिडीं असावें ॥ हाळियां पाळियां असावें ॥ एका झाडाची सवे न होआवी : एका स्थानाची सवे न होआवी ॥ भोगस्थानीं न बैसावें ॥ लेपाचां देउळीं न बैसावें ॥ विषया पात्र न होआवें ॥ मनुष्यमात्र होउनि असावें ॥ जीवासि वैराग्य मिरउं आवडे हाही एकु विकारुचि कीं गा ॥ जीवु विकारा वेगळा केव्हेळाही जालाचि नाहीं ॥ बाइ : वेडेयाचे विकार ते बाहीरी प्रकटेति ॥ बाइ : स्वभावासि नाशु नाहीं ॥ हातीं काडी धरीजे हाही आदिकरुनि एकु विकारुचि कीं गा ॥ आचरे तेयाचा धर्मु ॥ नीरसा : निराशा : निराश्रया होउनि असावे ॥ कर्म : धर्म : विधि : विखो : परित्यजौनि परमेश्वरा शरण रिगावें ॥ वृत्ति अधीन न होआवें : स्थिति अधीन न होआवें ॥ विकारु हा इंद्रियधर्मु : विकल्पु हा मनोधर्मु परित्यजौनि परमेश्वरा शरण रिगावें ॥ मसनीचें लांकुड तेंही वरि एका उपयोगा जाए परि आपण कवणाचेयांही उपयोगां न वचावें ॥ तुमचेनि मुंगी रांड न होआवी ॥ तुम्हां

पडिलेयां धुळी न लागावी ॥ एथौनि तुम्हीं ऐसेया होआवें कीं हा जनु तुमतें डोईये डोईये मारील परि तुम्ही डोइचि ओडवावी कीं ॥ तुम्हां मारीतां पुजीता समानचि होआवा कीं गा॥ मुक्तीची चाड तेणें मुंगिये वीरु न चिंतावें॥ मुक्तीची चाड आणि तेवीचि खुंट दावें सांभाळणें ॥ आपण कव्हणा अधीन होआवें नाहीं : आपणया अधीन कव्हणाते करावें नाहीं : जीवें परमेश्वराधीन होआवें ॥ जन्मजीवीत परमेश्वरा देयावें ॥ ऐसा आसे वटो वटो करीतु आपुले च्यार्‍ही दीस कडे घाली : मग एकु दीसु नव्हेरे भणौनि जाओं लागे ॥ जोतेनि मृताचां धर्मीं वर्तावें ॥ घड तुटलेयांही जीवें परमेश्वरातें न सोडावें : वासना न संडावी खळाळीं मोकलावें ॥ हाडांची रांगवळीं करावी नाएका ॥ कटंकटियेमान होउन असावें ॥ सुखसाधनें देवो न पवीजे नाएका ॥ तेयाचें उठणें बैसणें इतुलेंही वाया न वचे ॥ चातुर्वर्ण्ये चरेद्भैक्ष्यम् . या शास्त्रासि अनुसरीजे ॥ घर न निवडीत भिक्षा कीजे ॥ वोळखतेया घरा न वचावें ॥ तोरणमंडळाचिया घरा न वचावें ॥ एकी कडौनि रिगीजे एकी कडौनि निगीजे ॥ एकी दी न मीळे दोनि दी न मीळे तिसरां दी न मिळोंचि न ये ॥ भिक्षा भणिजे पारधि गा ॥ भिक्षा राज्य बाइ ॥ आपणयां लागे तेंचि मागीजे कीं ॥ बाइ : तुम्हीं नित्योपवासिये कीं ॥ बाइ : मिनलेयाही न सेवीजे : मग तैसीचि सवे होए ॥ प्राणासि आहारु देआवा इंद्रियासि नेदावा ॥ इंद्रियार्थ रसु न सेवावा ॥ भर्दे भरौनि ठेवीजे : मागे तेव्हळीं घालीजे : नेघे तरि म्हणीजे : खासील तरि खाये : न खासील तरि धूळि खाये : मरों लागसी तरि खाये : मरों लागसी तेव्हेळीं आपसयाचि खासी ॥ परिछेदी प्रवर्तलेयाचे सकळही निरोध नेणोकोणाचि निपौनि फेडी ॥ पुरुषप्रयत्नीं दैवाचें साह्य : धर्माचिया चाडा रायाची राणी का न ये : वरि पडतें आकाशु धरीजैल : न भीया हो साधे हो तुम्हां वरि एथौनि वाजत वारा धरीजैल ॥ त्रसला सांता जीवु विषया शरण जाइल : अल्पें अनिष्टें बहुत अनिष्ट परिहरे तरि परिहरीजे ॥ पोरें हो : तुम्हीं काटेया अधीन होआवें ॥ नीरसें विरसें अन्नें सेवीजेति ॥ रेंदेया चेंदेया दरु भरीजे ॥ जेव्हढी पीसवी कीजे तेवढी होये ॥ धाये तवं खाइजे पाहे तवं निजीजे तैसे नव्हे की बाइ : पश्चात पाहारीं उठीजे : तो सारस्वत काळु : देवता हृदयासि ये ॥ तुम्हां बोडी गंगा समानाचि होआवी कीं गा ॥ मसनीचें वस्त्र घेपें : पोरें हो : तेयाचींचि वाट

पाहाल : जेंचि अंथरूण तेंचि पांगरू॰ ॥ ॰ांवाचा कडिसरां खांड देउळी एकी पाहिजे : तेथ श्वानकुंडली घालीजे ॥ तुम्हीं कां गा भिया : इये तुम्हां आपणपें न दाखवीति कीं : जरि हान भिशाल तरि मा कें रिगीजैल ॥ यें ऐसीं उघडीं नागिवीं दिसतें असति परि याची वीस कव्हणाही पाहों न ये : याही एकु अभिमानिये आति : तें जरि क्षोभलें होईल तरि मा काइ करीति ॥ ऐसें आहाचपण न कीजे कीं गा ॥ कां गा ऐसें भणाल : ऐसें न भणिजे कीं ॥ साधे हो : कव्हणातें काइ अधे हें सकळही देवाचें कीं : मा देवो दे तें आपुलें ॥ ऐसें कै होईल पोरां जीवा जें एथिचें तें आपुलें ॥ भ्रमत भ्रमतां भेटि का आपजौनि भेटि ॥ एकमेकां भेटलेयां हें भेटलेयाचा पाडु जाए ॥ श्रमनिवृत्ति कीजे ॥ एकत्र खान पान कीजे ॥ फाळुकां पाळटिजेति ॥ एथीचिया कथा वार्ता कीजेति ॥ सात पाच दीस एकत्र असीजे मग आपणालेया जाओं लागीजे ॥ तुम्ही अच्युत गोत्रीय कीं गा : तुम्हां परस्परें परमप्रीति होआवी ॥ बाइ परमप्रीति कीजे परि विशिष्ट बुद्धि न कीजे ॥ प्रीति विखो होइजे ॥ परस्परें मथन कीजे मग नूतन होए ॥ स्वोक्तिः शास्त्रोक्ति : लोकोक्ति : इया तीनी उक्ति परित्यजौनि एथीचिया व्युत्पत्ति व्युत्पन्नां होआवें ॥ हें अधीत शास्त्र कीं गा ॥ हें होउनि कवणाचें घर न रीगे : आपणाचि याचें घर रिगीजे ॥ या आपणपें दीजे तरि हें आपणपें दे ॥ घेइजे : घोकीजे : मग काळें करौनि उपयोगा जाये ॥ आतांचें तवं ऐसे घेपे : पाठीं अनुभवें जाणाल ॥ अन्यवार्तेपासि निद्रा चाग : निंद्रा वरि कीजे परि अन्यवार्ता न कीजे ॥ सुख : श्रेय : श्रृंगारु : इये तीनि नाहीं तें काइ गा गोष्टी : तें अरण्यरुदन कीं ॥ काम : क्रोध : लोभ : इयें तीनि नरकद्वारें ॥ वर्मस्पर्शं नरक : धर्मस्पर्शापासि वरि शिरछेदु चांगु ॥ पोरु जीवु आपुलें ओखटें गोमटें जाणे : परि जाणौनि चि करी ॥ पोरु जीवु आपुलें मात्रागमन न देखे : परि पुढीलाचें वेश्यागमन देखे ॥ बाइ : क्रियेसि अनुतापु पुरश्चरण ॥ राग : द्वेष : काम : क्रोध : मद : मत्सर : यांचा त्यागु याचि नावें संन्यासु कीं बाइ ॥ मनींचें अभिलाष निवर्तले तरि अशुचि शुचि इयें दोनि नाहीं नाएका ॥ अहंतेचें मूळ सकंदी उपडावें नाएका : एऱ्हवी अंकुर निगति : मग शांतीचें रोप लावावें ॥ एथीचेयां संबंधां गेले तेतुले ओटे गोटे आदिकरौनि तुम्हां नमस्करणीये कीं

गा : ।। आपुले सकळही निरोध परिहरौनि एथीचेयां संबंधीयांचेया संबंधा जाइजे : मग तो भणे तें कीजे ।। महात्मेनि प्रियवक्तेया होआवें ।। महात्मेनि सत्यार्जवा होआवें ।। बटिका एथ हांसतां ही लटिकें न बोलिजे हो ।। तुमतें महारोग न बधीति ।। तुम्ही महात्मे कीं गा : तुम्हीं सकळही भोगें निमानावें कीं ।। कव्हणी एकु हिरडा : बेहाडा दे : तरि ना न भणीजे ।। आपुलेया पंडिलेयाची शुश्रुषा कीजे ।। आपणेयापसि ज्ञाता विरक्ताचा संगु कीजे ।। धर्मा धरु दीजे ।। आर्ता प्रति बोलावें ।। लोहें पाणी गिळीलें ऐसें होउनि असावें ।। देवो माझा मी देवाचा ऐसेया परी असीजो कीं देमती ।। दासोहं न पुरे नाएका ।। तुम्हां गोविंदगति नाएका ।। हां गा रडिनलेयां काइ होईल : एणें खडकेंसि कपाळ घेया पां जरि होए : तो जेया परी होआवा तेयाचि परी होइल कीं ।। तैसें काइ देमती : जोन्हळे नाहीं तरि काइ अमेध्य पेवीं सों येइल : अन्न नाहीं तरि काइ विख खाओं येइल : तरि होत सांता हेंचि करीतां होइल कीं ।। बाइ आर्ति करौनि एथीची दसीचि धरली पुरे ।। साधे हो जीव ऐसे अधोमुख असति परमेश्वरु ऐसे वरिपहौनि पांति असति : एकाधा एकु ऐसी वरौती वास पाहील तरि ऐसाचि काढीजैल ।। पाडेया एथ अनुसराल तरि ऐसें चि काढीजैल ।। ते एथीचि खावुणी ।। हां गा एथ शरण आलेया काइ मरण असे ।। बाइ हे एथीचेया दर्शनाचि या चोंडा येति असे तरि इयेतें नेणोंकोणाचि तारील ।। आर्तातें परमेश्वरु वाडोवाडीं गीवसीति ।। पोळलेया सुनेयांचेया परी असावें ।। दांत असति तेथ चणे नाहीं : चणे असति तेथ दांत नाहीं ।। ज्ञानेंविण वैराग्य तें काइ करावें बापेया ।। पोरा जीवा एथौनि भणितलें तें न होववें मग मरणा शरण जाए ।। वोखटें करीत सांता कव्हणी गोमटेयातें न पवे : गोमटें करीत सांता कव्हणी वोखटेयातें न पवे ।। बाइ : पोरेया एका कारणें साता पाचांचा सासुरेवासु साहीजे : मा विश्वाचा पति परमेश्वरु तेणेंसि धरणें मांडिलें असे तरि जगाचा सासुरेवासु साहावा कीं ।। तुम्ही महात्मे कीं गा : तुम्ही चतुर्विधा भूतग्रामा अभय देयावें कीं ।। वोखटें केलें : ऐसे कीजे : ऐसा प्राणिया धर्मापासौनि काढीजे ।। बाइ प्राणियांचेया इष्टा आड न एइजे कीं ।। बाइ प्राणियांचे दोष एथ न सांगिजेति : एन्हवी एथौनि नेणिजे ऐसें काही असे : बाइ हा प्राणियांचें चैतन्य पोळउनि आला असे आतां एथौनि याचें मुख न पाहीजे ।। हिंसा वर्ते तिये स्थानीं असों नये :

हे करी तेया नरक : धरी तेया नरक : एक एका दे तेया नरक ।। राजसे तामसे स्थानीं नसावें ।। एथीची सेवा ते भूता अविरोधें करावी कीं गा ।। विधि करीतां विधि स्फुरे ।। विधी अविधी परिहरे : जीवाचा वागारा नावेक ढिला करों नये : जरि केला तरि आनौनि आन करिता वेळुचि न लगे ।। एथौनि वारिलें तें न कीजे कीं ।। तुम्हा एथौनि भणीतलें तें करणीये कीं गा ।। देमती देवें करावें तें केलें : पुरुषें करावें तें ठेलें ।। रडिजे ना कीं गा : रडिनलेयां काळजी पडे ।। खरूज खाजवीना तो विरक्त ।। एथौनि भणितलें तें म्हातारीयेसीचि घडलें ।। अभोक्त्या म्हातारीचेया परी असावें ।। स्त्रियां सजन विजन होआवें ।। कवाडाचा देउळीं न बैसावें ।। समयस्थानीं न बैसावें ।। साधा संतांचियें वोसरीयें बिढार कीजे ।। बाइ : मुदे मागिजेति मग आपुलें अंग झांकें ऐसे कीजे : आंचळें बहिर्वास न नेसीजेति ।। पृथ्वी एसणें खण असें आणि परमेश्वरा एसणी देवता असे देव मा चिंधी चिरकुटी नेणो कैसी मिळेल कीं ।।

## ( २ ) आचारमालिका

स्वातंत्र्य हा मोक्ष : पारतंत्र्य हा बंध ।। मायाबहिनी आशंसिति आमचा दाडियें डोळियें कै जाइल : परमेश्वरु आशांसिति कदंकुटियेमान गव्हरीं कपाटीं ऐसा कै असेल ।। पोरा जीवा कव्हणी सामग्री न होआवी ।। पोरा जीवा सामग्री भणिजे गडदरा ।। सकळही सामग्रिया परित्यजौनि एथचिया व्युत्पत्ती व्युत्पन्ना होआवें ।। एषणात्रय त्यजावें ।। लोकींचा श्रेष्ठ तो एथींचा नष्ट : एथींचा श्रेष्ठ तो लोकींचा नष्ट ।। जवं जवं प्रयोजकु : तवं तवं अप्रयोजकु : जवं जवं अप्रयोजकु तवं तवं प्रयोजकु ।। अन्यधर्मे पुरुषु धर्मापासौनि जाए ।। विकारें पुरुपु धर्मापासौनि जाए ।। आपणेया उपद्रो उठी तेयाचा असंबंधु कीजे ।। द्रव्यसंबंधा साक्षी न ठाकावें ।। क्रय विक्रय न करावें ।। छेद भेद न करावें ।। तुम्हां आवडी न होआवी ।। तुम्हा विधिनिषेधु न होआवा ।। तुम्हीं जात्रे क्षेत्रा न वचावें ।। तुम्हीं पुरी पाटणीं न वसावें ।। आपण कव्हणाची ताति न कीजे तरि आपुली कव्हणी न करी ।। हें शास्त्र कव्हणाप्रति न बोलावें ।। अशक्तासि विधि नाहीं ।। हां गा एथौनि भणावें तेव्हेळीं तुम्हीं करावें कीं हें तुम्हांसिचि स्फुरावें ।। तूं उभा ठाकलासि चि पुरे सिद्धीते एथौनिचि नेइजैल कीं ।। श्रीप्रभुचिये सेवे आणिकां द्रव्याचें : ना : तूं नुसधाचि पुरेसि ।। हां गा

एर्थांचा व्यापारु तो एथ पुमपुसों कीजो कीं ।। एकु देवो एकु धर्मु तया परस्परें परमप्रीति होआवी कीं ।। हां गा आणिका साभिमानियाचेया होआवें मा एका निरभिमानीयाचेया होइजो का : हें तरि निरभिमान परि आपुलेया लागुनि साभिमानियाचे साभिमान ।। हाती गुढरिला नीका दिसे : जोगी मुंड्रिला नीका दिसे ।। सर्व ते काइसेयाची ही न होआवी ।। अटन तें निरुद्देशें करावें ।। गाउनि गांवा जावें ।। झाडातळीं विजन कीजे ।। अति असुरस्थानीं नसावें ।। असावें ऐसें तोंडावरि फाळुकें घालौनि ।। नामस्मरण कीजे : नामीं अभिमानु आति ।। वस्तुस्मरण तेंही एक स्मरणाचि कीं गा ।। निरंतर परमेश्वराची आर्ति करावी ।। निरंतर परमेश्वराचा विरहो भावावा ।। किंचित दुःखें पाप नासे आनंदें पुण्यराशी नासेति ।। परमेश्वरा लागीं रंका होआवें ।। निर्धूम नगर जाऴेया भिक्षे रिगीजे ।। तिसरा पाहारीं भिक्षा कीजे ।। पाठीं भिक्षे जाए तो विरक्तु ।। एकी भिक्षा न करावी ।। क्षण एकु उभेया राहिजे मग निगौनि जाइजे ।। भिक्षे पडिला हातीं घेइजे ।। आला विखो पायें हानावा ।। भिक्षा मागौनि नदीचा तीरीं भोजन कीजे ।। क्षुधानिवृत्ति कीजे ।। जेवितां आवडी नावडी न होआवी ।। तुम्हां घृणात्यागु होआवा ।। हां गा हें भिन्नाक्षु कीं हें पवित्राचें पवित्र कीं ।। तुम्हीं महात्मे कीं गा : तुम्हीं पात्रीं पडिलें भोजन कीजे कीं ।। गांवा बाहिरीं खांड देउळां कां झाडातळीं निद्रा कीजे ।। स्वभावीं वर्तीजे ।। शीतोष्णपरिहारु कीजे ।। वोली बहिर्वास न नेसावें ।। मार्गीं पडिलें वस्त्र घेपें ।। श्वानकुंडली कां कोपरदुटी पांगुरावी ।। तुम्हां अशन आच्छादन होआवें ।। नवें वस्त्र न नेसावें ।। गोंडीवुंथी घालीजे ।। अन्यमार्गियांचा संसर्गु न करावा ।। अन्यमार्गियांचिये गुंफे न वचावें ।। गोरुवा सरिसें गांवांतु रिगीजे ।। देउळां निद्रा न कीजे ।। परधर्म तुमचें जीवन कां गा ।। हृदयशून्यां धर्मीं अधिकारु नाहीं ।। भक्तिजडां धर्मीं अधिकारु नाहीं ।। कर्मजडां धर्मीं अधिकारु नाहीं ।। कर्मचांडाळापसि जातिचांडाळु तो चांग ।। देमती : नाथु असे : परि जीवें अनाथां होआवें कीं ।। देमती : कृपाळु असे : परि जीवें कृपेसि पात्र होआवें कीं ।। देमती : दानी असे : परि जीवासि आर्ति होआवी कीं ।। देमती : वज्रपंजरु असे : परि जीवें शरणागत होआवें कीं ।। विखो न सेवी तरि जीवु काइ गा मरतु असे : निरोधु साहिलेयां अधिका योग्यता होए : दक्षता होवे ।। विखो अनंता तपासि आश्रवो नरकासि हेतु ।। राजस :

तामस : सात्विक त्यागु ॥ देवो तो देवेंचि पाविजे ॥ हें स्मरे तो दुर्लभु ॥ बहुतामध्यें जयाची विशेष प्रतीति तेयापासौनि सुख स्वास्थ्य जालें ऐसें जाणावें ॥ एकु विधिकिंकरु : एकु परमेश्वरकिंकरु : आपण विधिकिंकरा न होआवें : परमेश्वरकिंकरा होआवें ॥ विधिभावातीता होआवें ॥ संग्रहो न करावा ॥ हिंसा न करावी ॥ हिंसा पाप : पापातव नरका ॥ परद्रव्याचेनि नांवें पडिला कवडा आदिकरौनि नेघावा ॥ प्राप्तविषयांचा त्यागु करावा ॥ मलवस्त्यागु तो निर्गुण ॥ परमेश्वरालागीं काळ : कुळ : लोकु : ये तीन्हीं आंगवावीं ॥ तळहातें माली हानावी ॥ समर्थो धर्ममाचरेत् ॥ विरळा नांदे ॥ सेवतेयांचें आरल खुपे तोचि खांडेया भालेयाचे घाय आढें देवढें साहे ॥ पुरुषें आपुलें करणीयें करौनि असावें : मग दैवें करावें तें दैवन्चि करील ॥ पुरुषु जेतुल जेतुला प्रयत्न करी तेतुल तेतुलें दैव साह्यातें करी ॥ एकु शास्त्र जाणौनि बोले एकु नेणौनि बोले ॥ परमेश्वरशास्त्रीं एवं वा नाहीं : पर्याय नाहीं : अभावीं भावरूप फळ नाहीं : अकरणीं प्रत्यवायो नाहीं ॥ परमेश्वरपरायणाचेनि संबंधें सुख : श्रेय : ज्ञान इयें तीन्हीं होति ॥ आचारें योग्यता : विचारें दृढता ॥ नित्याटन करावें ॥ ग्रामे एकरात्रं नगरे पंचरात्रम् ॥ सात्विक स्थान सेवावें ॥ देवाची आर्ति होआवी : मार्गाची प्रीति होआवी : विषयांची निवृत्ति होआवी : देहाची अनास्था होआवी ॥ आपुली मळीन माती करावी ॥ कोमळज्ञानीं आचारें इंद्रियधर्म पातळ होति ॥ तिळ खाइजे : तिला इतुली भूक चाए ॥ चना विखो ॥ सारविला उंबरा देखौनि साउमें न वचावें ॥ पूजा पुरस्कारु न स्वीकरावें ॥ स्तुतिपर वैराग्य न करावें ॥ सामान्यस्त्रीसदनस्थिता पासौनि संदेहत्रुटि करावी ॥ वेडेयां पिसेयां : बधिरेयां : अंधा : मुकेयां धर्मीं अधिकारु नाहीं ॥ संपन्नांचां घरीं न वसावें ॥ विषयाचा संगु न करावा ॥ पोर जीवा जेंचि पोटीं तेंचि तोंडीं ॥ पोर जीवु आपणया करौं आवडे तेंचि करी : पाठीं पुढीलावरि ठेवी ॥ आळोंचु न करावा ॥ अविद्यारूपें अविद्या संचरे ॥ जेतुल जेतुला प्रपंचीं जडे तेतुल तेतुला ईश्वरीं उजडे : जेतुल जेतुला प्रपंचीं उजडे तेतुल तेतुला ईश्वरीं जडे ॥ सर्वत्र विपर्यी गोडी तो रसु ॥ गीत विखो ॥ कराल तरी होइल कीं गा ॥ एथीची मोहरचि पुरे ॥ जीवु सर्वाधिकारी ॥ स्वतः वैराग्य तें दुर्लभ ॥ ब्रह्मचर्य त्रसले जीव विषयाकारणें मढी उकरतीति ॥

मूर्तिस्मरण तें वस्तुस्मरण होए : नामस्मरण तें वस्तुस्मरण होए आणि नामस्मरण ही होए ।। विजना जाता जैसा काही खळिये बैसावेया नेइजताए ।। इतुलेनि कपाळावरि फाळुकें घालौनि जावों लागिजे जेथ गेलेया मेलेयाची सुधि न लभे ।। पडे तवं धावावें मरे तवं करावें ।। ओठांतरा निगालें तें देशांतरां जाए ।। जीवु स्फटिककारु ।। जयातेंचि वंदिजे तेयातेंचि वाणिजे ।। दृष्टें अदृष्ट न साधे ।। अनुसरलेयातें निरोध न बधीति ।। परमेश्वराची प्रवृत्ति भंगों नेदावी : परमेश्वरपरायणाची मनोवृत्ति भंगो नेदावी ।। दोही ओठा टाळें घालावें ।। जाणौनि नेणें तो सदैवु ।। झाडिता झडेतां तोडिता तुटेना तेया प्रति बोलावें ।। अनुसरलेयाचा देवो ।। निर्हेतुक भिक्षा ।। अवेळ : सवेळ : दुपाहार इयें तीन्हीं चुकवावीं ।। फलतेया फुलतेया वृक्षा खालीं न बैसावें ।। उडत पांखीरूं न पाहावें ।। पाखरिला घोडा न पाहावा ।। ऐसा कवणे मायेचा पोटीं उपजैल जो देशावरि खाडें काढौनि जाए ।। बाइ : ऐसा एकला पळेंपळीतें निगे जो दुःखपूर्वक आपुलेया देवातें आठवीत वर्ते ।। घड तुटे तवं धावावें देह पडे तवं करावें : जीवन न सोडावें ।। चित्त : वित्त : काया : ए तीन्हीं परमेश्वरासि अर्पावीं ।। देशाचां सेवटा : झाडाचा तळवटा : देउळाचा कोनटा ए तीन्हीं सेउनि असावें ।। धीरवीरां होआवें ।। आपुलेयातें परमेश्वरु हाळो-हाळियां गीवसीति ।। पुरुषु होउनि असावें ।। केवळ घरैतें वरैतें वर्तति तेथ नसावें ।। कारुवा खारुवाचेया सारिखें वस्त्र होआवें ।। जीवासि सकळही संपत्ति तें असंपत्ति : जीवाची परमेश्वरसंपत्ति ।। देवासि पढीये तेयासि देवपढिये तें नीके ।। राजसां तामसा धर्मा अधिकारु नाहीं ।। देखिली श्रीमूर्ति आठवीजे तें मूर्तिस्मरण बोलिजे आइकिली श्रीमूर्ति आठवीजे तें भावना बोलिजे ।। प्रतिक्षणीं प्रतिक्षणीं त्यागु ।। भलतैसा भलतेथ भलतेया परी परमेश्वरु एकु आति ।। ज्ञान : ध्यान : भजन हें परमेश्वरींचि आति ।।

★ क्र. १२

## दृष्टान्तपाठ

### ( १ ) माळेकाराचा दृष्टांत

**सूत्र**—हा कां गा खांडु देईल ।।१।। एथौनि जीवांचीं कृतकर्मैं जाणिजेति

म्हणौनि एथ जीवाची घृणा नुपजे ॥ २ ॥ एथौनि तुमचे दोष बाहेरि घालीजेति तरि पोरेंहो पोटीं सुरीं सोसों मराल ॥ ३ ॥

**दृष्टांत**—कव्हणी एकु माळेकार माळेयावरि उभा असे : तयाचेया सेतान्तीए लवणीं चोरू एकु असे : तो वाटा घे : वोद्दरें मारी : ब्राह्मणु मारी : संन्यासी मारी . तो तें देखे परि उगाचि असे : मग एकु दीसु तो रायासि सांपडे। मग तो रावो तयातें खैरी जुंपावेया धाडी : मग अवघीये गावींचा लोकु पाहावेया ये : तो म्हणे : कैसा बापुडा : गोरा गोमटा : धारे धाकुटा : राणीयेचा पूत ऐसा दीसतु असे । मा रावो यातें खैरीं कां जुंपिताए : यातें पाखाळु कां नेघे । मग तो माळेकारु कांबळेयाची बुंथि घालौनि पाहावेया ये : तवं तो आइके। मग म्हणे : एणें जीयें पापें केलीं आहाति तीयें मी जाणतु आहें कीं। याचें लांब खांड तें मूहुरी एव्हडें करावें : तथा लाहान खांड तें मूहुरी एव्हडें करावें। याचां खांडीं गांवो पूजावा ॥

**दार्ष्टान्तिक**--तैसें परमेश्वरु मनुष्यवेशाची बुंथि घालौनि संसारामध्यें अवतरले असति : ते जीवाचीं कृतकर्में जाणत असति : भणौनि अनुकंपा उपजों नेंदावी : काइ आपुलेयाचीही उपजों नेंदावी : ना : तयाचि होआवी ॥

## ( २ ) तुपाभाताचिया घासाचा दृष्टांत।

**सूत्र**—जवं पुरुषु विद्ये आधिन नव्हे तवं ब्रह्मविद्या अधिकारी आति ॥१॥ बीढारावरि काइ बीढार असे ॥ २ ॥

**दृष्टांत**—कव्हणी एकि माता असे : तें हातीं तुपभाताची वाटी घेउनि लेंकरुवासि घांसु सुए : तें तोंड ऐसें पळवी : ऐसें पळवी: मग तें म्हणे: आलें असैल आलेया पालेया पोट भरूनि : म्हणौनि खालि वाटी ठेवी।

**दार्ष्टान्तिक**—तैसें विद्यामार्गनांवेंचि आले पाले असति : तेथ ब्रह्मविद्या कें रीगों लाहील। तैसें परमेश्वर प्रवृत्तिवशें निरूपीत असति : परि जीवु साधनाचेनि धालेपणें नेघे तें धालेपण येवों नेंदावें ॥

## ( ३ ) सेवाळलिया खडकाचा दृष्टांत

**सूत्र**—राजसा तामसा धर्मीं अधिकार नाहीं ॥ १ ॥

**दृष्टांत**—सेंवाळलें खडक असें : तयावरि पावो देउंची तथा ठेउंचि नए । ऐसांही ठेवीजे तरि नीरसौनि पाडी : गुडघे कोपर झांजरीतीं ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें तामसाप्रति धर्म बोलोंचि न ए ऐसांहीं बोलीजे तरि दुःखातेंचि दे ॥

## (४) पाणियां आंतुल गुंडेयाचा दृष्टांत ।

**सूत्र**—आधीं येथें बुद्धी व्हावी मग येथचिया परिवारावरि व्हावी ॥ १ ॥

**दृष्टांत**—पाणियांतुल गुंडा · वरि पाणियें भीजला वोला दीसे । फोडौनि पाहीजे तवं आंतु कोरडा असे ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें परमेश्वरसंनिधानीं पुरुषु सार्द्रउ ऐसा दीसे : पुसौनि पाहीजे तवं आंतु कठीन असे ॥

## (५) हस्तीचा दृष्टांत

**सूत्र**—जो जें होऔनि असे तो तेंचि बोले ॥ १ ॥ अनंत शक्ती परमेश्वर सकळासिही विषयव्यवस्था करीति ॥ २ ॥

**दृष्टांत**—गांवा हस्ति आला . तेथ जात्यंध हस्ती पाहों गेले : एकें पावो देखिला : एकें सोंड देखिली : एकें कानु देखिला : एकें पाठी देखिली : एकें पोट देखिलें : एकें पूंस देखिलें : मग एकमेका संवादिती : आरे तुवां हस्ती देखिला : पावो देखिला तो म्हणे हस्ती खांबासारीखा : सोंड देखिली तो म्हणे हस्ती मूसळासारीखा : कानु देखीला तो म्हणे हस्ती सुपासारीखा : पाठि देखीली तो म्हणे हस्ति भींतीसारीखा : पोट देखीलें तो म्हणे हस्ती कोथळेयासारीखा । पुंस देखीलें तो म्हणे हस्ती खरांटेयासारीखा । ऐसें एकमेकां उरोधीति । तयांमध्यें डोळसु असे तो म्हणे हा हस्तीचा एकु एकु अवएवु होए : परि हस्ति नव्हे : ऐसा अवएवीं युक्त तो हस्ति ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें जयासि जे शक्ति प्रकाशली असे तो तीए शक्तींतें परमेश्वरु म्हणे : ज्ञानिया असे तो म्हणे हे ईश्वराची एकिएकि शक्ति होए । परि परमेश्वरू नव्हे । ऐसा शक्तीयुक्त तो परमेश्वरू ॥

## (६) डुळकैलेया बाळकाचा दृष्टांत

**सूत्र**—हे हों जाणें परि जाओं नेणे ॥१॥ उपयोगा न वचे ऐसें कांहीं असे ॥२॥

**दृष्टांत**—कव्हणी एकि माता असे : ते आपुलेया लेंकरुवासि पेहें दे । तथा पाजी : तें डुळकीं । मागौतें दे : मागुतें डुळकी : मागुतें दे : मागुतें डुळकी । मग सेजीया साइलीया असति तीया म्हणेति हा वो हें डुळकीताए : तरि कां पाजीतीएसि । ते म्हणे · घेइ आइ : आंतु तऱ्ही लीतैल ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें कव्हणा एकाप्रति परमेश्वरू शास्त्र नीरोपीति : तो विसरे : मागौतें नीरोपीति : मागौतें वीसरे । मागौतें नीरूपीति : मागौतें वीसरे । मग सामान्यज्ञानिये विशेषज्ञानिये म्हणेति : जी जी हा हें वीसरताये । तरि हें याप्रति कां नीरुपीजताये । घेया गा वासना तऱ्ही उरैल ॥

## (७) पडाळीये गाईचा दृष्टांत ।

**सूत्र**—पुरुपु सवेतवं जाए ॥ १ ॥ सवे तें काइसेयाचीही न होवावी ॥२॥

**दृष्टांत**—पडाळीं गाए बांधली असे : तीएवरि गळे । चरूं जाए तरि तोंडा चीखूल ये : बुडीं पाए कवीं कोरीती : पावो झाडी तरि मागीली डीळीसीं लागे : झडें वारेंनि पीटे । ऐसें देखौनि घरींचा गोसावी म्हणे : बापुडी गाए पीडीली : म्हणौनि माळवधीचा खांबीं बांधे । खडु घालीं : खडु चरे : कांटाळा सांडी : मग रीगतेया नीगतेयातें देखौनि बुजे : तो म्हणे सोडु । एऱ्हवी माळवधाचा खांबु पाडील । भणौनि सोडी : तें मागौतीं जाउनि तयांताचि रीगे ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें परमेश्वरू अधिदैवीकु अधिभौतिकु अध्यात्मीकु तीन्ही ताप फेडौनि सन्निधान देति : नीरोपण करीति : परि जीवु सवेचि कडे वोवांडी ॥

## (८) कुष्टीयाचा दृष्टांत ।

**सूत्र**—देव माझा : मी देवाचा : ऐसियांपरी असीजो का देमती ॥ १ ॥ देमती असीजे ऐसें कुष्टियांचा धर्मी ॥ २ ॥

**दृष्टांत**— कव्हणी एकु वेव्हारा असे तयासि कुष्ट जालें : सोएरीधाएरी तयाचि ग्वंति करीति : बापुभाउ खंति करीति : तो थुंको : तरि तेयाचे पुत्र : ब्राह्मणि : खंति करीति : बाहीरि बैसों नेदीति। माया बहीणी म्हणति तूं मरकाढी। मरो कां : हें आम्हइं कां जीताए : ऐसा उबगला। मग गावां मागें दुबळेश्वरु देवो : तेथ आला : देवा तूं माझा मी तुझा : ऐसें भणौनि उंबरां उसीसें करूनि नीजैला। पाठीं तीयें आलीं : तेयातें म्हणे तुम्हीं माझीं नव्हां : मी तुमचा नव्हें। ऐसें म्हणौनि राहे : मग कव्हणी एकु खापरीं भरूनि अन्न ठेवी : कव्हणी एकु कन्हा भरूनि उदक ठेवी : हाता-पायांचे थापे जाले होते। तो ऐसें पाणी पीए। (म्हणौनि गोसावीं श्रीकराचेनि अनुकारें दाखवीलें) : कव्हणी एकु एसणें सांपटें पांगुरावेया दे। मा काइसी देवता दृष्टीं तरि अन्नोदक पुरवीलें : अदृष्टीं तरि आपुलें फळ दीधलें।

**दार्ष्टांतिक**—तैसें देवो माझा मी देवाचा ऐसेया होउनि असिजो का देमती ॥

## (९) आधारीचेया परिसाचा दृष्टांत।

**सूत्र**—जवं जवं प्रयोजक तवं तवं अप्रयोजक : जवं जवं अप्रयोजक तवं तवं प्रयोजक ॥ १ ॥

**दृष्टांन्ति**—कव्हणा एका महात्मेयाचीए आधारीए परीसु होता। तो कव्हणी येका ब्राह्मणाचेया घरा वसतीसि जाए : दारीं तीटत तीटत ऐसें पाणी पडत होतें : तेणें तेयाचें वस्त्र आंबट वोलें ऐसें जालें होतें : घरीचिया ब्राह्मणी वोसरीए पीढें घातलें : पाए धुतले : तांबीया भरूनि दीधला। तेणें संध्या केली तवं तो ब्राह्मणु आला। डोइए वानेराची पेंडीं : ते ठेवीली : तीयें सदुर्बळें ऐसीं ब्राह्मणें : तेयांतें गाए एकि दुभे। तेणें गाए दुहीली : राळेयाचें खीचटें रांधिलें : लोणीयाचा कवडा तावीला : मग तयासि ठाव्रो केला : तया दोघांहीं तो जेविला : तुटकी ऐसी बाज तिबेवरि फाटकी ऐसी वाकळ आंथुरीली : ते नीजावेया दीधली : तयाचे पाए धुतले : चोपडीले : इतुकेनि तो संतोषला : तुमचीं जेतुलीं लोखंडें आहाति तेतुकीं बांधौनि आमचीये बाजेबुडीं ठेवा। पास : फाळ : इळा : कुन्हाडि : तुता बांधौनि तयाचीए बाजे बुडिं ठेवीलीं। तो पाहाटेचि उठीला : आधारीएचा परीसु काढीला :

तेथ लाउनि आयण नीगौनि गेला। तो ब्राह्मणु उठीला : डोइए लोखंडें ठेउनि सेता घेउनि गेला। वखरू जुंतीला तवं फाळ लवों लागला : तुतेनि करूनि माती फेडी : तवं माती न फीटे : इळेनि करूनि गवत घेउं बैसला : तवं गवत नेघवे। कुऱ्हाडि करुनि झाडें फेडुं आदरीलीं : तवं कुऱ्हाडि वांकली। ऐसा निधावला। लोखंडें डोइए ठेउनि घरा घेउनि आला। दारीं लोखंडें घातलीं : मग भणीतलें : पापिणी : पापिणी कवणासि बीढार दीधलें : महात्मेनि कुजांतर केलें : आजि माझा सोनेयाचा देहाडा वाया गेला। महात्मेनि कुजांतर केलें ऐसें भणौनि ते बाहीरि आली : तवं वीवळलें असे। वरील माती फीटली : आंतुल सोनें झळझळ करीत दीसतायें। तीया म्हणितलें : महात्मेनि कुजांतर केलें कीं आमचेया दळीद्राचा मुळीं इळा घातला। ऐसें म्हणौनि ते भीतरि घेऊनि गेली ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें तुमचेनि तया गोमटें आति तें ते काइ जाणत असति बाइ ॥

## (१०) सौंदेराणेयाचा दृष्टांत

**सूत्र**—पुरुषु आपुलें करणीयें करीतसांतां तेयेंचि कीर्तीतें पावे ॥ १ ॥ सत्यार्थ प्रकटे ॥ २ ॥

**दृष्टांत**—कव्हणी एकु रावो असे : तो राज्यभ्रष्ट होए। तयाचा पाइक परीवारु कव्हणी कव्हणातें वोळगे : कव्हणी कव्हणातें वोळगे। सौंदेराणे तें सिंहासनात्राचौनि कव्हणातें वोळगति ना : कवणाते जयजयशब्दीं बोलाविती ना। ते कव्हणाचें दीधलें नेघति। तें कव्हणाचेया हातातळीं हात वोडवीति ना। एकीपरीचा उद्यम मात्र करुनि आपुलेया कुटुंबाचा नीर्वाहो करुनि असति। मग तो रावो मागौता आपुला राज्यीं बैसे : तयाचा पाइक परीवारू मागौता तयापासि आला। एकु दीसीं तो रावो सीहासनीं बैसला होता : तेणें ऐसें पाहीलें : ऐसें पाहीलें : मग तेणें म्हणीतलें : हां गा : तुम्हीं आवघे आलेति : तें आमचें सौंदेराणें देखीजति ना : तें कें असति। मग तें सांगति : तें कव्हणातें वोळगति ना : कव्हणाचेया हातातळीं हात नोडवीती : एकीपरीचा उद्यम मात्र करुनि आपुलेया कुटूंबाचा निर्वाहो करुनि असति। मग तो रावो दांडी डोळिकारु

पाठऊनि तयातें आणुं धाडी : आपण सर्व दळेंसि साउमा जाए : तयातें गाजत वाजत घेउनि ये : अर्ध राज्य देउनि आपणेया समान करी ।

**दार्ष्टान्तिक**—तैसें अनुसरला पुरुषु कव्हणातें वोळगेना : कव्हणातें जए जए शब्दीं बोलाविना : एकीपरीची क्षुधानिवृति करुनि देहाचा निर्वाहो करुनि असे : मग परमेश्वरु तयासि संनिधान देति : अर्ध शक्ति देउनि आपणेया समान करीति ॥

## ( ११ ) वटरोपाचा दृष्टांत ।

**सूत्र**—कोमळज्ञानीं आचारें इंद्रियधर्म पातळ होति : अपरोक्षीं दशे जाति ॥ १ ॥ म्हणौनि पुरुषें असंनिधानीं धर्म जिज्ञासावा ॥ २ ॥ हें असे तया रक्षण ॥ ३ ॥

**दृष्टांत**—वटाचें रोप असे : तें सेळीयां मेंढीयाचां खुररवीं जाए : एकाधा एकु तयाभवंतीं कुप कांटी करी : आळें करी : पाणी घाली : मग तें प्ररोहातें पावें : थोरला वटु होए : जरठु होए : एकु हस्ती वेंश दीधलेयाही न वचे तथा हस्तीचेया घंटा बांधलेयांही न वचे ॥

**दार्ष्टान्तिक**--तैसे जीवासि कोमळज्ञानीं वीघ्नो वीघ्न : कां जो वीघ्न : नीत्यवीधि नीमित्यवीधि राखीलेया जरठ जालेया मग रसु सेवीलेयांहीं न वचे ॥

## ( १२ ) कठियाचा दृष्टांत

**सूत्र**—बाइ पाप तरि नव्हे परि अविधि होए ॥ १ ॥ विधि करितां अविधि स्फुरे : अविधि अविधिसे प्रसवे : अविधीतवं पुरुषु धर्मापासौनि जाए ॥ २ ॥

**दृष्टांत**--रव्हणी एकु कठीया असे : तो देवतेचां ठाइं अष्टौप्रहर वेचला असे । एकु दीसीं गांवीचां जेउं बोलावीला : तो पोटभरुनि जेवीला । एउनि देवतेपुढां बैसला : तें जाड्य आलें : तीए देवतेपुढां पाये पसरुनि नीजैला । गजबजौनि उठीला : काइ माझी माउली माझें इतुलेंहीं नुपसाहे : म्हणौनि देवतेकडे पाएं पसरुनि नीजैला । एरी दीसीं स्तर्पण करीतां पींडीए पाए लागति । मग हळु हळु पारिसेनीचि पाणियें स्तर्पण करी : पारीसींचि फुलें वाए । कालींचि झाडीलें होतें : कालींचि सडा धातला होता : आधीं स्त्रीचेनि नांवें दांडेनि साइली

पिटी : तेतुका समै स्त्री एकि आली । देवाची सेवा करूं लाभे : कां न लभे : देवाची सेवा काइ कव्हणा करवीली असे : म्हणौनि ते झाडी : तो सडा घाली : कांहीं भीक्षेसि घड गोड ए तें तीएसि सुए । ऐसें असत असतां संबंधु जाला। गुरुवीणि जाली : लेंकरुवें जालीं । मग तीयें लेंकुरुवें पींडीएजवळि हागति : मुतति : मग एकी दीसीं गांवीचां म्हणितलें : कठीये हो आतां तुम्हीं लेंकुरु-वाळें जालेति : आतां गांवांतु घर बाधा : मग गांवांतु घर बाधलें । मग देवतेसि त्रीकाळ पुजा करी : हळु हळु दोनि वेळ करी । मग विळचां ते वाति लावुनि जाए : मग हळु हळु एकवेळ करी : मग तेंहीं न करी । मग तोचि पाळापाणी घाली । आपण सेतडीया मार्गो जाए : मग सेतडीया मार्गौनि ये : कोनटेयापासि वाहाणा फेडी : दोन्हीं हातु जोडुनि मग म्हणे : जए देवा। इतुकें उरलें ॥

**दार्ष्टान्तिक**—तैसें अविधि अविधींतें प्रसवे ॥

★ क्र. १२

# पंचतंत्र

## ( १ ) कोणाचा विश्वासु न करावा

कोणे एके नगरीं । यज्ञदत्तु नामें ब्राह्मणु असे । तो दुर्बलु । तयातें ब्राह्मणीनें म्हणितलें । तुम्ही कांहीं उदीम न करा । आम्ही अवघें भुकें मरत असों । तवं तो चहूंकडे हिंडों निघाला । वाटेसि जाता येके अरण्य पातला । तयासि तृषा लागली । म्हणौनि उदकाकारणें हिंडतां । तवं एकु आड देखिला । तणें झाकिला असे । तयाआंतु पाहे तवं देखिले । व्याघ्रु । सर्पु । वान्नरु । सोनारु । ऐसे चौघे तया अडामध्यें पडिले असति । ते तया यज्ञदत्तु ब्राह्मणें देखिले । तेहीं तो ब्राह्मणु देखिला । मग चौघेहि तयाते म्हणति । आमुते या अडांतुनि बाहेरि काढीं । तवं तो विचारी । म्हणे यासि बाहिरी काढितां । पुण्य होईल । म्हणौनि तेणें आधीं व्याघ्रु काढिला । तेणें म्हणितिलें तूं माझा प्राणदाता । मी मथुरेचें डोंगरीं असें । तेथें तुं आलिया । मी तुझे उपकाराचा प्रत्युपकार करीन । परि या सोनारा तुं बाहिर काढुं नको । तंव तो सर्पु आणि वान्नरु हि काढिले । तंव ते म्हणति तुं सोनारु बाहिर काढुं नको । आणि आमुतें अवघड वेळेसि स्मरावें । मग पाठिं तो सोनारुहि काढिला । तंव तो सोनारुहि म्हणे । मजपासिं तुवां यावें । तुझें मी उत्तीर्ण होईन । तंव तो ब्राह्मणु हिंडतु हिंडतु मथुरेसि गेला । तंव तेथें वान्नरु भेटला । तेणें त्या ब्राह्मणासि स्वागत केलें । बरविं फळें दिव्यें आणौनु दिधलीं । ते डोंगरिं व्याघ्रुहि भेटला । तेणें त्या ब्राह्मणासि सोनियाचे अलंकार दिधले । ते अलंकार घेउनि त्याच सोनारापासिं गेला । तंव तो तथा ब्राह्मणासि नोळखेचि । ब्राह्मणें खुण सांघितली । मग वोळखिलें । ब्राह्मणासि बैसों घातलें । आणि पुसे 'काय काज' । तंव तया ब्राह्मणें अलंकार दाखविले । तंव ते अलंकार तयाच नगरीच्या राजकुंवराचे तयाच सोनारें घडिले होते । ते नेमस्त वोळखिले । मग मनिं विचारि । व्याघ्रें राजकुंवरु मारिला । अलंकार ठेविले होते । ते या ब्राह्मणासि प्रत्योपकाराकारणें दिधले ।

तंव तो सोनारु जाउनि राउळि सांघे । म्हणे जि राजकुंवरु जेणें मारिला । तो चोरु मी दाखवीन । म्हणौनि तो ब्राह्मणु सोनारें राजदूतांपासि दाखविला । म्हणे एणें राजपुत्र मारिला । आणि अलंकार घेउनि आला असे । तो ब्राह्मणु राजदूतीं धरुनि बहु बडविला । आणि धरुनि राजापासिं नेला । तंव रायें म्हणितिलें । यासि उदैक सुळिं द्या । म्हणौनि बंधन करौनि ठेविला । तंव त्या ब्राह्मणें रात्रिं सर्पु स्मरिला । तंव तो तत्काळ आला । म्हणे 'काये आज्ञा'। तंव तेया ब्राह्मणें अवघा वृत्तांतु सांघितला । तंव तो सर्पु म्हणे । मी रायाचे राणिस डंखीन । तुज वांचुनि नुतरे । तुं हात लावताचि उतरैन । ऐसें सांगौनु सर्प ते राणि डंखिली । तया सर्पाचें विख कांहि केलिया नुतरे । तंव तया ब्राह्मणें म्हणितिलें । मी उतरिन । मग तो ब्राह्मणु रायें सोडिला । तयाचा हात लागताचि सर्पु उतरला । मग रायें तया ब्राह्मणासि सन्मानु केला । मग रायें तया लेणियांचें वृत्त पुसिलें । ब्राह्मणें अडापासुनि अवघें साधितलें । मग तो सोनारु नेउनि गांवाबाहिरि घातला । आणि तया ब्राह्मणासि धन गाव दिधलें । मग तेणें आपुलें कुटुंब आणविलें । सुखें असों लागला । म्हणौनि कोण्हाचा विश्वासु न करावा ।

—( प्रथम तंत्र, मित्रभेदुनाम, श्लो. ३५ )

## ( २ ) समर्थाचेन नामें दर्पेंच कार्य होये

कोण्हे येके वनीं चतुर्दंत नामें हस्तींचा राजा । तेथें अवर्षण पडिलें । तेणें करुनु तेथिल पाणि आटलें । मग ते हस्ती पाणियेंविण मरों लागले । इतुकेन बहुत उदक चंद्रसरोवरिं आइकौनि । त्या चंद्रसरोवरासि पाणि प्यावया हस्तियुथ गेले । त्या सरोवराजवळीं । ससियाचीं कोहकें अपारें असति । तेथ ससे बहुत असति । तया वाटा हस्तियुथा येतां जातां । ससे त्यांचे पाइं रगडौनु मेले । मग उरले ससे विचारिति । म्हणति मागुतीं हस्ति आलिया आपणहि मरोन । मग विजयो नाम ससा । तो बहुतु बुद्धिवंतु । तो म्हणे मी आपुलिया बुद्धी हस्ती इकडे न येति ऐसें करीन । ऐसें ऐकौनि शिळामुख ससेयाचा राजा । त्या विजयातें मानि । मग तो विजयु ससा । तया हस्तिपासिं जाउनि । उंच शिळेवरि बैसौनु । त्या गजेंद्रातें म्हणे । तुज अवघें भलें । तें वचन आइकौनि । अवघे हस्ती म्हणती तूं कोण सांघ । मग तो ससा म्हणे

मी चंद्राचा दूत। तवं ते म्हणति तूं कां येथें आलासि। काये म्हणतोसि तें सांघ। मग तो विजयुनामे ससा म्हणे। दूत पुढिलांचे निरोपें बोलति। तरि आइका। चंद्र तुजवरि कोपला। जें माझे ससे या सरोवरातें राखावया ठेविले होते। तूं त्याचें म्हणितलें न करिस। या सरोवरासि मागुता येसिल। तरि मग तूं जाणासि। या कारणें मातें तुजपासि पाठविलें असे। आणि या सरोवरासि येतां आमुचा नासु होतुसे। म्हणौनि तुवां आजिलागुन या सरोवरासि न यावें। आलासि तरी तुजवरी चंद्रमा कोपैल। आणि मग तुज वीरु करील। येसें ऐकौनि तो हस्ती म्हणे। मज बोलु लागला। तरि मातें चंद्रातें तूं दाखवीं। मी तयाच्या पायां पडौनि विनवीन। मग तो ससा म्हणे। तूं येकलाचि ये। तूं तें चंद्रातें भेटवीन। मग तो हस्तींचा राजा तया ससियापाठीं आला। मग त्या ससेयानें चंद्राचें बिंब-प्रतिबिंब सरोवरात उदकामध्यें दाखाविलें। तें देखौनि हस्ती पायां पडे। म्हणे जी मी आजिलागौन या सरोवरासि न ये। येसें म्हणउन मागुतें त्या सरोवरासि हस्ती न येतीच। मग ते ससे सुखें असो लागले। म्हणौनि समर्थाचेन नामें दर्पेच कार्य होये।

—( तृतीयतंत्र-“ काकोलुकीय, ” श्लो. १० ).

## ( ३ ) मूर्खा, दोनि हृदयें कोठें कोणासि असताति ?

आता चौथें तंत्र सांघिजैल। उक्तं च।

प्राप्तव्यमर्थं यो मोहाच्छांत्वानः प्रतिमुंचति।
स तथा वंच्यते मूढो मकरः कपिना यथा॥ १॥

राजपुत्र पुसति। विष्णुशर्मा सांगे। म्हणे समुद्रतिरिं सदाफळ जांबुळवृक्ष असे। तेथें रक्तमुख नामें वान्नरु वसे। तंव त्या समुद्रांतुनु। विकराळ नामें सुसरु। तेथें जांबुळरुढिं वाळसरा असे। तेथें येउनि बैसेला। तयातें देखौनि वान्नरु म्हणे। तुं आमचा अतिथि। म्हणौनि जांबुळें त्या मकरासि दिधलिं। तंव तो नित्य येउनि तेथें वृक्षाखालें बैसे। आणि तयासि वान्नरु जांबुळें देतुसे। येसि दोघांसि प्रीति मित्रत्व जाहालि। ते येकमेकांसि गोष्टि करिति। खातां जांबुळें उरति तीतुकिं तो सुसरु घरासि आणि। आणि आपुलियें स्त्रियेसि देतु असे। तंव तिया स्त्रिया मगरासि पुसिलें। म्हणे हें अमृतोपम फळें कैंचि। तंव तो म्हणे माझा मित्र वान्नरु। तो मज देतुसे। तंव ते म्हणे त्याचें हृदय

अमृतोपम असैल । जो यैसिं फळें नित्य खायें । तरि त्याचें हृदईचें मांस मज आणौनि द्यावें । तें मि खाईन । आणि बरवी तरुणीं ही होईन । तुजसि सुखें रमेन । तंव तो म्हणे । तुं यैसें बोलों नको । तो माझा परम मित्रु । यैसें करितां पाप बहुत असे । तंव ते म्हणे ते वानरि असैल । आणि तुं तयेसिं रातलासि । तंव तो म्हणे मि तुझा पाईकु । सेवकु । तुझिया मि पाया पडैन । मग ते म्हणे मि अनाशनव्रत घेईन । परि ते दुराग्रह न सांडि । मग तो तियेतें म्हणे । तो तरि वान्नरु शाखामृगु । आणि मि तरि जळचरु । तो मज कैसेनि मरवेल । तंव ते म्हणे तो नाणि तरि मि मरेन । इतुकेनि तो वान्नरापासिं मगरु आला । तंव वान्नरु पुसे तुज उसीरु कां लागला । तंव तो म्हणे । तुझिया भाउजया । मातें निर्भर्छिलें । म्हणे यैसीं फळें तुझा मित्रु तुज देतुसे । तरि तुं त्यासि घरासि कां नाणिस । उपकारासि तुं प्रत्योपकार कां न करिस । तरि तुं यैसा कृतघ्नु । तुज प्रायश्चित्त पाहिजे । म्हणौनि तरि तुं आमुच्या घरासि चाल । तुज पाहुणचाराचि आईत केलि असे । मग तो वान्नरु म्हणे मि पाणियांतु कैसेनि येवों । तंव म्हणे माझीये पाठिवरी बैस । तंव तो बैसला । दोघेहि निघाले । वाटे पाणियांतु जातां वान्नरु म्हणे । सुसरातें । तुं हळु हळु चाल । तंव तो सुसरु मनिं म्हणे । आतां वान्नरु तरि वश्य जाहाला । आतां पाणियांतु काये करील । तरि या बापुडियासि मनिंचें गुह्य सांगों । मग तयातें म्हणे । माझे भार्येनें । तुझें हृदय खावयालागिं आणविलें असे । तरि तुं इष्टदेवता–कुळदेवतेचें स्मरण करिं । तंव तो वान्नरु अति विपन्नमति । म्हणे सांगतिया मज तेथेंचि न संगासि च । मि हृदय जांबुवरि ठेवुनि आलों असे । तरि चाल मागुता । तें हृदय घेवौनि येवो । तंव त्या सुसरें होकां म्हणितलें । म्हणौनि तो मागुता परतौनि जांबुपासिं आणिला । तंव तो वान्नरु उडौनि जाउनि शिखरिं बैसला । सेंडियावरि गेला । म्हणे आजि मि उपजलों । वाचलों । दुसरा जन्म पावलों । मग तो मगरु म्हणे बाळमित्रा तुझि भाऊजई वाट पाहात असेलि । तरि हृदय घेउनि शीघ्र ये । ते भुकेलि असेलि । मग तो वान्नरु म्हणे । अरे विश्वासघातकिया ते मरो आणि तुं हि मर । या जांबुझाडिहुनि तुं जाये । म्हणे मूर्खा दोनि हृदयें कोठें कोणासि असताति । तंव मगरु मनिं म्हणे । म्यां वोखटें केलें । जें यासि अभिप्रावो सांगितला ।

—( चतुर्थतंत्र, "लब्धप्रणाशनाम" ) महाराष्ट्र–कवि, १.१.

★ क्र. १४

# क्रिस्तपुराणाची प्रस्तावना

## भावार्थियां क्रिस्तावां समस्तांसी

## पाद्री थॉमस एस्तावा

## उदण्ड आयुष्य भोग्य व परमेश्वराची कृपा भाकिताये.

भावार्थिया बरवेया क्रिस्तवानो, ह्या पुराणांतु स्वामिया जेसु क्रिस्त तारकाची कथा लिहिली आहे. तो कैसा मनुष्य होउनु संसारीं आला, आणि कवणा कारियासि आला तेआ येणिआचा विवेकु केला. हे कथेचे दोन भाग अथवा दोनी पुराणें केलीं हाती. पैल्या पुराणांतु संसाररचनेठायीं आरंभु करूनु, उदंडी उत्तमीं करणीया देवा स्वामियान आपुला येकुची पुत्रु संसारीं पाठवण्याचे आदी केलिया तेया करणीयाची वेवस्था निरोपितों. दुसरेआ पुराणांतु जेसु तारकाचें येणें सांगुनु तो मनुष्यु होउनु जन्मला तवं वेरी व स्वर्गप्रवेशु करी परियंत तेयाची येकत्री कथा केली आहे, तिये कथे वरउनु समस्तांसि सत्यवंता परमेश्वरा व तेयाचिआ येकाचि पुत्रा जेसु क्रिस्ताची वोळखी होवाविया, जेया जेवू वांचोनु आणियेक नांव जेआचें वरौनु प्राणियासी मुक्ति जोडे ऐया स्वर्गाखालुतें न मेळे...

हें सर्व मराठीये भासेन लिहिलें आहे. हेआ देसीचिआं भासां भितुर ही भास परमेश्वराचिआ वस्तु निरोपूंसी योग्य ऐसी दिसली म्हणौनु; पण सुध मराठी माधिमा लोकासी न कळे देखुनु हेआ पुराणाचा फळु बहुतां जनांसी सुफळु होउंसी काय केलें, मागिलेआ कवीश्वरांचीं बहुतेकें अवघडें उतरें सांडुनु सांपुचियां कवश्विरांचिये रितु प्रमाणें आणियेके सोपीं ब्राह्मणांचे भासेचीं उतरें ठाईं ठाईं मिसरीत करुनु कवित्व सोपें केलें; यापरी परमेश्वराचें कृपेस्तव उदंडा लोकांचें आरत पूर्ण होईल, आणि जे कवण येकादे वेळां पूर्वीलिआ कवित्वाचा श्रुंगारु व बरवी भास अद्यापीं आठवतातीं तें हें कवित्व वाचुनु संतोषु मानिती आणि फावे तो फळु भोगिती. कां मागीलिआं कवित्वाचिआं स्थानीं आणियेक कवित्व देतों तया होउनु फळस्त सुफळ,

आणि मागिलिआं कवीश्वरांचिआं लटिकिआं उतरां व स्वप्नावरीये सत्यवंता परमेश्वराचें सत्यवंत शास्त्र व परम सुखाचा मार्गु परम भक्ती सिकवितों जिये सिकाविणें निमितीं तेयांचिआ आणि आमंचिआ शास्त्राभीतुरीं केवडें अंतर आहे तें समस्तांसी ठाउकें होईल, जितुकें अंतर उजुवाडा आणि अंधारासी, सत्या व लटिकासी, वैकुंठा व यमकोंडासी, परमेश्वरा व देवचारासी आहे. येतुकें आमंचिआ शास्त्रा आणि आणियेका शास्त्राभीतुरीं अंतर आहे ऐसें म्हणौनु समस्त देखती. म्हणौनु आम्ही हेआ आमंचेआ पुराणातु तेआचें शास्त्र लटिक आणि आमचें सत्य ऐसे म्हणौनु दाखौंसी नाहीं कष्टवतों; का तें आपैसें समस्तांसी दृष्टी पडताये; क्रिस्तवांचें शास्त्र आपणपें सोभताये, मिरवताये, व तेंचि बरवें म्हणौनु आपणपें दाखुनु देताये; वाचिलेया ऐकिलेया पुरे.

जैसे रात्रीचे प्रहर सरलेया सूर्यु उदेवो करुनु आपुलीं किरणें दाही दिसां विस्तारिताये तंव काळोखा होउनु उजवाडु बरवा काय ऐसे कवणुई न पुसे, मनीं दुभावो न धरी, तैसेंची सांटा वांजेलाचा उजवाडु समस्तांचे दृष्टी फुडां ऐसा निटळु, झगझगितु, निष्कळंकु दिसताये कीं जो कवणु तेयाचें तेज न देखावया आपुले डोळे बळिवाडें डापित नाहीं तो साहष्ट देखैल आणि मुखें उचारिल; तेयाचे उपमेन आणियेकी वस्तु ऐसी बरवी, निर्मळी, पवित्री, उतमी संसारातु न मेळे; म्हणौनु येरीकडे कोणी प्राणी केवडाई नेणारु, मूर्खु, अल्पमतीचा जाहाला तरी तेणें हेआ देसीचिआं पुराणांतु जिया अवघी लटिकी वस्तु लिहिलेआ हातीं तिया येकी वेळे ऐकिलेया वरी कवणा मुळाचेआ निपजलिया तेआ निवडूंसी अवघड न्हवेल.

म्हणौनु क्रिस्तांव तुम्हीं उदंड करुनु परमेश्वरासी अर्घ्ये देआ आणि उपेगु माना, कां तुमांसी येमकोंडीचिआ मार्गाचे व अनुभवार्थियांचिआ अंधाकारांतुले काडूनु क्रिस्तांवपणां भीतुरीं मेळसें केलें. तेआचिआ उतमा शास्त्राचा उजवाडु भोगूंसी आम्हीं जें कार्य करूंसी आधरिलें तें परमेश्वराचे कृपेस्तंव आमचे अल्पसक्ती संगडें सिधी पावलें. दों पुराणांचे अभंग केले; तेयांमाजी कांहीं उतराची चुकी जाहालेया वरी ती तुम्हीं खेमा करा. मज येतुकें आहे पुरे जरी जें तुमांसी हें पुराण सरलें देखूंसी आरत होतें तेंचि आतां तें वाचूंसी तुमांसी आरत होउनु तेयाचा फळु जरी भोगिसाल तरी तें देव मार्झे. तुम्ही दिनें दिनु अधिक अधिक क्रिस्तांव भक्ति करुनु सत्य भावो मनीं दृढ धरुनु सेवटु परियेंत

पुण्य पुरुसार्थाचे मार्गी चाला ऐसें म्हणौनु तुमां कारणें परमेश्वरापासीं विनंती करितों.

★ क्र. १५

# एकनाथी भारुडें

## ( १ ) अर्जदस्त

अर्जदस्त अर्जदार । बंदगी बंदेनवाज । आलेकुम् सलाम । साहेबाचे सेवेशीं । बंदे शरीराकार । जीवाजी शेकदार । बुधाजी कारकून । प्रगणे शरीरबाद । किल्ले कायापुरी । सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार जाहलों । तो परगणे मजकुरीं येऊन सरकार काम मुरू करावयास लागलों । तों परगणे मजकूरचे जमादार दंभाजी शेटे । कामाजी महाजन । मनीराम देशमुख । ममताई देशपांडीन । क्रोधाजी नाईकवाडी । ऐसे हरामजादे फार आहेत । ते सरकारकामाचा कथाश चालूं देत नाहींत । तमाम परगण्याची फितुरी करितात । दंभाजी शेट्या कचेरींत येऊन जोम धरून बसतो । मनीराम देशमुख आपलें परभारें काम करून घेतो । ममताई देशपांडे इनें तमाम परगणा जेरदस्त केला । क्रोधाजी नाईक यानें तफरका केला । तों साहेबांपासून जरासंध चोपदार आला । त्यानें खबर केली कीं । मागून यमाजीपंताची तलब होणार । त्यास त्या धास्तीनें तमाम परगणा ओस जाहला । वितपशील कलम । ढोळसवाडीस मात्र कांहीं रुई रुई वस्ती राहिली । कानगांव तें बंद जाहलें । दोनी वेशींचीं कवाडें लागलीं । नाकापुरास दाहव सुटलें । तोंडापुर तें तफरका झालें । दंताळवाडी ओस पडली । दिवेलावणी देखील राहिली नाहीं । केंसगांवची पांढर जाहली । शीरापुरचे लोक दरोबस्त थरथरा कांपूं लागले । हातगांव कसाल्यानें जर्जर जाहलें । त्यांच्यानें आतां कांहीं लावणी होत नाहीं । पायगांवचीं मेटें बसलीं । ढोरापुराची राहटी राहिली । चरणगांवची चाली सरली । ऐशी परगण्याची कीर्ति बुडाली । यावर सरकारकाम सुरू करीत होतों । तों यमाजीपंतांची परवानगी आली कीं । हुजूर येणें आपणांस साहेबांच्या कलमांना आश्रय आहे । एका जनार्दनका बंदा । बंदगी रोशन होय हे अर्जदस्त ॥

## (२) कौलपत्र

चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार। यासी आत्मारामपंत कमाविसदार। कसबे ब्रह्मपुरी। आशिर्वाद उपरी। तुम्हांस देहगांवचें ठाणें दिल्हें आहे। तर ठाण्यांत सावधपणें वर्तणूक करणें। तेथें ममताई पाटलीण। तिनें लटिकेंच दंभ उभे केलें आहे। कामक्रोधादि षड्वैरी चाकर ठेवून। लोभमोहाचे फांसे सिद्ध करून ठेविले आहेत। म्हणून तुम्हांस सूचना मात्र लिहिली। विषयाचा लोभ न धरणें। निजहितासी अंतर न करणें। सत्य मिथ्या जाणोन। विचाराची वाट धरणें। अविचारपणा सोडून देणें। विवेक सद्भाव यांसीं मित्रत्व विशेष असूं देणें। त्याचे बुद्धीनें गांवची लावणी करणें। उत्तम चार वर्णांस कौल देऊन। धैर्याचा नांगर धरून। शेतांमधील खडे काढून। वासनेच्या पालव्या तोडून। संशयाच्या काशा गोळा करून। भूमिका शुद्ध करून। मग भक्तिज्ञानवैराग्य तिफनी करून। सद्गुरुमुखीं निजबीज पेरणें। तेथें शुद्धसत्वाचा मेघ वर्षेल। तेथें सत्याचा माळा घालून। कुतर्क पांखरूं उडवून देणें। जागोजागीं विश्वास रक्षण ठेवून। शेतांतील माल अवघाच गोळा करून। समस्त षड्गुण ऐश्वर्य बैल जुंपून। अवघा माल खळयांत आणून। पुष्कळ काढून। स्वानंदाची रास करणें। तेथें सिद्धसाधकें मागुतें येतील। त्याला भक्तीच्या पायलीनें। अवघाच माल मोजून देऊन। सहहुजूर ब्रह्मपुरास येणें। सांगितल्या गोष्टींत बाकी ठेवाल तर। चौऱ्यांयशीं लक्ष योनी फिरणें लागेल। मग पुनरपि तुम्हांवर कोणाचा दस्त लादेल। खरें चालावें। जन्ममरणाची वाट खुंटेल। म्हणून जनार्दन सद्गुरूचा सागर। तेणें एकाजनार्दनीं आनंदमय समाधान झालें। द्वैताचा लेश उरला नाहीं। सच्चिदानंद रूप प्रत्ययास येऊन। समाधान पावलें। हें कौलपत्र ॥

★ क्र. १६

# शिव–समर्थ योग

स्वामींनीं सर्वकाळ अरण्यांत वास करावा. कोठें पर्वतावर, कोठें घळींत जेथें मनांत येईल तेथें वास करावा. चाफळीं यावें जावें. ऐसा संचार करून जगदोद्धार करिते जाले. जगविख्यात कीर्ति जाली. शिवाजी महाराज यांणीं ऐकोन, श्रीचे ठाईं लक्ष ठेवून, दर्शन घ्यावें हा हेतू ठेवून राज्य आक्रमण करीत होते. म्लेंच्छांचा उच्छेद करावा, देवब्राह्मणांची स्थापना करावी, महाराष्ट्र राज्यवृद्धि पावावी हा हेतु, धर्म रक्षावा, प्रजेस पीडा होऊं नये, हें करीत असता महाराजानीं स्वामींची कीर्ति श्रवण करून, दर्शनाचा हेतु धरून भेट घडावी ही इच्छा अंतःकर्णी. रात्रंदिवस निजध्यास, प्रयत्न तितका करूं लागले, परंतु शोध न पडे, ठिकाण लागेना. ह्मणोन अति उद्विग्न चित्त, राज्यभार नको, वैभव नको, दर्शन घडावें, हेंच ध्यान. तशा संधींत प्रतापगडींहून स्वारी खालीं येऊन महाडांत मुकाम होता. त्या समयीं कोणी सत्पुरुष गोसावी कीर्तन करणार आले. त्यांचे हातून महाराजानीं कीर्तन करविलें. कीर्तनांत त्यांनीं ध्रुवाख्यान चरित्र लाविलें आणि सद्गुरुवांचून मोक्ष नाहीं हें कीर्तन केलें. त्या दिवसापासोन पूर्वींपेक्षां अति उद्विग्न होऊन स्वामींचे शोधाविषयीं प्रयत्नाची सीमा जाली. तेव्हां असा मनीं निश्चय केला जे, या उपरी स्वामींचें दर्शन होऊन अनुग्रह प्रसाद जाल्याखेरीज अन्नग्रहण करणार नाहीं. ऐसें मनांत आणोन, चिंताक्रांत होऊन, प्रतापगडी निद्रा केली. तों स्वामींची मूर्ति स्वप्नांत पायीं पादुका, कौपीन धारण, हातीं माळ, व काखेंत कुबडी व गळयांत मेखळा, मस्तकीं जटाटोप, याप्रमाणें मूर्ति सन्मुख उभी पाहून महाराजांनीं साष्टांग प्रणिपात केला. स्वामींनीं मस्तकीं हस्त ठेऊन, आलिंगन देऊन, मस्तक अवघ्राण करून नारळ प्रसाद दिल्हा. प्रसाद घेऊन, पुन्हः चरणीं मस्तक ठेवून विनंति केली कीं, 'मूर्ति पाहून परम संतोषाते पावलों. प्रसादेंकरून सर्व कल्याण जालें. नांव श्रवणांत करावें, व स्थळ कोणतें तें सांगावें.' विनंति केल्यावरून हास्यवदन करून बोलिलें कीं "बाबा, आम्ही गंगातीरीं राहणार, सांप्रत तुझ्याकरितां कृष्णातीरीं आहों. तुझ्या राज्यांत समर्थसांप्रदाय वाढवून, श्रीची

स्थापना करून, उपासनेची सेवा आणि ब्राह्मणाची भक्ति करून आहों. नांव रामदास ऐसें ह्मणत आहेत. तुझें राज्यांत असोन तुझें दर्शन नाहीं. तूं धर्मराज्य, देव ब्राह्मण षट्कर्मं धर्मस्थापना विषयीं तुला श्रीची आज्ञा. तुजला भेटीची इच्छा प्राप्त जाली म्हणोन चाफळांहून आलों. तुजला कांहीं मागावयाचें नाहीं. परंतु तुम्हीं राज्यभार अवलंबिला तोच करावा. धर्माचा उच्छेद जाला त्याची स्थापना करून देव ब्राह्मण ह्यांचे ठांई परम सादर असावें." ऐसें सांगोन अदृश्य जाले.

महाराज परम संतोष पावोन आनंदाश्रुत आहेत, रोमांच अंगावर उभे आहेत, ऐसे संधींत जागृत जाले; तों स्वामी नाहींत. प्रसादनारळ हातीं आहे. त्या समर्थांचा आनंद कोठें माईना. ज्येष्ठ पत्नी जवळ होती. तिजजवळ नारळप्रसाद देऊन बाहेर आले, तों उषःकाल जाला. स्वामीदर्शन आज घडलें हा सुदिन. पुन्हः प्रत्यक्ष दर्शन घडेल तो हि सुदिन. आतां स्वामींचें दर्शनाचे प्रयत्नास आपण च जावें ऐसा निश्चय करून, प्रातःस्मरामि ह्मणोन, स्नान करोन, श्रीशिवपूजा करून, भोजन करून, मातुश्री जिजासाहेब यांसी सविस्तर वर्तमान सांगून स्वारी तयार करून समस्त मंडळीसह परिवारयुक्त निघून श्री महाबळेश्वरीं येऊन, दर्शन करून, देवब्राह्मण करून दानधर्म बहुत केला. तेथून वाईस आले. तेथें हि एक मुकाम करून, दानधर्म करून निघोन माहुलीस आले. तेथें हि संगमीं स्नान करून, दानधर्म करून स्वामींचें दर्शन व्हावें हा हेतु धरून मुकाम तेथें आहे, त्या संधींत स्वामींकडून पत्र आलें तें च लिहिलें असे :—

निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ।
अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंत योग ॥
नरपति हयपति गजपति । गडपति आणि भूपति ।
पुरंदर आणि शक्ति । पृष्ठिभागीं ॥
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत आणि जयवंत । जाणता राजा ॥
तीर्थें क्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट जालीं ।
सकल पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥

देव धर्म गो ब्राह्मण । करावयासी संरक्षण ।
हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥
या भूमंडळाचे ठाईं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
मऱ्हाष्ट्र धर्म राहिला कांहीं । तुह्मांकरितां ॥
कितेक दुष्ट संव्हारिले । कितेकास धाक सुटले ।
कितेकांस आश्रये जाले । शिवकल्याण राजा ॥
तुमचे देसीं वास्तव्य केलें । परंतु वर्तमान नाहीं घेतलें ।
ऋणानुबंधें विस्मरण जालें । काये नेणों ॥
सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती । सांगणें काये तुह्माप्रती ।
धर्मस्थापनेची कीर्ति । सांभाळिली पाहिजे ॥
उदंड राज्यकारण दाटलें । तेथें चीत विभागिलें ।
प्रसंग नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ॥

या प्रमाणें श्रीस्वामींचें पत्र आल्यानंतर महाराज परम सद्गदित होऊन या देशीं सर्व साधुवृंद आहेत, सर्वत्रांची सेवा यथाशक्त्या करीत आहे, दर्शन-भाषणें हि होत आहे. परंतु समर्थांसी भेटलों नाहीं, आणि समाचार हि घेतला नाहीं, केवढा मी अभागी. ऐसें परम विव्हल होऊन, स्वप्रभाव हि ध्यानांत आणून उत्तर दिल्हें जे, 'स्वामी मी बहुत अपराधी, आपण क्षमावंत आहांत. सांप्रत्य कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन परम आनंदाते पावलों. दर्शनाची इच्छा धरून येत आहें. कृपा करून दर्शन दिल्हें पाहिजे हे विज्ञाप्ति.' ऐसें पत्र घेऊन आले होते त्याजपाशीं देऊन त्याचा बहुता प्रकारें सत्कार, त्यासी आहेर करून विचारिलें कीं, 'सांप्रत्य श्री स्वामी कोणे ठिकाणीं आहेत?' त्यांणीं विनंति केली कीं, 'सांप्रत्य चाफळखोऱ्यांत आहेत. मी वर्तमान सांगितलें परंतु निमिष्यांत कोण स्थळापासून कोणे स्थळीं जातात याचा नेम सांगवत नाहीं.' याप्रमाणें बोलून महाराजांचा निरोप घेऊन जाते जाले.

नंतर महाराजांनीं स्वारी सिद्ध करून निघाले. तें माजगांवपर्यंत स्वारी सहवर्तमान येऊन पुढें सडी स्वारी बाळाजी आवजी, निळोपंत वगैरे दहापांच मंडळीसुद्धां चाफळास येऊन, श्रींचें दर्शन घेऊन, मठांत आका वगैरे मंडळी यांस नमस्कार करून, पुसिलें कीं, 'समर्थांची स्वारी कोणे ठिकाणीं आहे?' आकांनीं सांगितलें कीं, 'सिंगणवाडीस श्री मारुतीपाशीं आहेत.

आपलें पत्राचें उत्तर काल अस्तमानीं पावलें. तें पत्र कल्याण गोसावी आज घेऊन स्वामींकडे गेले आहेत. आता नैवेद्य समर्पण होत आहे, आपण मंडळींसह भोजन करावें. स्वामींकडे कळवून आपल्यास कळवितों.' म्हणता च 'समर्थांचे पाय पाहिल्यावाचून अन्नग्रहण करावयाचें नाहीं,' याप्रमाणें महाराज बोलिले. त्यास आकानीं उत्तर केलें कीं, 'आपण मंडळीसहवर्तमान गेल्यास गाठ पडेल न पडेल. यास्तव गलबल करूं नये. कळवून जावें.' म्हणताच महाराजांनीं उत्तर केलें जे, 'मी एकटा च जातों. मजला कोणी माहितगार द्यावा.' बहुत प्रार्थना आकाची केली. त्याजवरून दिवाकरभट महाराजांचे समागमें व दोन माणसे इतुक्यानिशीं सिंगणवाडीस श्री मारुतीपाशीं गेले. तेथें स्वामी नव्हते. खडीचे खालीं बागेंत होते. हे जाण्याचे पूर्वी कल्याण गोसावी जाऊन, नमस्कार करून महाराजांचें पत्र आले तें वाचून दाखविलें. स्वामींनीं हास्य करून 'शिवाजीची मर्जी दर्शन घेण्याविषयीं उदित आहे' ऐसें म्हणोन उंबराचें झाडाखालीं जेठा घालून बसले आहेत, कल्याण गोसावी पुढें उभे आहेत त्या संधींत दिवाकर-भटजीसहवर्तमान महाराज गेले जाळीची दाटी बहुत, झाडी विशेष, मार्ग लहान जाण्याचा, पुढें भटजी, मागे महाराज, तों स्वामींनीं कल्याण गोसावी यासि पुसिले जे 'कोण येतें ?' त्यांणीं विनंति केली कीं, 'दिवाकर गोसावी मागे दोघे तिघे येत आहेत.' तों दिवाकर यास स्वामींनीं पुसिलें कीं, 'दिवाकरा, कां आलास ?' 'महाराज, शिवाजीराजे आले, यांसी दर्शनास घेऊन आलों.' ह्मणोन साष्टांग नमस्कार केला. महाराजांनीं साष्टांग नमस्कार दंडवत करून परम सद्गदित होऊन रोमाच उभे राहिले आहेत. तों स्वामींनीं विचारिलें कीं, 'शिवाजी, पत्र व तुम्हीं एकदांच आला. इतकी त्वरा कां केली ? तुमचे देशांत आम्हीं आहों. आमचा परामर्श बराच घेतला!' ह्मणोन स्वामी हांसले. हें उत्तर श्रवण करून परम सद्गदित अश्रुपात येत आहेत, शब्द उच्चार होईना, परंतु परम विनयतेनें 'महाराज, मी अपराधी आहें; समर्थ क्षमाशील आहेत, स्वामींनीं क्षमा करून कृपाअनुग्रह करावा. एक इच्छा जाली, दुसरी इच्छा पूर्ण केली पाहिजे.' ह्मणतांच स्वामींनीं उत्तर केलें कीं, 'तुम्हांस प्रतापगडीं मंदवारीं रात्रीं सांगणें तें सांगोन नारळ प्रसाद देऊन आलोंच आहों, त्या परती इच्छा काय आहे ?' ह्मणतां च 'आज्ञा जाली ते प्रमाण, परंतु स्वामींनीं कृपा करून अनुग्रहप्रसाद देऊन पावन करावें, इच्छा पूर्ण करावी'

म्हणोन बहुत प्रार्थना केली. त्याजवरून स्वामींनीं कल्याण गोसावी याजकडे अवलोकन केलें. त्या समयीं हस्त जोडून प्रार्थना केली कीं, 'सत्पात्र हें खरें, परंतु मूळचा हि संकल्प जाणोन स्वामींनी कृपा करावी.' ऐसी विनंती करतांच 'बहुत बरें' म्हणोन आज्ञा केली. त्यावरून कल्याण गोसावी यांणीं महाराजास सांगितलें कीं, 'पूजा सामोग्री आणवावी, जवळ नसल्यास अरण्यपुष्पें आणोन साहित्य करतों.' महाराजांनी विनंति केली कीं, 'साहित्य सर्व सिद्ध आहे.' म्हणोन आपण स्नानास गेले. श्रीचें देवालयापासून सिंगणवाडीपर्यंत मनुष्यांची डाक होती. त्यांच्या हातून सूचना पाठविली. निळो सोनदेव व बाळाजी आवजी यांसि साहित्य घेऊन येणें म्हणोन राजश्रीची आज्ञा होतांच आज्ञेप्रमाणें साहित्य घेऊन निळो सोनदेव व बाळाजी आवजी बागेंत प्रविष्ट जाले. तों महाराज स्नान करून आले. यथापद्धतीप्रमाणें पूजा दिवाकर भटजींनीं सांगितली. महाराजानीं केली. पूजा जाल्यानंतर महाराजांस त्रयोदशाक्षरी मंत्राचा अनुग्रह केला. महाराज यांणीं कृतकृत्य मानून, साष्टांग प्रणिपात करून, परम युक्तीनें नम्र होऊन परमार्थ विषयाचा प्रश्न केला.

तें समयीं स्वामी कृपाळू होऊन राजाची धारणा पाहोन आत्मनात्मविचार थोडक्यांत सर्व समजावें म्हणोन सांगितला. तो समास तेरावे दशकांत सहावे समासीं लघुबोध सांगितला आहे, तें सांगोन राजाची धारणा पाहोन बहुत मर्जी संतोष होऊन मस्तकीं वरद हस्त ठेवून प्रसाद नारळ दिल्हा; आणि मूठभर माती, मूठभर खडे, व मूठभर लीद या प्रमाणें महाराजांचे पदरांत प्रसाद घातला. ते घेऊन साष्टांग दंडवत प्रदक्षणा करून हस्त जोडून उभे राहिले त्या समयीं बाळाजी आवजी व निळो सोनदेव यांणीं प्रार्थना पूजा करण्याविषयीं केली. तें हि मान्य करून उभयतांस हि आज्ञा जाली. त्याजवरून उभयतांनीं पूजा करून अनुग्रह प्रसाद घाते पावले. महाराजांनीं पूजा केली त्या समयीं वस्त्रें, आभरणें, जव्हाहीर, मोतीं, पोवळे, पुतळ्या, द्रव्य अपरिमित आणोन अभिषेक केला. तें द्रव्य स्वामींनीं चहूंकडे उधळिलें, आणि गुराखी पोरें ह्यांस बोलावून आणोन द्रव्य जमा करून नेणें म्हणोन सांगोन आपण उठोन डोंगरांत चालले, आणि कल्याण गोसावीयासी आज्ञा केली कीं, "तुह्मीं राजश्री बरोबर जाऊन श्री रघुपतीचें दर्शन करवावें आणि आमची विनंति सांगावी कीं, शिवबास आपण प्रसाद द्यावा आणि मंडळीसहवर्तमान भोजन प्रसाद द्यावा. यांसी तीन रात्री ठेऊन

घ्यावें, आम्हीं येऊं." हें सांगून घोडोबाचे डोंगरावर गेले. पूजा सामोग्री उधळली यातील शेष राहिलें तें दिवाकर गोसावी यांणीं जमा करून घेऊन कल्याण गोसावी महाराज मंडळीसह मठास आले. श्रीच्या दर्शनास देवालयांत कल्याण गोसावी घेऊन गेले. आणि प्रार्थना केली कीं, शिवाजीराजे ह्यांस प्रसाद आपण द्यावा, म्हणोन स्वामींची विनंति आहे. ह्मणतां च मस्तकी तुरा मोगऱ्याचे कळयांचा होता तो घसरून खालीं आला. तो तुरा कल्याण गोसावी यांणीं घेऊन शिवाजीराजे ह्याचें मस्तकीं खोविला. तो तुरा मोत्यांचा जाला. नंतर महाराज व सैन्य सहवर्तमान भोजन जालें. मुकाम जाहला. स्वामींनीं द्रव्य अरण्यांत उधळिलें तेथें अद्यापि त्या स्थानीं रुपये, चौकटीची मोहोर, चौकटीची पुतळी सापडत आहेत.

महाराजांचा मुकाम तीन दिवस चाफळीं होता. दुसरे दिवशीं समर्थांची स्वारी मठास आली. सर्वत्र सामोरें गेले. स्वामींनीं येऊन स्नान करून, श्रींची पूजा करून, नैवेद्य समर्पण जाल्यावर, राजश्रीस पंगतीस घेऊन भोजन होते-समयीं आकास व वेणूबाईस व दिवाकर गोसावी या त्रिवर्गास बोलावून स्वामी बोलिले जे, "आम्ही अरण्यवासी, श्रीचें दर्शनास राजे लोक आले. यांस मेजवानी केली पाहिजे. तर उदयीक श्रीस नैवेद्य करून राजश्रीस निरोप देऊं." नंतर प्रातःकाळीं श्रीचे आज्ञेप्रमाणें नैवेद्याचें साहित्य सिद्ध करून समर्थ यांणीं श्रीची पूजा, नैवेद्य समर्पण जाल्यानंतर महाराजांनीं समर्थांची पूजा केली. तीर्थप्रसाद घेऊन श्रीचे आज्ञेवरून पंक्ति मांडोन पद्धतीप्रमाणें भोजनें जाहालीं. नंतर बरोबर सैन्य होतें. ज्या ज्या ज्ञाती त्या प्रमाणें भोजनास घातलें. नंतर महाराज यांस प्रसाद देऊन निरोप दिल्हा त्या समयीं राजश्रींनीं प्रार्थना केली कीं, "नित्य दर्शन, तीर्थप्रसाद मजला प्राप्त व्हावा." "आम्हीं अरण्यवासीं, तुम्हीं राजे लोक, नित्य दर्शन व्हावयाचें नाहीं. नेम केला हा कामाचा नाहीं. चरणतीर्थ घेऊन, त्यांत गंध उगाळून, ताईत करून त्यांत ठेवावें. नित्य पूजा करून तीर्थ घेत जावें. ती पूजा आम्हांस पावेल." म्हटल्यावरून 'आज्ञा हे मान्य' ह्मणोन नमस्कार करून उभे राहिले. 'जावें' ह्मणोन आज्ञा जाली. नेत्रीं उदक भरलें आहे, रोमांच उभे आहेत, हें समर्थांनीं पाहून बहुत संतोषयुक्त बोलिले, "काहीं दिवसीं दर्शन घडत जाईल. तुम्हीं स्मरण कराल त्या समयीं दर्शन घडेल." ऐसी आज्ञा होतां च चरणीं मस्तक ठेवून दंडप्राय

मुहूर्तमात्र पाहोन समर्थांनीं उचलून, आलिंगन देऊन, मस्तक अवघ्राण करून "शिवबा, तूं धन्य आहेस, तुझा भार सर्व श्रीवर आहे. तूं कांहीं चिंता न करणें." ह्मणताच पुन्हः नमस्कार करून व प्रदक्षणा करून, आज्ञा घेऊन प्रतापगडास जाते जाले.

—( हनुमंतस्वामीकृत बखर )

★ क्र. १७

## येथेंहि शिवाजी आला काय?

शिवाजीराजावरी आपणच युद्धास जाणें म्हणून निघाल्या समर्थी, आपले फौज समग्र शिवाजी राजाचे पराक्रमें मथें कडून मग्न आहेत. ही पाहून मनीं कांहीं खिन्नशा व आपल्या फौजेवरी रागही धरून चाले करून जाते वेळेस येक्या प्रदेशीं नदींत आपण बसल्या खास घोड्यास आपणच अनालस करून पाणी पाजविलें. तेव्हा तो घोडा एकदम पाणी पीवून परतून दुसरेंदा पणिस तोंड पाण्यासमीप नेते समयीं उसळून पाण्यास आलीकडे कांठावरी येऊन परतून पाण्याकडे पाहिनासे झाला. तेव्हां बाच्छाई वरी होते. त्यांनीं सांभाळून बसून आपल्या घोड्यास पाहून "येथेही शिवाजी आला काय? का घाबरा झालास?" म्हणून फौजेकडे पाहिले. तरी त्या फौजेचें चित्तहीं व्यग्र जाणून तेथेंच मोकाम करून शिवाजी राजास जीत धरून पहावें म्हणून अनेक प्रयासे केले. परंतू साध्य जाहले नाहीं करितां त्यांचा सुरत तरी लिहून आणून पाहावी म्हणून योग्य ऐशा चितान्यास पाठविले. आपण तेथून कूच करून मुरडून स्वस्थळास पावले. त्या चितान्यानें येऊन बहुत दिवस समय पाहिला. परंतु राजाची रीत, देश, सांपडण्याच्या आयासाकारितां राहिल्या स्थळीं राहणें नाहीं. येका देशावरी जाताहेत म्हणून राखून असते वेळेस पलीकडे एक प्रदेशीं वीस गावें, तीस गावें भोईवरी आहेत म्हणून ऐकणें. तेथें जाऊन पावेतोरी आणखी कोठें कीं वर्तमान कळणें नाहीं. अशांत शिवाजी राजानीं अमुक देश बांधिला, अमके राज्य बांधिले, अमकी ठाणी ठेविले, पलीकडे अमुक्या राज्यावरी चाली केले ऐसे ऐकणें मात्र परंतु राजे दृष्टिपथांत येईनात. ऐसे अनेक दिवस

फिरत असतां, येकया दिवशीं शिवाजी राजे भल्या घोड्यावरी स्वार होऊन शिरीं मुंडास, माजात माजचोळणा, जोडे, छत्री, पासोड्याची पंचरंगी, बाछण, हातींचा भाला खांद्यावरी ठेवून, मस्तकानें दावून घेऊन जोंधळयाचे शेतांत जाणार, हातीं जोंधळयाचें कणीस घेऊन दोन हातानें ते कणीस चोळून फकरा मारून त्याचा भुसटा घोड्याचे तोंडात देत होते. तैशा अवसरात चितान्यानें पाहून त्याच रीति सुरत लिहून नेवून औरंगजेबापाशी दिल्हा. ते पाहून आश्चर्य मानिले जे, शिवाजी राजा नीतीनें लक्ष स्वाराचा सरदार श्रीमंत. तसा राजा कार्य साधणेंच्या तात्पर्यास्तव येकेठायीं उतरून कार्य नासून जाईल म्हणूनही जवळील सरदार आपल्या मनोगतानुसार कार्यकरणेस खोळंबतील म्हणूनही जोंधळयाचें कणस चोळून खावून त्याचा भुसटा घोड्यासही चारिणाऱ्या राजाचा हुशार आणि प्रयासी राजा साजणार. कोणत्याविषयी प्रयास करणें व्यर्थ म्हणून दृढ मानून स्वस्त राहिले.

( तंजावर येथील श्रीबृहदीश्वराचें देवळांतील शिलालिखित, पृ. ५०–५२ )

★ क्र. १८

## काय हुन्नर जाहला न कळे !

राजे आले ही खबर पादशाहास समजून रामसिंग पुढें भेटीस पाठविलें. रामसिंग येऊन भेटले. पादशाहाचें सर्व वर्तमान सांगितलें. बाह्यात्कार समाधान खुशाली सांगितली. "मनात पादशाहाचें काय आहे न कळे." असें बोलिले. रामसिंग भेट घेऊन पादशाहापाशीं आले. वर्तमान सांगितलें. पादशाहांनीं एक हवेली जागा सचंतर शिवपुरा म्हणवून बसवून तेथें राजे राहिले. मुहूर्त पाहून पादशहाचे भेटीस चालले. पादशाहांनीं सदर करून पांच हत्यारें आपणाजवळ ठेवून, कंबरबस्ती करून, आंगांत जरीची कुडती घालून खासा तख्तीं बैसला. तसेंच तख्ताजवळ मोठे मोठे शूर मर्दाने व तख्ताचे आसपास दोन हजार माणूस उभे केले......मनांत कीं, "शिवाजी सामान्य नाहीं. सैतान आहे. अफजलखान भेटीमध्यें मारिला. तैसाच उडोन तख्तावरि आला आणि आपणांस दगा केला तरि काय करावें ?" असें

समजून मुस्तेदीनिशीं बसला. राजियासि भेटीस बोलाविलें. राजे व पुत्र संभाजीराजे व कारकून व हुजुरे अगत्याअगत्य दहाजण भेटीस रामसिंग घेऊन गेले. पादशाहाची नजर जाहाली. पादशाहा बोलला जे, "आवो, शिवाजी राजे" असें बोलताच शिवाजीनें तीन सलाम केले. मनांत भाव धरिला कीं, श्रीशंभुमहादेव एक, दुसरा श्रीभवानी, तिसरा महाराज पितियास, ऐसे तीन सलाम केले आणि उजवे बाजूस जसवंतसिंग महाराज, नवकोट मारवाडचा राजा, त्याचे शेजारीं खालतें उभें राहावयासाठीं हुकूम केला. राजे व पुत्र उभे राहिले. रामसिंग यास पुसलें कीं, "आपणावरते शेजारीं कोण?" असें पुसिलें. त्यास रामसिंग बोलिला जे, "महाराज जसवंतसिंग." असें ऐकतांच राजा क्रोधयुक्त होऊन बोलिला कीं, "जसवंतसिंगासारखा उमराव! याच्या पाठी माझ्या लष्करानीं पाहिल्या असतील! याचे खालें आपण उभें राहावें म्हणजे काय?" असें क्रोधें बोलून, रामसिंगाची कटार माजेची घेऊन महाराजा यास मारितों म्हणवून कटार मागूं लागले. मग रामसिंग "धीर धरणें" म्हणून बोलूं लागले. शब्दाशब्दी होतांच पादशहास कळलें. पादशहा म्हणूं लागले कीं, "काय जाहालें?" रामसिंग बोलिला कीं, "जंगली वाघ हयवान, त्यास गर्मा जाहाला. काहीं करीणा जाहाला." असें बोलतांच पादशाहाचे मनांत शंका उत्पन्न जाहाली. काय होईल तें न कळे. म्हणून रामसिंगास पादशाहा बोलिले कीं, "राजियास घेऊन डेरियास जाणें. उद्यां साद्यां सावकाश मुलाखत होईल" असे बोलतांच राजे व राजपुत्र व रामसिंग राजियाचे लोक देखील हवेलीस गेले. राजा बाहेर गेल्यावारि पादशाहा संतोष जाहाला आणि "मोठा अनर्थ चुकला. शिवाजीचीव आमची नजर जाहाली होती," ऐसे बोलून राहिले.

दुसरे दिवशीं पादशाहा यांणीं राजापाशीं ५००० स्वार व पायदळ पोलादखान कोतवाल यास हुकूम केला कीं, "तूं राजाच्या डेऱ्या भोंवतीं चौकीं देऊन खबरदारीनें राहाणें." त्यावरून कोतवाल येऊन डेरा ठोकून राहिला. मग राजे घाबरे जाले. कष्टी होऊं लागले. संभाजीराजे यांस पोटांसी धरून बहूत खेद केला. बोलिले जे, "आतां काय हुन्नर करावा?" असा विचार करिता रात्र जाली. मग श्री भवानी स्वप्नांत येऊन साक्षात्कार जाला कीं, "कांहीं चिंता न करणें. येथून तुजला सर्व शत्रूंस भूल घालून,

मोहनास्त्र घालून, पुत्रासहवर्तमान घेऊन जातें. चिंता न करणें " म्हणोन अभय जालें. मग जागृत होऊन आप्तविषयीं लोकांस सांगितलें आणि समाधान मानिलें.

दुसरे दिवशीं नाना जिन्नस मेवा खरेदी करून आणविला आणि पेटारे आणवून १० पेटारे मेवा भरिला. एका पेटाऱ्यास दोघे दोघे मजूर लावून मध्ये लाकूड घालून मेवा वजिरास पाठविले. चौकीच्या लोकांनीं पुसलें कीं, " पेटारे कोणाचें ? कोठें जातात ? " मजुरांनीं उत्तर दिलें कीं, " राजे यांणीं चौघां वजिरांस मेवा पाठविला आहे. " त्यांणीं एक दोन उघडून पाहिले, तों मेवा खरा. मग जाऊं दिले. असा राबता रोज लाविला.

मग एके दिवशीं राजे व राजपुत्र एकच पेटाऱ्यांत बसले पुढें मागें पेटारे करून मध्यें पेटारियांत बसून चालिले. ते वेळीं आपला साज सर्व उतरून, हिरोजी फरजंद यास घालून, आपले पलंगावरि निजविला. हात मात्र त्याचा उघडा बाहेर दिसूं दिला आणि शेला पांघरून निजविला. आणि पोरगा रगडावयास ठेविला. आणि आपण उभयतां पेटारियांत बसून निघोन चालिले. चौकीचे लोक होते. त्यानीं एक दोन पुढील पेटारे उघडून पाहोन वरकड पेटारे न उघडितां जाऊं दिले. शहराबाहेर दोन कोसांवरि जाऊन, पेटारे टाकून, पायउतारा होऊन, अवघियांनीं रानांत बसून विचार केला कीं, "आतां जरि नीट आपले देशास जातों तरि तिकडे लाग करून फौजा धावतील. तिकडे जाऊं नये. दिल्लीपलीकडे जावें. वाराणशीकडे जावें. " असें करून राजे व संभाजी राजे व निराजी राऊजी व दत्ताजी त्रिंबक व राघो मित्रा मराठा ऐसे निघोन चालिले. वरकडांस मनास मानेल तिकडे जाणें, म्हणून सांगितलें. आपण व राजपुत्र व इतर लोक कारकून ऐसे वाराणशीकडे आंगास राखा लावून, फकिराचें सोंग घेऊन मथुरेकडे गेले.

मागें दिल्लीमध्यें हिरोजी फरजंद पलंगावरि निजला होता. तो चार प्रहरे रात्र व तीन प्रहर दिवस तैसाच निजला. चौकीचे पोलादखानाचे लोक कोठडींत येऊन पाहतात ( तों ) राजे शेला पांघरून निजले. पोर पाय रगडीत होता. पोरास लोक पुसतात कीं, " राजे आज फार वेळ निजले ? " पोर म्हणतो कीं, " शीर दुखतें. " ऐसें पाहोन लोक जातात तैसाच तीन प्रहर हिरोजी निजला होता. तों प्रहर दिवस असतां हिरोजी उठोन, आपलीं

पांघुरणें, चोळणा, मुंडासें घालून, पोर बरोबरि घेऊन बाहेर आला. चौकीदारानीं पुसिलें त्यास हिरोजीनें सांगितलें कीं, "शीर दुखतें, कोणी कोठडींत जाऊं लागेल त्यास मना करणें आपण औषध घेऊन येतों." म्हणून चौकीदारास सांगून दोघे बाहेर गेले. रामसिंगाचे गोटास जाऊन त्यास एकांतीं वर्तमान सांगोन, आपण तेथून निघोन देशाचा मार्ग धरिला.

नऊ तास दिवस आला. नववे तासां चौकीचे लोक म्हणत होते कीं, "आज माणसाचा राबता नाहीं राजा श्रमी जाहाला आहे म्हणून चाकर सांगतात त्याजवर कोणी जात येत नाहीं, काय वर्तमान?" म्हणून कोठडींत पाहावयासि गेले तों पलंगावरि कोणी नाहीं. राजा पळाला ऐसें जाहलें. हें देखोन पोलादखानानें पादशाहाजवळ वर्तमान सागितलें कीं, "राजा कोठडींत होता. वरचेवर जाऊन पाहात असता एकाएकीं गइब जाहाला पळाला किंवा जमिनीमध्यें घुसला कीं अस्मानामध्यें गेला, हें न कळे. आम्हीं जवळच आहों. देखत देखत नाहीसा जाला. काय हुन्नर जाहाला न कळे." ऐसें जाऊन सागतांच पादशाहास आश्चर्य वाटून बहूत तजविजींत पडला. आणि कुल फौजात ताकीद करून चौतर्फा अष्ट दिशेस दोन लाख साठ हजार स्वार शोधावयास रवाना केले. त्यास सांगितलें कीं, "शिवाजी हुन्नरवंत आहे. एकादा वेष धरून जात असेल. तरि तुम्हीं जंगम, जोगी, संन्यासी, तापसी, बैरागी, नानकपंथी, गोरखपंथी, फकीर, ब्राह्मण, कंगाल, ब्रह्मचारी, परमहंसी, वेडीं, नानापरींचीं सोंगें शोध करून, राजा ओळखून, कैद करून आणणें." अशी इशारति सांगोन रवाना केले.

( कृष्णाजी अनंत सभासदकृत "शिवछत्रपतींचें चरित्र", पृ. ४६ ते ५२ )

★ क्र. १९

## शिवछत्रपतीस राज्याभिषेक

सुमुहूर्ताचा नियम शास्त्रीं आहे तो काढिला. सर्वमतें आनंदनाम संवत्सर ज्येष्ट शु॥ त्रयोदशी सिद्ध केली. आणि संपूर्ण क्षेत्रें व प्रतिष्ठित ब्राह्मण व मांडलिक राजे, इष्टमित्र, सर्व राज्यांतील सेवकजन यांसि येण्याविषयीं पत्रें आमंत्रणाचीं लेहविलीं.

समारंभास स्थानाची योजना. मुख्य सिंहासन राजधानी करणें यांसि पुण्यदेश पुण्यभूमि पाहून आसमंताद्भागीं पुण्यक्षेत्रें व महानदी व स्थानीं स्थानीं विपुल उदक, कृत्रिम सरिता म्हणजे पाटनहर यांचें उदक, सर्व धान्यें त्याच देशीं व्हावीं ऐसें स्थान व शत्रूस दुःसाध्य असावें, याजवरून रायगड ही जागा सर्व राज्यांत दुःसाध्य व श्रीकृष्णा समीप, सर्व उत्तम लक्षणें आहेत पाहून योजिली. तेथें सिंहासनास सभा करविली ज्या सभेंत सहस्त्रावधी मनुष्यें बसावीं त्यांसि शीतोष्ण बाधा न व्हावी, चित्रविचित्र स्तंभ व अष्टप्रधानाचीं स्थानें व भिंती वगैरे परम रमणीय ऐसें करवून त्यांस उल्लोच व वितानें म्हणजे चादवे चांदण्या सुवर्णमय वस्त्रें किनखाप, बादली ऐशीं करविलीं. पटल म्हणजे पडदे किनखापी करविले. सिंहासनाचें स्थान तेथें सुवर्णाचे स्तंभ चार. त्यात चांदवा अमोल्य जरी. त्यास मुक्ताफळांचे गेंदाचे घोस. ऐसें बहूत चांगलें सभास्थान करून सर्व राजमंदिरें त्यास चित्रें, रंग देऊन जागां जागां उत्तम स्थळें केलीं.

सर्व सरकारकून व सरदार व सुभेमामले, कारकून लोक व सेवक लोक असें दाहा पांच लक्ष माणूस जमा जालें. पन्नास हजार ब्राह्मणसमुदाय जमा झाला. सर्वांसही मोठा हर्ष–उत्कर्ष ! ज्यास जे अधिकार नेमून दिल्हे, सांगितले ते बहुत सावधपणें, तिळमात्र न्यून पडों न देतां प्रथमपासून सिंहासनारोहणापर्यंत कोणतेही दिवशीं प्रातःकालापासून सायंकाळपर्यंत काय व्यवहार होणें, त्याचें साहित्य काय, कोणास काय देणे याचे नेम करून, जाबते लिहून, पुन्हां गलबल 'द्या' 'घ्या' म्हणावयाची एकही पडूं नये ऐसें करून, ज्यांचें त्याजपाशीं देऊन, तिळमात्र गरगशा अथवा बोभाट न पडतां तो दिवस सिद्धीस जावा, ऐसें करून दिल्हे.

या प्रकारें करून त्रयोदशीचा दिवस प्राप्त जाला असतां, अष्टप्रधान करण्याची योजना करून आठ सिद्ध केलें. लेखकद्वय—एक पत्रलेखक व एक गणलेखक–ऐसे योजिले. ऋत्विज, छंदोगामात्य, प्रधान व द्वादश कोश, बारा महाल व अष्टादश शाला कारखाने यांचे अधिकारी, देशाधिकारी नगराधिकारी ऐसे सर्व पृथगाकारें योजिले. सर्वांसही मंगलस्नाने करवून महाराजांनीं मंगलस्नान केलें...सर्वांनीं शुभ्र वस्त्रें, गंधपुष्प, अलंकार करून व महाराज शुभ्र वस्त्रें, अलंकार पुष्पें परिधान केले. आणि क्षीरवृक्षाचें आसन सवा हात उंच व रुंद ऐसें करून, तें सुवर्णेकरून मढून, त्याजवर आरोहण केलें. पट्टराणी

यासि पटबंधन करून सोयराबाई साहेब बसलीं. संभाजी महाराज समीप बसले. पूर्वेस मुख्य प्रधान ब्राह्मण ते मोरोपंडित प्रधान पिंगळे हातीं सुवर्णकलश घृतपूरित घेऊन उभे राहिले. दक्षिणेस क्षत्रियप्रधान असावे ते सेनापति हसाजी हंबीरराव मोहिते रौप्यकलश दुग्धपूर्ण घेऊन उभे राहिले. पश्चिमेस निळोपंत यांचे पुत्र रामचंद्रपंडित अमात्य ताम्रकलश दधिपूर्ण घेउन उभे राहिले. उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथपंडितराव सुवर्णकलश मधुपूर्ण घेउन उभे राहिले. त्याजपाशींच मृत्तिकाकुंभांत समुद्रजल व महानद्यांचे जल कृष्णा, गोदा, यमुना, गंगा यांचें उदकेंकरून पूर्ण ऐसा (कुंभ) ठेविला......सन्मुख सव्य भागीं पत्रलेखक आवाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभे राहिले. वामभागीं सन्मुख गणकलेखक चिमणाजी आवजी लेखनपात्र घेउन उभे राहिले. आसमंताद्भागीं सर्व कोश व शाला यांचे अधिकारी उभे राहिले. मध्यें शिष्ट ब्राह्मण, पंडित, वैदिक, श्रोत्री, प्रतिष्ठित उभे राहिले. सुहृद व मांडलिक राजे भोंवते उभे राहिले. आणि अभिषेकास प्रारंभ जाला. यथाविधि मंत्रोक्त प्रकारें प्रधान, ब्राह्मण व पुरोहित ऋत्विजसह सुवर्णांचीं पात्रें शतछिद्र करून, त्यात स्थापित उदकें करून व प्रधान द्रव्यकलश घेऊन उभे राहिले. त्यांसह-वर्तमान अभिषेक केला ते समयीं मंगल वाद्ये, भेरी, गायनादी समारंभ. सर्वही आकाश पृथ्वी शब्दें करून पूर्ण जाली !

नंतर मंगलालंभन सुवासिनींना आरती केली. आणि कांस्यपात्र घृतपूरित त्यांत मुख पाहिलें, व आदर्शांत मुख पाहून ब्राह्मणास दक्षिणांसह दानें दिल्हीं. तदनंतर सिंहासनारोहण करण्याचा मुहूर्त घटिकादी स्थापना केली होती [ तो साधिला ]. सिंहासनसभा केली. तेथें क्षीरवृक्षांची वेदी वट औदुंबर यांची करवी तशी करून, त्या ठोकळयास सुवर्ण करून तगडें मढून रत्नखचित केलें. प्रमाण आहे तसे केलें...उत्तम लक्षणीं हत्ती व अश्व व रथ सजवून , सुवर्णांचे अलंकार घालून, राजागणीं सिद्ध असावे तसे आणिले... सिंहासनाचे ठायीं आधीं सव्य जाऊन, सव्य गुडघा टेकून, नमस्कार करून, पाय न लावितां पूर्वाभिमुख आरोहण करावें तसें केलें. ते समयीं एकदांच भेरी व मंगलवाद्य, तोफा, सरबत्ती व नृत्य, गीत, वाद्य, जयशब्द एकदांच होण्यास प्रारंभ जाला ! तो नाद मोठा, गगनचुंबित शब्द होता जाला ! स्वराज्यांत किल्ले, दुर्ग यांस सूचना केली होती जे, एक किलियाच्या तोफा

एकानीं ऐकतांच त्याणीं करावया. ऐसें सर्व राज्यांतील किल्ले, दुर्ग यांस एकदांच सरबत्ती जाली !

यानंतर सिंहासनीं बसल्यावरि रक्तांबरें, रक्तभूषणें, सुवर्णमय बादली परिधान केलीं. दिव्य माणिकादी रत्नें, चौकडे, कंठया, माळा, शिरपेंच, तुरा, जेहेगा, पोंहच्या ऐसे अलंकार घातले. आणि विधिमंत्रें करून धनुष्यबाण पूजन व खडगचर्म पूजन करून ते हस्ताचे ठायीं धारण केलें. त्यासमयीं सुवर्णाचीं पुष्पें व रौप्यमय करून वृष्टि केली ! षोडश सुवासिनी यांणीं मंगल आरत्या, ब्राह्मण कन्या घेऊन, उभें राहून, करावया तैसें केलें. त्यांस वस्त्रें, भूषणें, अलंकार दिल्हे. नंतर सिंहासनाचे ठायीं बसल्यावरि मंत्रविधी करणें तें करून ब्राह्मणांचे आशीर्वाद घेणें ते घेतले. ऋत्विज, आचार्य व ब्राह्मण पूजन करून गागाभट्टजी यांस लक्ष रुपये दक्षिणा संभावना केली. वस्त्रें भूषणे दिल्हीं... किल्ल्याखालीं व वरती देकार वाटण्यास प्रारंभ एकदाच करविला. याप्रमाणें महाराज शालिवाहन शके १५९६ पंधराशे शाहाण्णव आनंद नाम संवत्सरें, जेष्ठ शु॥ त्रयोदशी मंदवासरे सुमुहूर्तें छत्रसिंहासनाधीश्वर जाले. आणि राज्याभिषेक [ झाला ] त्या दिवसापासून आपला शक चालविला.

( चिटणीसकृत ' सप्तप्रकरणात्मक चरित्र ')
पृ. ३२६–३३४.

★ क्र. २०

## आमचीं बिरुदें अष्टदिशेस लागलीं आहेत !

या उपरि राजश्री व्यंकाजी राजे, धाकटे भाऊ राजियाचे, यांनीं चंदावरचें राज्य साध्य करून राज्य करीत असत त्यांनीं आपले कारकून होते तें समागमें घेऊन राजियाचें भेटीस आले. भेट बंधूबंधूंची जाली......... बहूत संतोष जाला. उभयतां बंधूंची मेहमानी परस्परें जाली. देणेंही उभयतांनीं उदंड दिलें आठ दिवस एकत्र होते मग राजियांनीं व्यंकाजी राजे यांसि प्रश्न केला कीं, ' महाराज तुमचे आमचे पिते. आपण त्यांजकडून निरोप घेऊन पुण्याकडे जाऊन येवढें राज्य साधिलें. कीर्त केली. ऐशियासि वडिलांचीं बारा बिरदें तुम्हांजवळ

आहेत. ती तुम्ही चालवीतच आहां ऐशियास आपण वडील पुत्र आणि पराक्रमी, तुम्हाहून पराक्रम विशेष केला. बारा बिरदें मात्र तुम्हाजवळ आहेत. तीं आपणास देणे आपण चालवूं. नवीं बिरदें करावयाचीं काय आशंका आहे ? परंतु वडिलाचीं हातचीं आहेत तेवढीं आपणाजवळ असावीं म्हणून मागितलीं" त्याजवरून त्यांनीं विकल्प चित्तात आणून दिलीं नाहींत. त्याजवर एकाजी राजे यांच्या कारकुनानीं व कारभारी यानीं त्याचें पोटात भय घातलें, कीं राजे तुम्हाशीं खटपट करून बिरदें जोरावारीनें घेतील. असें सागून त्यांस धास्त उत्पन्न करून रात्रीचे वेळेस व्यंकाजी राजे पळून चंदावरास बिरदें घेऊन गेले.

त्यास दुसरे दिवशीं राजियास वर्तमान कळलें कीं, व्यंकाजी राजे पळून गेले. त्याजवरून आश्चर्य केलें कीं, "काय निमित्य पळाले ? आम्हीं त्यास धरीत होतों कीं काय ? आम्हांस बिरदें काय करावयाचीं ? आमचीं बिरदें अष्ट दिशेस लागलीं आहेत. समुद्रवलयांकित भूमंडळीं कीर्ति आपली जाहली आहे. तेथें बिरदें काय करावयाचीं ? वडलाची वस्त असावी म्हणून मागितलीं होतीं. पळावयाचें नव्हतें. द्यावयाची नव्हती तरि न देणे. उगेच उठून पळून गेले. अति धाकटे ते धाकटे. बुद्धिही धाकटेपणा योग्य केली." असे बोलिले. मग त्याचे कारकून व सरदार पळत होते ते राजियाच्या लोकांस सापडले. त्यांस धरून आणिले. मग त्या अवघियास वस्त्रेंभूषणें, अश्व देऊन चंदावरास बंधूसन्निध पाठविले.

—(सभासदकृत शिवछत्रपतींचें चरित्र, पृ ९० ते ९३)

★ क्र. २१

## शिवाजीमहाराजांची दिनचर्या

याप्रमाणें सर्व दौलतीचा बंदोबस्त बहुत तरतुदीनें करून आपण नित्य दिनचर्या करण्याचे नेम केले कीं, उषःकालीं उठावें. ते समयीं गायक यांणीं श्रीभगवंताचे स्तुतिपाठ, वीणा, मृदंग, मंगलवाद्यें, नगारखाना यांचें श्रवण करून उठावें. काहीं प्रातःस्मरण करून सर्वकर्ता भगवान हे संकल्प करून शौच विधियुक्त करावा. नंतर गो-सेवन दर्शन, मंगलालंभन करून स्नान गंगादि महानदी-उदकें करावें. जप-ध्यान देवतार्चन करावें, तें समयीं सर्व शिष्ट ब्राह्मण

सभापंडित यांणीं धर्मचर्चा करावी. पुराणश्रवण करून चार घटका दिवसास तिलकवस्त्रें अलंकार भूषणें घेऊन तिरंदाजी व निशाण एक घटका करून सभेस यावें. तेथें सर्व कार्यकर्ते कारभारी वगैरे यांणीं आपापलीं कार्यें विचारून करावीं. जे जे दर्शनास येतील त्यांजकडे कृपायुक्त अवलोकन करून त्यांचे मुजरे घ्यावे. कोणाकडे अवलोकन करून किंचित् हास्य करावें; कोणाशीं कांहीं भाषण करावें; कोणास कार्यें सांगावीं ऐशीं सर्वत्रांचीं अंतःकरणें वेधून घ्यावीं. सर्वांस भासावे जे, माझे ठायीं कृपा विशेष आहे. ऐसा सर्वत्र आले त्यांचा गौरव करावा. दाहा घटका दिवस आलियावरि दोन चार घटका विविक्तस्थानीं ज्याच्या करणें त्याशीं मंत्रविचार करावा. नंतर बारा घटका दिवसास ब्राह्मण-भोजनाचें उदक सोडून, नैवेद्य करून सर्व पंक्तिभोजन करणार यांसहवर्तमान भोजन करावें. आणि तांबूल घेऊन चार घटका पुन्हां मंत्रसभेचे टाईं पत्रें आलीं व पाठविणें [तीं] अवलोकन करणें व कार्ययोजना व मागील दिवशीं आयव्यय झाला, दुसरें दिवशीं [किती] करणें, हें पाहून चार घटका अंतःपुरात वामकुक्ष करावा. बारा घटका दिवस राहता पुन्हा सभेस येऊन सर्व कारखाने, माहाल यांची चौकशी पाहाणे आपण जाऊन पाहाणे करावे. सभा करून न्याय मनसुबी जाली केली ती अवलोकन करून दाद फिर्याद मनास आणावी. साहा चार घटका दिवस राहातां बाहेर स्वारी बाग, आराम, देवालयें अथवा कारखाने यात जावें. घोडीं फेरणे, दोयास्त्या वगैरे खेळून सायंकाळ जाला असतां येऊन सभेस बसून सर्वांचे मुजरे घेऊन दोन घटका रात्रीं जप, ध्यान करून, कांही पुराण व दासबोध दोन समास श्रवण करून भोजन करावें. तांबूल घेऊन सभेस दोन घटका बसोन कारभार-विचार करून एकांतीं चार घटका बसावें. बातमी, नाजूक कामें, पत्रे आलीं तीं व चोरबातमी हेर ठेऊन आली ती व द्रव्याचे, धान्याचे निरख हे श्रवण करून अंतःपुरांत जावें—याप्रमाणें नित्यविधि नेमिला तसें त्या त्या घटका विभागल्या त्यात तेंच करावें. न्यूनाधिक्य होऊं नये. ऐसे नेम केले. याखेरीज नैमित्तिक अवश्य कर्तव्य कार्य उत्पन्न होईल ते सावधपणें त्यांतच निरालस्य-पणें करीत असावें.

(चिटणीसकृत शिवाजी छत्रपतींचें सप्तप्रकरणात्मक चरित्र)

(पृष्ठें १८६ ते १८८.)

★ क्र. १२

# शिवाजीमहाराजांचा मृत्यु

या उपरि आपली अवधी पांचसात दिवस इतकी राहिली म्हणोन सर्व मातबर सरकारकून व सरदार आदिकरून जमा करविले, आणि सर्वांस जवळ बोलावून सर्वांस दर्शन, भाषण करणें तसें केलें. प्रधानादि कारभारी व विश्वासू आत जवळ बोलावून बसवून सांगितले जे, "हें राज्य आपण मोठें पराक्रमी श्रीचें वरप्रदानें संपादिलें; ऐंशी हजार घोडा केली; किल्ले, कोट जंजिरे, प्रांत व द्रव्यही अनेक प्रकारचें कोट्यावधी [ असा ] संग्रह केला. दानधर्म, यश व कीर्ति दोन्हीं साध्य केलीं. पुढें याचें रक्षण करून, आम्हांहून अधिक पराक्रम करून, एक दिल्लीची पादशहात व उत्तरचें राज्य साध्य करणें तें आयुष्य पुरलें नाहीं; व मेळविलें राज्य व माणसें तुम्ही सर्व मोठे मोठे पराक्रमी याचीं भूषणे, योग्यता वाढवून अधिक राज्य वाढविणें येविशीं वडील पुत्र वयेंकरून योग्य परंतु क्रूर आणि व्यसनी, तेव्हां पुढील विचार यथास्थित दिसत नाहीं धाकटे पुत्र गुणे करून योग्य, परंतु वयेंकरून लाहान व धाकटेच. तेव्हां विभाग करून द्यावे, परंतु विभागांनीं चार मातबर लोभाविष्टपणें एकात एक विरुद्ध चालतील. तेणेंकरून राज्यवृद्धी राहून कलह प्राप्त होईल. राज्य ऐशी मर्यादा राहाणार नाहीं. वडिलांनीं राज्य करावें, कनिष्ठांनीं त्याचे आज्ञेत चालून सेवा करावी, ऐसे राजधर्म; तो योग दिसत नाहीं. शत्रूस संधी होतील. हे राज्य देवाचें देणें, नाश होईल. वडील संभाजी राजे, याजकरितां त्याजकडेच सर्व लोक पाहतील, व पाहाणें प्राप्त. परंतु त्यांची चाल एक प्रकार. सरकारकून व योग्यतेचीं माणसें ज्यानीं जिवाभ्य श्रम राज्यवृद्धीसाठीं केले तीं थोर थोर माणसें त्यांच्या अप्रतिष्ठा करतील, नाश करतील. राज्याचा व द्रव्याचा नाश करतील, बुडवितील, लहान माणसांचे सहवासें करून थोरांच्या अप्रतिष्ठा होतील. निर्नायकी होईल. आम्हीं पाया घातला, माणसें गुणसंपन्न मेळविलीं, वाढविलीं तीं राहाणार नाहींत. द्रव्य, खजीना सर्व नाश पावेल. मोठा सबळ शत्रू औरंगजेब तो आपलें स्थळ सोडून निघाला असतां, आमचे तेजप्रभावें आपलें राज्यांतच राहिला आहे, तो पुढें चाल करील......" म्हणोन एक घटिकापर्यंत नेत्र झाकून स्तब्ध जाले

आणि मुखातून अक्षरें आलीं कीं, " संभाजी दगा पावेल, राजारामच बळावून पुनः राज्य रक्षील. मोरोपंडित, निराजी रावजी, रामचंद्र नीळकंठ, संताजी घोरपडे, धनाजी जाधव पुन्हां राज्यवृद्धीस कारण होतील. पुढें शिवनामें राजा होईल. तो दिल्लीपर्यंत राज्य करील." इतकें बोलोन सर्वांकडे पाहिलें. ते समयीं सर्वांस बहूतच कष्ट व दुःख पर्वतप्राय जालें कीं, " महाराजामागें आमचें सर्वांचें वाचणें जीविका व्यर्थ होय !" ऐसा समय प्राप्त जाला. या नंतर महाराजानीं आज्ञा केली कीं, " हा मृत्युलोक ! मोठे मोठे अवतारादिक गेले ! होणार अवश्यानें व उत्तरकाल तसें होतच असतें !! तुम्हीं सर्व पराक्रमी आहां. कळेल तसे प्रयत्न करून राज्य व धर्म रक्षावा. एक विचारें सर्वांनीं चालावें." म्हणून सांगून सर्वांचें समाधान केलें, आणि " बाहेर जवळ बसावें " अशी आज्ञा केली. आणि आपण श्रीगंगोदक घेऊन स्नान केलें. प्रायश्चित विधि केला. भस्मधारण रुद्राक्षतुलसीमाला धारण केलें. आणि दर्भासनीं बसले. शत गोप्रदानें प्रत्यक्ष करून सहस्त्र गोप्रदानें द्रव्यद्वारा संकल्प केला. आणि श्री देवाजीचें नामस्मरण अविस्मरणें करून भगवद्गीता व सहस्त्रनामें पाठ करविले. ब्राह्मणांचे घोष ऐसे होत असतां, शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्रशुद्ध पौर्णिमा, उत्तरायण, दोन प्रहरीं देहत्याग करून अवतार समाप्त " श्रीराम " ऐसें म्हणून केला

ते समयीं दुश्चिन्हें. दिशा धूम्र व नक्षत्रपात, भूमिकंप, इंद्रधनु रात्रीस, ऐसे उत्पात झाले शंभुमहादेव येथील तळयाचें पाणी रक्ताप्रमाणें तीन दिवस झालें. जलचरें फार मेलीं. ऐसे अनर्थ जाले !

( चिटणीसकृत शिवछत्रपतीचें सप्तप्रकरणात्मक चरित्र, पृ ३५९-३६३.)

★ क २३

## संभाजी कलुषाच्या हातीं जातो.

दिवसेंदिवस कबजीचे स्वाधीन अधिकच होत चालले. इतबार मनसबा सर्व त्याचेच स्वाधीन. कोणीही पुरातन राज्यांतील इतबारी त्याची प्रतिष्ठा ठेवावी अथवा मसलतींत घ्यावा हे गोष्ट राहिली. उग्रपणें शासन कोण्ही वर्ण-

विचार न करितां शिरच्छेद करावा, ऐसें करीत चालले. कबजीचे सहवासें त्याचें वाममार्गकर्म तेणेंकरून फारच विचार राहिला नाहीं. माणूसमात्र फारच त्रास पावतें जालें. सर्व प्रजेचीही क्षोभता जाली. न्यायाची रीत राहिली नाहीं. देवब्राह्मणाचे ठायींही निष्ठा राहिली नाहीं. असें आचरण धरिलें. एक कबजी सांगतील तें प्रमाण. दैवयोगेंकरून होणार काल प्राप्त झाला. त्यायोगें दुसरें सुचूं नये या प्रमाणें जालें. मातबर व बुद्धिवंत व शूर होते ते हतवीर्य जाले. महाराजानी नूतनपराक्रम करावा, नवें राज्यसाधन करावें हें राहिलें नाहीं. सुभेदार प्रांतांतील वगैरे, तसेंच गडकिल्ले याचे कारभारी, याजवरि हा कारभारांत खातो म्हणून चुगली करितांच त्याचा विचार न करितां त्यास आणावा, मारावा, नागवावा. अंतरच असलिया शिरच्छेद करावा. या भयेंकरून मातबर चार होते ते कोण्ही जवळ बोलूं न पावत. त्यांस आपली आपलीच अबरू प्रतिष्ठा जतन होणें हेंच येऊन पडलें. एक कबजीचें सांगणें मात्र प्रमाण. त्या नादें महाराज चालणार. त्यासच अनुमोदन देणें मग विचार काय राहिला ? तजकरे घ्यावे, घरें बुडवावीं, नागवावे, माणूस राज्यात वाढलें तें कांहीं परराज्यातून आणून वाढविलें ऐसें घडत नाहीं. ऐशीं राज्यक्षयाचीं लक्षणें होत चाललीं. राज्य क्षयास जाणार त्याथोगें घडत चाललें. वडिलोपार्जित सेवकांच्या प्रतिष्ठा राहिल्या नाहींत. सर्वही लघु मनुष्यें वृद्धिंगत जालीं राज्यांतील सर्व कारभारी किल्ले सुभे यांणीं रोजमुरा वाटणें इत्यादिक बारीक मोठी वर्तणूक करणें तें आज्ञा नेऊन करावी, तसें चालावें, हें थोरल्या महाराजांची रीत घातली. बंदोबस्त हुकुमाशिवाय काडी न हालावी असें केलें होतें. त्या चालीनें सर्व जागाजागाचीं लिहिलीं यावीं. ते समयीं सर्वाध्यक्ष कबजी [यांजवर] अतिप्रीती, त्याणीं इतका कारभार कोठवर करावा ऐसें म्हणावें. व त्यांस ‘ छंदोगामात्य कवि कलश पंडितराव ’ ऐसा किताब दिल्हा. तेव्हां सर्व आला कारभार, ‘ त्यांजकडे जा ’ म्हणावें. बावांनीं “ कागद पाहाणें केलेंच आहे, तथापि लिहिणार इतकें काय म्हणून लिहितात, यांत काय आहे, हंशील कलम ल्याहावें, ते चराठी कशास लिहितात व चंदीपर्यंत किल्ले घेऊन काय समजोन करणारांनीं केलें कळत नाहीं. किल्याचा बोभाट यावा, गनिमांनीं वेढा घालावा, त्याचें वर्तमान येथें येऊन पोहोंचून उपराळा जावा तों तो किल्ला जावा, लोक मारले जावे. हें पातक किती घडतें, व दुर्लौकिक मोठा होतो कीं नाहीं ? राज्य

आगटीचें ठिकडें असे आसपास असावें. पाहतां सर्व ध्यानांत येत असावें. म्हणजे उपराळाही होतो. बंदोबस्त यथास्थित राहतो. सैनक मर्यादेनें चालतात." असें अनेक प्रकारें [ बावानीं ] कल्पना कराव्या, बोलावें. त्यास महाराजांनीं ऐकावें. त्यांचें दैव ! ब्राह्मण लघु असतां योग्यता आली तेव्हां त्यास तर्क व कर्तेपणा, बुद्धी कोठील कळतच आहे. राजे तरी त्याचे स्वाधीनच वश जाले. राज्यभ्रष्ट होणार, तेणें करून कांहीं सुचतें न झालें. थोर थोर ज्यांणीं राज्याविशीं पराक्रम केले, राज्य वृद्धीस नेलें व शूर पराक्रमी यांणींही ऐकावें, आचरण सकल पाहावें, आणि म्हणावें कीं, "देवानीं आम्हास कां ठेविलें ? कैलासवास महाराजांनीं केला त्या अगोदर मेलों असतों अगर महाराजांनीं सर्व मारिलें यांत मारिलें असतें, तरी उत्तम होतें, परंतु असें दिवशीं हें पाहणें अनुचित. याचें अन्न बहुत दिवस खादलें व या राज्यात वाढलों, लौकिक मेळविला, तें व्यर्थ जिणें, ऐसें घडलें. महाराजांचें अकल्याण होतें. आम्हात पराक्रम बुद्धी असून व्यर्थ झाली." ऐसे बहुत श्रम करून "होणें तें होईल, पाहाणें प्राप्त; उगेच असावें." ऐसे सर्व करिते जाले. सर्वही हतवीर्य होऊन कांहीं एक न बोलतां राहते जाले. पागा, हत्ती, सर्व कारखाने, फौज जिकडील तिकडे बेनिगेनें बुडाले, मेले, गेले. फौजेचा दरकार नाहीं, बुडाली. लोक नामी, माणसें कर्तीं, चहूंकडे चार गेलीं.

( चिटणीसकृत संभाजी-चरित्र, पृ. २५-२६ )

★ क्र २४

## मराठे हे आदमी नव्हत, भूतखाना आहे !

औरंगजेब पादशहासारखा शत्रू, लाखों फौज, खजीना बेमुबलक, छकड्यास छकडे द्रव्याचे भरोन कोटिशा बराबर चालत आहेत. आणि आपले सैन्य थोडें. यास्तव मनुष्य राखून, जाया होऊं न देतां, मसलतीनें त्यांच्या सैन्यासभोंवतें हिंडोन, फिरोन त्यांस लांडगेतोड करावी; रयतेची मात्र वैरण राखून, रानातील वैरण जाळून टाकावी, रसद चालूं देऊं नये; आपल्या फौजेंत मणाची धारण, त्यांच्या लष्करांत शेराची धारण; अशा तऱ्हेनें करीत

मराठी फौज किती आहे हा अदमास ध्यानात येऊं देऊं नये; मोंगलाची फौज असेल तेथें तेथें पंचवीसां तिसा कोसाचे छाव्यानीं राहून त्या फौजेस चैन पडूं देऊं नये, असे महाराज करिते जाले. लोभ करीतच असत मोंगलाचे घोडे पाण्यावर आले असता पाणी न पीत त्यास मोंगली लोकानीं म्हणावें जे, पाण्यामध्यें धनाजी व संताजी दिसतो की काय? रात्रीं दिवसा कोणीकडून येतील, काय करतील असें केलें. मोंगलाई फौजेंत आठही प्रहर भय बाळगीत. पादशाहासि बहूत आश्चर्य जाहलें कीं, "मराठी फौज ही बळावत आहे. अकस्मात् यावें, बक मच्छ उचलून नेतो तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्थ करावी, प्रसंग पडल्यास माघारें पळून जावें. खाण्यापिण्याचा दरकार बाळगीत नाहींत. पाऊस, ऊन, थंडी व अंधारी कांहीं न पाहतां घोड्यावरच हरभरे व भाकरी, चटणी व कांदे खाऊन धावतात. त्यास कसें जिंकावें? एक्या मुलकास फौज आली म्हणोन त्याजवर फौजेची रवानगी करावी, तों दुसरीकडे जाऊन ठाणीं घेतात, मुलूख मारितात. हे आदमी नव्हत, भूतखाना आहे!" ...त्याजवरून पादशाहाचें मनांत आलें कीं मराठी मोडत नाहीं. यास कसें करावें? तेव्हां आसदखा वजीर वगैरेनीं विनंती केली कीं, "हजरतपन्हा! मराठे लोक कजाखी, बहूत नेकजात, एकदील ज्यांचें निमक खातात त्यांची चाकरी हलाल करितात आज पंधरा सोळा वर्षे खुदावंत त्याची खामी करवितात तरी ते मोडत नाहींत. यास्तव तह करून चाकर असें ठरवून चाकरी घ्यावी कर्नाटकाचा बंदोबस्त करतील. मोठमोठे ठिकाणीं आपले सरदार सुभे करून ठेवावे. हे व ते मिळून दक्षिण साडेसाहा सुभेचा बंदोबस्त करतील. साहेबीं असे करावें. दिल्लीहून येऊन बहूत वर्षे जाहलीं. दिल्लीस स्वारी जावी" हें ऐकून पादशाहा बोलिले कीं, "फार चांगलें बोलतां आमच्या मनात नाहीं असें आहे की काय? शिवाजी पासोन आम्हीं उद्योग करीत आहों. मराठे याणीं चाकर म्हणवावें, यांचें राज्य राखावें, याच्या हातून चाकरी घ्यावी परंतु ते चाकर म्हणवीत नाहींत. सबब त्यांचें पारपत्य करावें, असा आरंभ केला.

[ चिटणीसकृत राजाराम-चरित्र, पृ. ७८-८० ]

★ क्र. २५

# एक बाजी, सब पाजी

त्यासमयीं जनानखान्यामध्यें वर्तमान समजलें कीं, बाजीराव आले आहेत. ते फार देखणे सुरतपाक आहेत. तेव्हां त्यांस दृष्टीनें पाहावें हा मजकूर त्यांणीं नबाबांस सांगितल्यावरून नबाबाच्याही मनांत भरलें कीं, बाजीराव याची भेट आपण घ्यावी. याप्रमाणें मजकूर नबाब यांचें मनांत येऊन बाजीराव याजकडे वकील पाठविले आणि "तुम्हांस जाफत करावयाची आहे याकरितां तुम्हीं आमचे येथें यावें." असें बोलावणें करावयास सांगितलें. त्या वकिलानीं श्रीमंतास मजकूर समजाविला. त्यावेळेस श्रीमंतांनीं उत्तर केलं कीं, "आम्ही शहरात येणार नाहीं बाहेर कोठे बसावयाची जागा केल्यास तेथे येऊं. तुमची आमची मुलाखत होईल" असें श्रीमंतानीं सांगितल्यावर तो मजकूर वकिलानीं येऊन नबाबास समजाविला. तें नबाबाच्या मनांत येऊन, बरें म्हणून "आम्ही शहराबाहेर साताऱ्यानजिक मेजवानीची जागा करितों. तेथें तुम्हीं यावें." असें सांगून पाठविलें. तें श्रीमंतांनीं कबूल केल्यानंतर नबाब यांणीं सातारें मुक्कामीं मेजवानीची तयारी केली, आणि श्रीमंतांस सांगून पाठविलें कीं, "आतां आपण सडे पांच खिजमतगारांनिशीं यावें" तेव्हां ती गोष्ट श्रीमंताचे मर्जीस येऊन श्रीमंतानीं रुकार दिला. नंतर साताऱ्याजवळ मेजवानीची जागा करून डेरे-दाडे देऊन बिछायत करून सभोंवतीं चिकाचीं बाडें चिरून आंत सारा जनानखाना मोगलांकडील बसला. इकडून बाजीरावसाहेब स्वारी तयार करून निघाले. तें साताऱ्यापासून अलीकडे कोसावर सारी फौज ठेवून, खासा स्वारी तेथून घोड्यावर स्वार होऊन निघाले तें डेऱ्याजवळ आले. नबाबही डेऱ्याबाहेर येऊन बाजीराव यांस आंत घेऊन गेले. उभयताच्या भेटी होऊन बिछायतीवर जाऊन बसले. मग साऱ्या बायकांनीं बाजीराव यांस पाहिलें. तेव्हां मोहोरा चांगला पाहून सर्व बायका खूष होऊन दोन पायली मोत्यें बाजीराव यांजवर उधळलीं. नंतर श्रीमंतांचीं व नबाबांचीं बोलणीं बहुत झालीं त्यावेळेस नबाब बाजीराव यांस म्हणतात, "आतां कसें! आतां तुम्ही आमचे हातांत सापडला!! तुमचे शिंदे, होळकर ते कोठे आहेत? आतां तुम्हांस येथें आम्ही

एखादा दगा केला तर कसें होईल ?" असें बाजीरावसाहेब यांणीं ऐकून श्रीमंत बोलतात, "मी जेथें आहें तेथें सारे माझ्याजवळ आहेत." असें उत्तर ऐकून नबाब म्हणतात, "कोठें आहेत ?" मग होळकर व शिंदे यांच्या भेटी नबाबांशीं करविल्या. त्यासमयीं निजामन्मुलुक यांची खातरजमा झाली. नंतर बाजीराव यांस म्हणतात, "आम्ही तुम्हांस या वेळीं दगा करणार नाहीं. कारण या समयीं आम्हांस तुमची गरज, तुम्हांपाशीं काम बहूत आहे. या उपर आमचे विश्वासावर आमचे भेटीस कोणी येऊं नये. आम्ही दगा करावयास चुकावयाचे नाहीं." असें म्हणून नबाब बोलतात, "एक बाजी सब् पाजी." हें श्रीमंतांनीं ऐकून श्रीमंत नबाबांस बोलले, "एक निजाम सब् हजाम" अशीं परस्परें बोलणीं होऊन, श्रीमंतांत वस्त्रें, अलंकार, जवाहीर वगैरे देऊन, समागमें सरदार होते त्यांसही पोषाख दिले. नंतर बाजीरावसाहेब नबाबांचा निरोप घेऊन आपले लष्करांत येऊन दाखल झाले.

—( कृष्णाजी विनायक सोहनीकृत "पेशव्यांची बखर" पृष्ठें १६–१८ )

★ क्र. २६

## बचेंगे तो और बी लढेंगे !

दुसरे दिवशीं दत्ताजी शिंदे यांनीं कूच करून मजल दरमजल कुंजपुऱ्यानजीक येऊन यमुना उतरून आलीकडे आले. तों गिलचा कुरुक्षेत्रावर आला, याची बातमी पोंचली. मग आपण सडे होऊन हे कोणी एकमेकांस मिळाले नाहींत तों अबदुल अलीस गांठून त्याचा रेच मोडून टाकावा म्हणोन पाणिपतावर गेले. तों तेथून गिलचास सोळा कोसांचा छाटा होता म्हणोन बातमी आली. दत्ताजी शिंदे यांनीं मसलतीस लहान थोर सरदार बोलावून सांगितलें-कीं, "खंदारचा पातशाहा चालोन आला आहे. मी तर पेशव्यांचा बारगीर, माझी अबरू कांहीं विशेष नाहीं. परंतु तुम्ही सर्वत्र राज्यांतील मराठे नामी सरदार, तुम्हांस 'मरा' म्हणवत नाहीं. यदर्थ दोहोरा आहे.

**मारूं तो मरजाउंना, हटूं तो जनोंकी लाज ।**
**ये खुदा परवर दिगार, दोनों कठीन काज ॥**

ऐसा विचार आहे. याचें उत्तर काय?" म्हणोन बोलतांच सर्व नामी सरदार बरेच कुलीन होते. त्यांनीं निरोत्तर केलें कीं, "पाटील, तुम्ही फौजेचे पाठीवर उभे राहाल तर आम्ही इरेनें झुंज करूं तुम्ही फौजेस टाकून पुढें जालेत, तर आम्ही गनीम जातीचे, पाठीवर काठी उडती तोंच जें होणें तें होईल. नाहीं तर झाडास बांधले तरी झाड घेऊन जातील. हा आमचा मराठियांचा स्वभाव. बोलावयाचा मात्र धर्म आहे कीं, जेथें साहेबांचा पायपोस पडेल तेथें आमचें डोकें पडेल. परंतु त्याचे वांटेकरी थोडे. नाहींतरी जेथें साहेबांचें डोकें तेथें भल्याचा पायपोसहि पडणार नाहीं. ऐसा विचार आहे. यांत तुम्ही खावंद आहां" असें म्हणतांच दत्ताजी शिंदे बोलिले, कीं "तुम्ही ज्या रीतीनें सांगाल त्याप्रमाणें वर्तणूक करूं." म्हणोन बोलून रात्रीं मुकाम करून राहिले...

असो. पुढें गेले तों गिलचा जाऊन यमुनातीरीं अडचणींत एकेकडून पानें व शेरणीचीं बेटें व पाणियाची झील असें अडचणींत उतरले. गिलचे यांनीं जाते क्षणीं हत्तीवर उंटांवर झडत पडत बुणगे नदीपार केले. आपण सडा पंचवीस हजार फौज व पांच सातशें उंटांवर सुतरनाले व दोन चारशें उंटांवर बाणांच्या कैच्या व जिलबींतील हलक्या तोफा पन्नास, असा जमून उभा राहिला होता. तों दत्ताजी शिंदे यांचे फौजेचे धुराळे दृष्टीस पडों लागले. ते समयीं नाइकजी भोइटे व जिवाजी भोइटे व गोविंदपंत बुंदेले यांणीं आपण यश घ्यावें म्हणोन त्या अडचणींत शिरोन घोडीं घातलीं. ते समयीं अबदुल अली यानें हुशारी करून सुतरनाले व बाणांचे उंट बसवून तोफाचा व सुतरनाले याचा व बाणांचा एकदाच मार केला. तों पुढें होणार भवितव्य. भोइटे व बुंदेले याचे दृष्टीस काय पडलें हें न कळे! एवढे पराक्रमी होते, परंतु त्यांच्या पोटांत हरणाची काळजी शिरून, निशाणें माघारीं फिरवून तडक पळों लागले. त्यांच्या मागें फौजही भरधांव पळों लागली. बापास पुत्र व पुत्रास बाप उभे राहिनात, तेथें दुसरे कोण उभे राहतील? असा पळ सुटला. तेव्हां गिलचे यांनीं उठावणी करून पाठलाग करून जैसा कुणबी विळ्यानें जोंधळ्याचीं कणसें कापितो तद्वत शिरच्छेद करूं लागले. गिलचे केवळ बेहोष, एका शरिराच्या तीन अवस्था करून क्षणांत अडीच हजार खासे याचीं शिरें कापिलीं! दुराणी व हे सरमिसळ पळत येतात, तों दत्ताजी

शिंदे फौजसुद्धां येऊन पोंचले. एवढे शिंदे अंगें मर्द व हमेषा लढती फौज, ज्या फौजेनें मारवाडी राठोड हटविले, आणि एकदील ऐशी असतां, पुढील सोहाळा पाहून केवळ दिपतात तैसे दिपोन उभे राहिले. तोंडें काळीं खापरासारखीं दिसों लागलीं. लोकांची वीरश्री उतरली. अंगें दत्ताजी शिंदे उभे राहिले. परंतु त्यांची कुमक करविली नाहीं. गिलचे यानीं आपले स्वइच्छेनें शिरें कापिलीं. आणि दुराणीकडे गेले. त्यांनीं तमाम शिरांचीं नाकें कापून डेरिया पुढें कलवडाप्रमाणें चौत्रा घातला. अडीच हजार डोकीं, कांहीं थोडीं नव्हेत!

ते समयीं भागीरथीबाई यांनीं नारो शंकर यांस सांगून पाठविलें कीं, "आजपर्यंत आमचा काळ होता; जें केवळ असाध्य तें तें साध्य होत होतें. आतां जी गोष्ट योजावी ती विपर्यास होते. प्रस्तुत सर्व हिंदुस्थान एक जालें. दीड लक्ष फौजेची गणती, दुराणी व अवघे मिळून जाले आहेत. तुम्हांपाशीं पन्नास हजार फौजेची गणती नाहीं. पाटील तों दुराग्रहास प्रवर्तलें. आपण मरावें आणि जग बुडवावें, असा विचार घडला आहे. तुम्हीं मरावें आणि आम्हीं तुरकबंदीस पडावें असेंच आमचें प्रालब्धीं ईश्वरें नेमिलें होतें म्हणून ईश्वरें आम्हांस जन्मादारभ्य या रानांत आणिलें. तुम्हीं पाटील यांस विवेक करून सांगावें." म्हणून सांगितलें......मग नारो शंकर, जानराव वांबळे व गोविंदपंत बुंदेले व जनकोजी शिंदे एकत्र होऊन दत्ताजी शिंदे यांजकडे आले, आणि साफ जाबसाल केला कीं, "तुम्ही मरावयास सिद्ध जालां. परंतु मुलें लेकरांनीं काय पाप केलें आहे? याजकरितां आपण सडे या स्थळीं राहून बुणगे व काबिले चमेलीपार लावून द्यावें. मग तुमचें दैवीं असेल तें घडेल." म्हणोन ऐकतांच दत्ताजी शिंदे यांस विषाद येऊन बोलते जालें, कीं "नाना! तुम्ही काय समजून हा अर्थ बोलिलां? आम्हांसही पुरतेंपणीं समजलें कीं, आमचें आयुष्याचा अंत जाला. मग मुलें माणसें जगून काय करावीं? कोणीं आप तरावें आणि जग तारावें, कोणीं आप बुडावें व जग बुडवावें. मुलें माणसांची शाका करून, हत्तीस अंदू घालून मारतां मारतां मरावें. मरणाहून अपेश वोखटें. अपजय घेऊन नानासाहेब व भाऊसाहेबांस तोंड काय दाखवावें? आतां मरावें हाच निश्चय. याविणें दुसरी कल्पनाच नाहीं." असें ऐकून नारो शंकर यांनीं उत्तर केलें कीं, "पाटील, तुम्ही बोलिलां हें पुरवून घ्यालच यांत संदेह नाहीं. तुम्ही बोलिलां तें कराल, परंतु मुलें माणसें

मारवत नाहींत. हिंदुस्थानांत बुंदी व कोटियाचे राजे हाडे रजपूत यांनींच हीं कर्मे करावींत. मराठियांस मायाजाळ सुटत नाहीं. या गोष्टी घडणार नाहींत. आम्ही आपलीं मुलें माणसें वाटेस लावितों." म्हणोन बोलून डेरियास आले. दत्ताजी शिंदे उठोन बाडांत स्त्री भागीरथीबाई यांजकडे गेले. त्यांचें चित्तांतील काळजी ध्यानांत आणिली तों त्यांचें चित्तांतही निघतां उत्तम. त्यांत भागीरथीबाई गरोदर, नऊ महिने पूर्ण भरले होते, दत्ताजी शिंदे यांनीं चित्तांत योजना केली कीं, "हिचें पोटीं पुत्र नाहीं. स्त्री गरोदर आहे. वाटेस लावितां उत्तम आहे." म्हणून बाहेर येऊन जनकोजी शिंदे यांस बोलावून सांगितलें कीं, "बुणगे मुलें—माणसें घेऊन तुम्हीं चमेलीपार होणें. आम्ही येथें राहून होईल तसें पाहून घेऊं." असें ऐकतांच जनकोजी शिंदे यांणीं उत्तर केलें कीं, "काकासाहेब, तुम्ही राहातां आणि म्यां जाऊन काय करावें ? मजकडून या गोष्टी घडावयाच्या नाहींत. तुम्हीं मुलें—माणसें पाठविलीं तरी उत्तम आहे, नाहीं तरी आम्ही आग्रह करीत नाहीं." असा दुराग्रह ऐकून दत्ताजी शिंदे डेरियांत येऊन मुलां—माणसांस चार गोष्टी विवेकाच्या सांगितल्या. त्याजवरून त्यासमयीं बायकांचा शोक ! ज्याप्रमाणें मनुष्य मरतें तैशी गत जाली ! भागीरथीबाई यांस असें जालें कीं, पाटील आजच आपणास अंतरले. भगवंतें आजच आमची ताडातोड केली. म्हणून बहुतां प्रकारें शोक केला. अगदीं बुणगे व मुलेंमाणसें समागमें पांच हजार फौज व सुरजमल्ल जाट याजकडील वकील रूपराम कटारी यास समागमें देऊन वाटेस लाविलीं. तेथून फरकाबादे-नजीक बारा कोसांवर जाऊन बुणगे पोंचले......

...तों इकडे जनकोजी शिंदे निशाणाशीं झोंबत होते. त्यांचे उजवे दंडास एकाएकींच गोळी लागून दंड फोडून हाड बाहेर आलें. जनकोजी शिंदे यांस तव येऊन घोड्याखालीं आले. तों जवळ खिजमतगार उभा होता. तो धांवत दत्ताजी शिंदे यांजकडे आला. आणि घाबरेपणें वर्तमान सांगितलें कीं "बाबासाहेब गोळी लागून पडले." असें वर्तमान ऐकतांच दत्ताजी शिंदे यांणीं जवळ लोक उभे होते त्यांस जाबसाल केला कीं, "बाबा आम्हांस सोडून गेले. आतां आम्हांस देशीं तोंड दाखवावयास येणार नाहीं. रणांत मृत्यु आला तर उत्तम आहे, नाहींतर विष भक्षून प्राण द्यावा." असें बोलून दत्ताजी शिंदे यांचेपुढें दहा हजार कुतुबशाहा व दुराणीचे लोक उभे होते, त्याजवर

अठरा आसामीनिशीं घोडे घातले. घोडियांचें तोंड शिरलें तों त्यांमध्यें अकरा खासें ठार पडले. जात्या खाशांनीं घाव केला. तेथून माघारें गोळीच्या माऱ्यांत निघाले. तों यशवंतराव जगदाळे थोराळेकर यांस गोळी लागून ठार पडले. त्यांचा भाऊ पिराजी जगदाळे समागमेंच होता. त्यानें भावाचे मुरदियासाठीं बहुत प्रयत्न केला. काढावा म्हणून बोलिले. म्हणोन पाटील यांनीं लालमणी घोडियाचें तोंड माघारें किंचित फिरविलें. मुर्दा ओढा ओढा म्हणून बोलतात तों एकाएकींच आकाशाची दोरी तुटते, तैशी गोळी येऊन उजवे बगलेस बरगडींत लागली, आणि घोडियाखालीं आले. तों नजीक राजाराम चोपदार व राघोबा शेणवई पागनीस होता. त्यांनीं इत्यर्थ केला कीं, " बहूत दिवस यांचें अन्न भक्षिलें, आणि पाहिजे तितके विलास यांच्या जिवावर केले. आतां यांस टाकून जावें याहून मरण बरें." म्हणोन घोडियावरून उतरले. तों [ दत्ताजी ] घायाळ होते. प्राण कांहीं गेला नव्हता. घायाळ काढावा तरि त्यांजकडील फौजेची निकड बसली. घायाळ काढ वयास फुरसत पडेनाशी जाली. तों नजीबखान रोहिला याचा गुरू कुतुबशहा याच्या अंबाऱ्या नजीक आल्या. राघोबा पागे यांनीं राजाराम चोपदार यांस सांगितलें कीं, " तुम्ही कुतुबशहा याजपावेतों जाऊन पोंचावें. दत्ताजी शिंदे रणात घायाळ म्हणून सांगावें कीं, तुम्हीं यांचा बचाव करावा, नाहीं तर अबदुल अली हरामी याची गांठ पडली तर आमचें व पाटील यांचें शीर कापून नेतील. त्याहून यांजकडे पाडाव सांपडले ते उत्तम." म्हणून राजाराम चोपदार यास सांगून पाठविलें. तों कुतुबशाहाची अंबारी केवळ नजीक आली. त्यास राजाराम चोपदार यानें जाऊन मुजरा केला. रात्रंदिवस येणें जाणें सहजच होतें. ओळख पूर्वींच होती. " राजाराम तूं कहां ? " म्हणोन अविंधी भाषेनें पुसलें. त्यानेंही खरें वर्तमान सांगितलें कीं, " साहेब, पटेल घायाळ पडा है, या बचावे." असें म्हणतांच कुतुबशहास मोठा आनंद जाला. इक्षुदंडांतूनच शर्करा सांपडते. तैसा अनायासें करून महालाभ जाला. बोलिला कीं, " पटेल कहां है ? दिखलाव." म्हणोन तैसेंच अंबारी राजाराम जेथें दत्ताजी शिंदे घायाळ पडले होते तेथें घेऊन आला. कुतुबशहा यानें अंबारींतून खालीं उतरून जवळ आला. तों दत्ताजी शिंदे उताणे पडले होते. तेथें कुतुबशहा यानें जाबसाल केला, कीं " पटेल, हमारे साथ तुम, और लढेंगे ? " म्हणोन पुसलें. दत्ताजी शिंदे सावध

होते. त्यास पुरतें उमजलें कीं हे कांहीं आपणांस वांचवीत नाहींत. मग व्यंग गोष्टी सागणें हें विहित नव्हे, म्हणोन दम बांधोन जाबसाल केला, कीं " निशा अकताला! बचेंगे तो और बी लढेंगे." असें ऐकतांच कुतुबशहा यानें कमरेचा सुरा ओढून, लाथेनें ढकलून पालथा घालून दत्ताजी शिंदे यांचा शिरच्छेद केला......

इतकियांत इकडे तळावर बुणगे व लक्ष्मीनारायण व हत्ती उभे होते. त्यांजवर घेऊन मिठी बसली. ते समयीं हत्तीवरले माहूत अबरूचे होते. त्यांनीं क्षणभर फौजेत रणखुंदल करून मारामारी केली. तों महात गोळ्या लागून खाली येतांच हत्ती मोकळे जाले. ते त्यांजकडे सहजच हस्तगत जाले त्यांत एक बडेखान महात यानें जव्हेरगजं म्हणोन बरा नामी हत्ती जलद व मर्द होता, तो दोन कोस पर्यंत काढिला होता. मराठे हत्ती सोडून चालिले. बडेखान महात यानें बहूत करून बोलिला कीं, " यार हो! तुम्ही दम खात निघावें. या वेळ पर्यंत येथवर हत्ती आणिला. आतां निभावून नेणें." म्हणून बहुता प्रकारें सागितलें. परंतु मराठे मनुष्य पळूं लागलियावर कोणाची वीर कोणास नाहींशी होते. रांडेनें सावळें हुसकटलें तर झाडास बांधिले असतां झाड घेऊन बारा कोस पळतील! तेथें हत्तीची गत काय? खांसा जनकोजी शिंदे एवढा सरदार घायाळ पाणी मागत असता वाटेनें दम धरून कोणी पाणी पाजीनात! तेथें हत्ती कोण जिन्नस! मग बडेखां महात यानें जाबसाल केला कीं, " यार हो! तुम्ही दम खात नाहीं. परंतु क्षणभर दम खाऊन माझा तरी तमाशा पाहा! " म्हणोन माघारा फौजेंतून दुराणीची फौज होती त्यात हत्ती चालवून क्षणभर मारामारी केली शेंपन्नास दुराणी ठार पाडिले. मग त्यांनीं भाले लावून हत्ती व माहूत पाडाव करून चालाविला.

...इकडे शिंदे यांचे बुणगे व कबिले चोवीस कोसांवर उतरले होते. त्यांत जनकोजी शिंदे तीन प्रहर रात्रीं दाखल जाले...जनकोजी शिंदे येईतों पावेतों बायकांस कांहीं दत्ताजी शिंदे यांची अवस्था ठाऊक नव्हती. वाडांत वर्तमान कळतांच भागीरथीबाई व जनकोजी शिंदे यांची स्त्री अशीं उभयतां मराठधर्म विसरून धांवत बाडाबाहेर आलीं. तों जनकोजी शिंदे घायाळ खाटलियावर पाहिले. तोंड उघडून पाहिलें. तों जनकोजी शिंदे यांणीं डोळियांस पाणीं आणून चुलतीस विचारिलें कीं " बाई, काका कोठें आहेत?" ते समयीं

भागीरथीबाईस पुरतें उमजलें कीं पाटील निश्चयें रणांत पडले. बाईस मोठा उमड आला. मागती विवेक केला कीं ' जात्यांतील रडती आणि सुपांतील हांसती. ' त्यांची गत तों या रीतीची जाली. आणि हा तो घायाळ, यांचेंही जगावयाचें कठीण. दुराणीचा मागें पेंच भारी. आतां मी शोक करितें तर याची गत काय ? " याविषयीं दोहरा आहे.

॥ मेरे मनमें कछु और । कर्ता के कछु और ॥
॥ उधो माधो कहे । झूटी मनकी दौर ॥

म्हणून उमडा आला तो विपासारिखा घोंटून जनकोजी शिंदे यास जाबसाल केला कीं, " बाबा, तूं रांडेसारखा रडतोस काय ! जयाजी शिंदे यांचे पोटीं चौघी लेकी जाहाल्या, तैशीच तूं एक आणखी जाली असतीस तरि आणिक एक जांवई येता. पाटील काय घेऊन गेले ? दुनिया, दौलत, महाल, मुलूक, खजिना, हत्ती, घोडे सर्व तुम्हांपाशीं ठेऊन गेले. तुम्हीं हिंमत धरून त्याचें सार्थक करावें. आतां रडून होणें काय ? " म्हणोन हिंमत देऊन बोलतांच जनकोजी शिंदे उगेच स्तब्ध राहिले. रामाजीपंत दिवाण व रूपराम कटारी यांस बाईनीं आज्ञा केली कीं, " रात्रीचे रात्र लष्करचा मुक्काम करणें. प्रातःकालीं कूच करून जावें. " असें ऐकून नगारचीस सांगून शाहाजणें केलीं. परंतु लष्कराचा धर सुटला. खावंदाची देखील आस्था धरीनात. धरण फुटल्यासारखें जालें. मग यांनींहि येथून कूच करावें म्हणून इत्यर्थ केला. जनकोजी शिंदे यांस बाईचे पालखींत घातलें. बायकांस घोडीं बसावयास पाहाण्यास गेले. तों त्या धुंदींत ज्याचे हातास जें घोडें आलें तें त्या बारगिरानें नेलें. मग भलतीशीं बळगीं दोन घोडीं होतीं त्यांजवर बायका स्वार केल्या. तों भागिरथीबाई गरोदर, नऊ महिने पूर्ण भरले होते घोडियावर बसावयाचें संकटच. परंतु संकटास उपाय नाहीं. एवढा तालेवार मेला, परंतु रडावयास फावलें नाहीं ! घायाळ जनकोजी शिंदे यांच्या जखमा बांधावयास दुराणीचे दहशतीमुळें फावलें नाहीं! असो या रितीनें कूच केलें.

तों तेच दिवशीं मल्हारराव होळकर, यांचीं निकडीचीं पत्रें गेलीं होतीं म्हणोन, मल्हारराव होळकर यांनीं जयनगरचा शह टाकून मजल दरमजल मोठया मजली करून मिळावयास येत होते. तों इकडे यांची अवस्था ऐशी

जाली हें मल्हारराव यांस विदित नवतें. तेही मुकामास कोटपुतळीपासून दोन कोसावर आले. बुणगियाचा पुढें मुकाम जाला. मागून मल्हारराव सडी स्वारी अस्तमानास मजलीस शाहाजणें वाजवीत आले. तों शिंदे यांचें लष्कराचे पळाचे राऊत जाऊन तेथें पोंचले. मल्हारराव यांनीं जवळ बोलावून वर्तमान विचारिलें. स्वारांनीं वर्तमान सांगितलें कीं, " दत्ताजी शिंदे यांचा शिरच्छेद जाहला. जनकोजी शिंदे जखमी व बायका व लुटलेलें लष्कर असे येथून तीन कोसांवर कोटपुतळीस मुकाम करून राहिले आहेत." हें वर्तमान मल्हारराव यांनीं ऐकतां क्षणींच अंबारींतच घालून घेतलें व गंगाधर तात्या शाहाजणें वाजवीत होते तें मना केलें. असे डेरियांत जाऊन शोक करिते जाले. तें समयीं त्यांची स्त्री गौतमाबाई होती, तिनें निषेध केला कीं, " सुभेदार, तुमचें वृद्धपण जाहलें. शिंदे यांचीं मुलें म्हणजे काय? त्याचें तोंडचें जार वाळलें नाहीं! त्यांनीं एवढा पराक्रम करून मारतां मारतां मेले. एरवीं हा मृत्युलोकच आहे. जाला प्राणी वांचत नाहीं. परंतु इहलोकीं कीर्त करून परलोक साधन करणें, हेंच दुर्लभ. हें मूल जनकोजी शिंदे, याणें एवढा पराक्रम केला! तुमचे दिवस समीप आले तरि हिंमत धरून मारतां मारतां मरावें. हा प्रलाप स्त्रीजातीनें करावा. असें पुरुषास बोलिलें नाहीं. प्रस्तुत्त जवळ जखमी व मुलें बाळें आले आहेत. तर ऐसेच जाऊन भेटून त्यांचें समाधान करावें. म्हणोन बोलतांच वृद्धास विषाद येऊन गौतमाबाईस बोलिले कीं, " तुझे चित्तांत आम्हीं मरावें असें आहे." यावर गौतमाबाईनीं उत्तर केलें कीं, " सुवासिणीं असतां वैधव्याची आस्था धरील अशी कोण चांडाळीण असेल? अहेवपणें हळद-कुंकु-मंडित मरावें, हीच इच्छा सर्व स्त्रियांची. परंतु जैसें पूर्व आचरण असेल तैसें घडेल. आपले पदरीं लौकिक भारी. तुम्ही आपलें घोंगडी विणावयाचें स्वकर्म करीत असतां तरि सहजच वाचावयाची आस्था धरावी. वांटा तरि शूराचा उचलिला आहे. वाण सतीचें घेतलें. जैसें सांभाळावें, तैसेंचि धर्मशास्त्र आहे." बाईचें वचन ऐकून, तैसेच रागास येऊन, घोडियावर स्वार जाहाले. हत्ती व फौज सिद्ध होऊन जनकोजी शिंदे यांजकडे चालिले. जैशी दैवाची उजरी तैशी बुद्धि उपजे शरीरीं. बरोबरीला तमाम फौजेची छबी पळाली. तोंडें काळीं खापरासारखीं दिसों लागलीं. एकमेकांस बोलूं

लागले कीं, "शिंदे यांची फौज एवढी लढती तिची ही गत. आमची खानदेशी फौज. बहुतकरून तिची गत काय होईल न कळे !"

असो. याप्रकारें शिंद्यांच्या लष्करास मल्हारराव आले.

—( भाऊसाहेबांची बखर, कलम ६८ ते ८५ )

★ क्र. २७

## या हट्टानें सर्व लयास गेलें !

तेव्हां मल्हारजी होळकर व जनकोजी शिंदे व दमाजी गायकवाड व यशवंतराव पवार व अंताजी माणकेश्वर व संताजी अटोळे वगैरे लहानथोर मिळून सदाशिवपंतांपाशीं विचार करावयास आले. तों सदाशिवपंत भाऊ व विश्वासराव साहेब बिचव्यांत बसले होते. तेथून कचेरीच्या डेऱ्यात येऊन खलबतास बसले. तेव्हां सर्वांनीं सांगितलें कीं, " आज सव्वा महिन्यांत तवाई सर्वांनीं सोसली. पुढें महाराज काय तजवीज सांगणें ती सांगावी ! अन्नावाचून हातपाय सुजले. तरवार कोणत्या रीतीनें करावी ? साहेबीं आजपर्यंत यश संपादून शत्रू पादाक्रांत केला. आतां सर्व दौलत बुडवून नाश आरंभिला. दुसरें कांहीं एक नाहीं. विनाशकाळासारखी तुमची बुद्धि जाहाली. आपणांबरोबर आम्हां सर्वांचीं घरें बुडतात. आमचीं रांडापोरें आमच्या डोळ्यांदेखत इराणी घेऊन जातो, असा समय प्राप्त जहाला. तुमचे बुद्धीस भ्रंश जाहला. म्हणून आपण तिळमात्र कोणाचें ऐकत नाहीं. उगीच हेका केला तो या समयीं फळास आला. या हट्टानें सर्व लयास गेलें. कांहीं आहे तेंही जाणार. नकळे ईश्वराचा महिमा ! होणार सारखी बुद्धी होते. विचार हरल्यामुळें नैषधास व श्रीरामचंद्रजीस अपाय घडला, तसा प्रकार आपणांसही घडोन आला. तुम्हांस श्रीसांबानें अजरामर ऐश्वर्य दिलें असतां, भाऊसाहेब ! तुम्हीं बुडविलें. आज तो प्रसंग प्राप्त जाहाला. सुबुद्धी सांगतां तुम्हांस श्रम वाटतात. पुढें कर्माची गति दुस्तर ओढवणार त्यासारखें घडोन येतें. 'होणार तें कधीं चुकत नाहीं' ऐसी वडिली म्हण आहे."......त्याजवर मल्हारराव होळकर यांणीं दृष्टांत दिला जे, " द्वापारयुगीं राजा दुर्योधन शतबंधूंसहित राज्य करीत असतां दौपदीमुळें

सर्व राज्य लयास गेलें. ते काळीं व्यासांनीं व विदुरांनीं व श्रीकृष्ण परमात्मा यांणीं बहुत प्रकारें सांगितलें. परंतु राजाचें म्हणणें कीं, ' सुईच्या अग्रीं मृत्तिका देणार नाहीं.' या हट्टामुळें मार्गशीर्ष वद्य ३० आमावास्या सायंकाळीं राजा दुर्योधन गदायुद्धांत पडून राज्य हारविलें. तसेंच भाऊसाहेब ! आपणास घडोन येतें असें दिसतें. आतां अंत राहिला नाहीं. तुमच्या लष्करची खराबी इराणीस कळली. आतां सर्वस्वीं बुडवितो. काळचक्रांत सर्व पडलों. उत्तम गोष्ट बनून न आली. पहिल्यानेंच सलूख संपादिला नाहीं. आतां इराणी तुम्हांस खातरेंत आणीत नाहीं. हेका केल्यामुळें दौलत सारी बुडाली. या समयीं, या ठायीं श्रीमंत राजश्री नानासाहेब असते तरी कसच्या गोष्टीचा हेका न करिते. तुम्हीं प्राणांनिशीं जातां. तुमचें चित्तांत असें येत असेल, इराणीचा मजकूर किती ? मारून धुडकावून देऊं ! ही गोष्ट सांगतां खरी, परंतु तो प्रसंग आतां नाहीं. हा जीव तुमचे अन्नाचा या प्रसंगीं खर्च जाहाला असतां चांगला, परंतु अगोदर अन्नावांचून डोळ्यापुढें अंधाऱ्या येतात. तेव्हा युद्धाची उमेद कशी धरावी ? आतां जीवित्वाची तमा धरून रांडापोरें वाचतात असा अर्थ नाहीं. तुम्हीं सर्वांचा घात केला. आपल्या हातचें सर्व वैभव बुडविलें. आमच्या डोळ्यांदेखत आमचीं रांडापोरें गिलचा बाटवितो तें दुःख प्रत्यक्ष दृष्टीनें पाहावें आपण आपला कुटुंबघात आपल्या देखत करून उद्यांच्या लढाईत आम्हीं सर्व प्राणानिशीं गेल्यानें आपली स्वारी फत्ते होते कीं काय ? ''

अशा प्रकारचीं सर्व समुदायाचीं उत्तरें जिकिरीचीं रायांनीं ऐकून घेऊन प्रतिउत्तर दिलें कीं, " होणारास उपाय काय ? कोणी आपलें अनिष्ट चिंतीत नाहीं. दैवगतीनें घडून आल्यास उपाय कोणाचा ? यश किंवा अपयश महाराज छत्रपतींकडे ! आतां शरीर तृणप्राय मानून, मर्दुमीचा हिय्या न सोडितां, समशेरीची शर्थ करून दाखवावी. कौरव-पांडव सकल सेनेसहित कुरुक्षेत्रीं धारातीर्थीं सुस्नात जाहाले, तदनुरूप आपणही व्हावें. या परता पराक्रम कोणता ? सर्व सत्ता श्रीकैलासनाथाची ! त्याप्रमाणें घडून येतें. दूषणें लावितां तीं प्रमाणच. गेल्या गोष्टी पुढें येतात असें नाहीं. प्रस्तुतची विचारणा चित्तांत आणून यश छत्रपतीचें सांभाळावें. हें यश तुम्हां समस्तांचें आहे ! निदान-समयसागर-तारक पिनाकपाणी आहे, मग इराणीची तमा ती काय ? आतां भय धरल्यानें काय होतें ? श्रीशांबकृपेनें इराणीस मारून गर्दीस मेळवून देऊं.

सत्कीर्ती करून मरावें या भूषणापरतें दुसरें काय आहे ? उद्यां सर्वांनीं खंदकपार होऊन मारतां मारतां कटून मरावें. या भूषणापरतें दुसरें काय आहे ?" हा निश्चय सदाशिवपंतांनीं करून लहानथोर सरदारांची क्रिया घेऊन, सर्वत्रांस विडे देऊन बोळविलें.

—( रघुनाथ यादवकृत "पाणिपतची बखर" पृ. ४० ते ४३ )

★ क्र. २८

# चोहींकडोन आभाळ फाटलें

इकडे झाडून मोंगल तयार होऊन तोही युद्धास उभा राहिला. ते समयीं अबदुल अलीकडील वकील भाऊंकडे आले. "आजचे दिवस झुंजास तहकुबी करावी, सलयाचें बोलून ठीक करितों. उतावळी न करणें." म्हणोन बोलले. भाऊसाहेबीं त्यांस धिःकार करून माघारें लाविलें. परस्परें गोळागोळीस तोंड लागलें. त्यांजकडील तीनशें तोफा, व गनिमाकडील दोनशें तोफा, एकदाच सरबत्ती जाली. शिवाय धाकटीं यंत्रें, हस्तनाला व सुतरनाला व जेजाला व बंदुका व रेकले यांस गणित नाहीं. मोठीशीं गर्दी होऊन गेली. धुराचे गर्दीनें सूर्यबिंब आच्छादिलें. कोणाची खबर कोणास नाहींशी जाली. त्यांत शूर होते त्यांस वीरश्रिया आल्या. भ्याड होते त्यांस ऐसें जालें कीं, 'धरणी माय, दे ठाय' तैसें जालें. धडाकियाखालीं घोडे मनुष्यें धुंद जालीं. रणतुरें व रणभेरी व आराबियाचीं वाद्यें यांचा एकदांच कल्होळ जाला. उभय दळें मिळतीं जालीं. तों हुजरातीची फौज, बहूत दिवसांचे खानदान लोक होते, त्यांणीं कृतसंकल्प केला कीं, "बहूत दिवस यांचें अन्न भाक्षिलें आहे. त्याची उत्तीर्णता आज आहे." म्हणोन त्यांजवरि हुजरातीनें कडनिकड करून घोडे घातले. झुंजास तोंड लावून घाव केला, क्षणभर हुतुतूसारखे त्यांस मोडूनहि घालविलें. एकवेळ यांसही मोडून ते माघारें घालवीत अशा पांच सात हिराहिऱ्या जाल्या. तों विठ्ठल शिवदेव व यशवंतराव पवार कांहींसें पुढें वाढून गेले. त्यांजवर झुंज पडलें. तेव्हां हे कच खाऊन माघारें तोफखान्यांत येऊन उभे राहिले. दमाजी गायकवाड यांजवर गिलच्यांनीं येऊन नेट बसविला. तेही माघारें येऊन उभे राहिले.

मुकामीं गोटाचा गोट येऊन उभा राहिला होता, त्याप्रमाणें पथकें उभीं होतीं. त्यांजवर खांसा अबदुलअल्ली त्या झुंजावरि डावे बाजूस होता, त्यानें झुंज भारी केलें. कुल भाऊसाहेब यांजकडील पथकें माघारी फिरविलीं. हलके बहुत जाले. इब्राहिमखान गाडदी याजवर खांसा दुराणी व रोहिला यांणीं चालून घेतलें. यांची एक रंजक उडाली. दुराणींकडील लोक बहूत पडले. परंतु जाग्यावरून हालले नाहींत. तैसेच नेट धरून मारीत आले. आणि इभ्राहिमखान गाडदी यांजवरि चालोन आले. इभ्राहिमखान गाडदी याजवरिच पडले. कुमक कोणींच केली नाहीं. तथापि संभाळून येऊन हुजरातीचें लोक व आपण एक होऊन संघान साधिलें. तोफाही सुटत होत्या. लढाई मना जाली नव्हती. मातबर एक प्रहरपर्यंत लढाई केली.

इकडे उजवे बाजूस शिंदे–होळकर होते. यांजवरि सुजाउद्दोला वगैरे यांणीं येऊन झुंज दिलें. झुंज मातबर होऊं लागलें. मध्यें भाऊसाहेब व विश्वासरावसाहेब अंबारींत होते. ते उतरून घोडियावर स्वार जाले. भाऊसाहेब बार घोडीवर व रावसाहेब पीलबाला घोडा याजवरि स्वार जाले. चहूंकडून संभाळून होते. झुंजाचें तोंड भारी लागलें. मारामारी होतच आहे. मातबरच खासे हुजुरातींतील पडों लागले. ते समयीं विश्वासराव हुजरातीच्या लोकांत येऊन त्यांनीं घोडे घातले आणि घाव केला. तों ईश्वरी क्षोभ जाला. एकाएकींच छातीमध्यें गोळी लागून विश्वासराव ठार जाले. नानासाहेबांचें निधान हरपलें. लोकांनीं कडनिकड करून मुर्दा अंबारींत घातला आणि वरती शालजोडी घातली. हें वर्तमान भाऊसाहेबानीं पाहून अवसान सोडिलें. बहुतसा विलाप करूं लागले. मग त्या त्वेषानें भाऊसाहेबांनीं निश्चय केला कीं, या उपरि गिलचा खाशानिशीं मारीन, म्हणोन लोकास ताकीद केली. आणि झुंज केलें. हाणा ! हाणा ! असें मुखें बोलोन बरोबर समशेर बहादर घेऊन पुढें जाले, आणि तीन वेळ हत्यार केलें. त्या इरेनें लोकांनीं हिंमत धरून भाऊसाहेबांबरोबर पुढें सरसावून शिपायागिरी बहूत केली. दुराणी व रोहिला माघारा फिरविला. अबदुलअली पळोन नदीतीरास गेला. शर्थ जाली.

इकडे भाऊसाहेबांकडे युद्ध होतच होतें. भाऊसाहेब यांची स्त्री पार्वतीबाई तेथें अंबारींत होती. अंबारीस अंबारी तटली होती. युद्धाचे धुंदींत घाबरी होऊन अवघें लक्ष पुढेंच होतें. तो एकाएकीच मुर्दा अंबारींत पाहिला आणि

बाईनें महातास पुसिलें, कीं " मुर्दा कोणाचा आहे ? " त्याणें उत्तर केलें, कीं " विश्वासरावसाहेब ठार जाले. " खवासखान्यांत खिजमतगार होता, त्यास सांगोन तोंड उघडून पाहिलें. तों रावसाहेब मृत्यु पावले हें देखिलें. पार्वतीबाईनीं पाहून ऊर कपाळ बडविलें. शंखध्वनी केली आणि बोलती जाहली, कीं " ईश्वरा ! आम्हांस एवढें निर्वाण कां दाखविलें ? रावसाहेबांसारखें रत्न हरपोन गेलें " म्हणोन बहुतच शोक करिती जाली. तों जवळ नाना फडणीस यांची मातुश्री होती. तिनें शांत केली, कीं " बाई, रडें ईश्वरें ओढूनच आणिलें आहे. एवढ्यावरच मुक्त जालां असा अर्थ नाहीं. अजूनहि सर्वत्र महाअनर्थपात आहे. यांत ईश्वर पार पाडील तर बरें, नाहीं तर रडें लागलेंच आहे. तों पावे तों दम खावा. " म्हणोन शांत केली...

इकडे भाऊसाहेबांकडे लढाई होतच होती. होतां होतां मारामारी खणाखणी जाहाली. ये समयीं विश्वासरावसाहेब यांचें वर्तमान ऐकून जनकोजी शिंदे व तुकोजी शिंदे यांणीं मारामारी करीत भाऊसाहेबांपाशीं आले. तों इब्राहिमखान गाडदी याजवरि [ रोहिले ] येऊन पडले त्याणें जिवाचा निधडा करून तटून उभा राहिला. शिपायगिरी म्हणावी तैशी केली. कितेक गाडदी खेतास आले. परंतु कुमक कोणाची जाली नाहीं. मग एके क्षणांत पांच हजार गाडदी ठार जाले. होते कीं नव्हते असे केले. हुजरातीचे लोक जवळ होते ते पळों लागले. गाडदी ठार झाल्यामुळें तोफखाना बंद जाला. जातीनिशीं शिकस्त त्याणें पुरती केली. जाऊन गिलच्याच्या लष्करांत मिसळला आणि दाहा पांच नामांकित सरदार दुराणीचे मारून ठार केले. इतरांची गणतीच नाहीं. भोंवताला वेढा गिलचे यांचा पडला. इभ्रामखान यांचे आंगावरि जखमा भारी चढल्या. दुराणी पळोन गेले होते ते माघारे आले. गाडदी यांचे मुर्द्यांचे ढीग पडले. इभ्रामखान गाडदी याचा पुत्र व भाचा होता तो ठार जाला. खांसा इभ्रामखान गाडदीही रणांत घायाळ जाला. असें असतां लढतच होता. यत्न चालेना तेव्हां हत्यार राहिलें. मग दुराणी यांनीं धरून नेला.

हें वर्तमान भाऊसाहेबांस कळलें. चोहोंकडून प्रळय एकदांच जाला. मोठी धुंदी जाली. यशवंतराव पवारही ठार जाले. कोणास कोणी पुसेनासें जालें. जाग्यावरच इभ्रामखान गाडदी होता कीं नव्हता असें जाहालें. इकडे मल्हारराव

होळकर यांचे बाजूनें झुंज मातबर जालें. रेटत नाहींसें जालें, तेव्हां तेही बाजू सोडून निघाले. मग केवळ तोंड हुजरातीवर बसविलें. ते समयीं हुजरातीनें जितकी शर्थ करावी तितकी गेली. जेथून मराठियांचें राज्य जालें तें दिवसापासून झुंजें होत आलीं; परंतु याप्रमाणें मराठे कधीं झुंजले नव्हते. भाऊसाहेब यांणीं नांवनिशिवार असाम्या हटकून घालविल्या. आणि आपणही खांसा अगोदरच घोडियावर स्वार जाले होते. विश्वासराव ठार जाले, त्यापेक्षां आतां नानासाहेबास तोंड काय दाखवावें ? म्हणोन शोकांतच होते. तों अवघा मार भाऊसाहेबावर येऊन पडला. तरवारींचीं खणाखणी जाली. डुकर खळीस येतो तैसा प्रकार जाला. भाऊसाहेब लोकांत गर्द जाल्यावर घोडीं मनुष्यांनीं खंदक भरला. माणसें दिशाभूल जालीं कोणीकडे पळावयाचें हें सुचेनासें जालें. तों तिसरा प्रहर जाला.

उपरांतिक चार घटकांपर्यंत भाऊसाहेबांनीं हुजरातीनिशीं मारामार केली. परंतु डावे बाजूनें हातच सोडिले. आभाळ फाटलें तेथें ठिगळ कोठवर लावावें ? मग भाऊसाहेब घोडियावरून पायउतारा जाले. भाऊसाहेब यांचे तोंडास हाणा ! हाणा ! हेंच करीत असतां खरस आली. जातीनिशीं मोठा हिया करून बहुत झुंजले तें कोठवर लिहावें ? सरकारचे मुत्सद्दी मातबर तमाम एकीकडे कुल पळून गेले. ते समयीं सोनजी भापकर यांस भाऊसाहेब बोलिलें कीं, " सोनजीबाबा, या समयीं निघावयाचें नव्हतें. तुमचा भरंवसा बहूत धरिला होता." तेव्हां [सोनजी] बोलिले कीं, " लोक पळतात त्यांस माघारे फिरवितों. साहेबांस टाकून आम्हीं कोठें जावें ?" असें बोलून लोक फिरवावयास म्हणोन गेले ते तिकडेच गेले ! तेव्हां तुकोजी शिंदे म्हणों लागले कीं, " महाराज, क्षत्रधर्माची शर्थ जाली चोहींकडून आभाळ फाटलें. या उपरि निघावें यांत उत्तम आहे." तेव्हां भाऊसाहेबांनीं उत्तर केलें कीं, " तुकोजीबाबा, आतां कोणीकडे जावें ? काय तोंड नानासाहेब यांस दाखवावें ? रावसाहेबांची गत काय जाली ती पाहावी. आणि इब्रामखान गाडदी यास इनाम दिलें तें काय ?" असें ऐकून मागती तुकोजी शिंदे यांणीं उत्तर केलें कीं " भाऊसाहेब, तुम्हीं वांचलां तरि अवघ्यांचा सूड घ्याल. नाहीं तर तुमचे मागें अवघ्याच गोष्टी आटोपल्या." असें ऐकून मागती भाऊसाहेब बोलिले कीं, " पुणियांत नानासाहेबांस तोंड काय म्हणोन दाखवावें ? निघावें, अशी गोष्ट घडणार नाहीं. रणाचे ठायीं

ईश्वरसत्तेकरून जें घडणार असेल तें घडेल. परंतु कदापि नामोहरम व्हावयाचें नाहीं " असें म्हणतांच तुकोजी शिंदे यांनीं घोडियावरून उडी टाकिली आणि जातीनिशीं हत्यार केलें. तेथें मोठी मातबर मरदोमी करून, मराठी धर्माची शर्थ करून खस्त केली. तेव्हां अकस्मात गोळी लागोन ठार जाले. जरीपटकियाचें निशाणावर आधींच दाटी जाली होती तेव्हां हत्तीवरून उतरून घोडियावर घेतलें. निशाण गुंडाळून झाडून पळों लागले. तेव्हा भाऊसाहेबांनीं शाहाजणें वाजविण्यास आज्ञा दिली. फत्ते जाली, शाहाजणें वाजतात, याजमुळें तरी लोक माघारे फिरतील, या अर्थें शाहाजणें वाजतात असे करूं लागले. परंतु ज्यांनीं पळ काढिला त्यापैकीं कोणी माघारे फिरले नाहींत भाऊसाहेब यांचें तोंडास खरस आली हाणा ! मारा ! म्हणावयाचें राहिलें तोंडापुढें कोणी ओळख्या आला तरि तोंडानें मात्र हुंकार देऊन मानेचे संज्ञेने दाखवूं लागले. अंगावरि ब्रह्मांड येऊन कोसळलें. परंतु हिंमत हरली नाहीं. भाऊसाहेब यांजप्रमाणें पराक्रमी दुसरा होणें हे असाध्य गोष्ट. जाग्यावरि हजार बाराशें मात्र उभे राहिले. चोहोंकडे एकदांच आभाळ पाढरें जालें. जिकडील तिकडे पळोन गेले. भाऊसाहेब याजपाशीं जनकोजी शिंदे व रावसाहेब याचे मुद्यांचे हत्तीपाशीं शें पन्नास लोक उभे होते, तेवढे मात्र बाकी राहिले. सभोंवतीं वेढा पुरा पडला. युद्ध बहूत केलें. पूर्वीं युद्धांत अतिरथी, महारथी झुंजले, त्याप्रमाणें भाऊसाहेबीं विरथीपणें शर्थ केली. पुढें कांहीं इलाज चालेनासा जाला. दुराणी व नजीबखान रोहिला असे चाळीस हजार फौजेंतून दहाबारा हजार फौजेनिशीं भाऊसाहेब यांजवर येऊन वर्षले. ते समयीं मारामार अशीं जाली, कीं 'न भूतो न भविष्यति.' एकदाच भोंवताले वेष्टून उभे राहिले. आंत रंवदळारंवदळ क्षणभर बहूतच केली. त्यात भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गत कैशी जाली हें न कळे. उभयतां खासे कोणीं दृष्टीनें पाहिले नाहींत. गयफ जाले, किंवा अस्मानांत गेले, कीं पृथ्वींत गेले, हें ईश्वरी कौतुक ब्रह्मादिकांस न कळे. तेथें मानवियांस काय कळेल ?

प्रातःकाळच्या प्रहर दिवसानंतर झुंजास तोंड लागलें होतें तें तीन प्रहर 'हाणा हाणा ! मारा मारा !' हेंच जाहालें. पृथ्वीनें बहुत अशुद्ध प्राशन केलें. हिंदूंमध्यें मागें याप्रमाणें युद्ध होऊन कत्तल जाहाली नाहीं, यापुढेंहि होणार नाहीं. तथापि भगवंताची करणी, कुल पृथ्वींतील लोक नेऊन त्य

स्थानीं मारावें, हें कौतुक निर्माण जालें. मराठे लोक फौजासुद्धां हटोन कधीं मेले नव्हते. आपले भोंवतीं खंदक खणोन कोणीं राहील कीं काय ? उत्तम प्रकारें गांठ पडली तरी झुंज द्यावें, लढण्याचा दम न निघे तर पळून जावें, हा मराठी धर्म पुरातन चालत आहे. तेणेंकरून पृथ्वीस पालाण घातलें होतें. तें सोडून अविंध धर्माचा अविलंब केला. तो मराठे यांचा धर्म नव्हे. म्हणोन असें वानरतेल निघालें, आणि दक्षण प्रांतींचे पुरुष व बायका यांचें हनन जालें. ईश्वरी सत्ता प्रमाण. त्याप्रमाणें जाहालें. नानासाहेब व भाऊसाहेब ईश्वरी अंश. अवतार धरून कलियुगीं यांणीं चरित्र केलें.

—( भाऊसाहेबांची बखर, कलम १२७ ते १३८ )

★ क्र. २९

## नाना फडणविसाचें आत्मचरित्र.

मी लहानपणीं अज्ञानेंकरून आवृत. परंतु पूर्वसंस्कारें करून देवाची पूजा करावी हा छंद फार. याजकरितां मातोश्रींनीं मारही दिला. परंतु संस्कार दृढ. विद्याभ्यासाकरितां मातापितर जे यांची शिक्षा, तेणेंकरून लहानपणीं अज्ञानाकरितां चित्तास फार वाईट वाटून त्यांचेंही अनिष्ट चिंतीत असें.

दहावे वर्षीं विवाह झाला. विघ्नें पडलीं असतां निर्विघ्न केलें. मध्यें घोड्यावरून पडलों. अति अवस्था कठिण, दोन दिवस शरीरभान नाहीं. याप्रमाणें जालें असतां गोविंद जो त्याचे कृपेनें बरें केलें. पुढें पंधरावे वर्षीं पित्याचा काळ झाला. त्यांचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें. पुढें परंपरा सेवाधर्म चालावा या योगें व श्रीमंतांची कृपा पुत्रवत् असें जाणून कर्नाटक प्रांतीं श्रीरंगपट्टणपर्यंत गेलों. मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊंबरोबर हिंदुस्थानांत जाऊन स्वर्गंगा त्रिपथगा भागीरथीचें स्थान त्रिस्थली यात्रा करावी, अंतःकरण शुद्ध होईल, या भावनेकरून गेलों. त्या कालीं चित्तास अति वैराग्य. याचें कारण शरीरीं किंचित् पीडा. परंतु चित्तास नाहीं. मातेच्या ठायीं भक्ति होत्साता चाललों. ते नर्मदा महागंगेमध्यें स्नान करून एकावृत्तीनें ध्यान केलें त्या

दिवसापासून उत्तरोत्तर वैराग्य, अंतःकरणशुद्धीच होत चालली. भाऊंची ममता विशेष व आंवेची व्यथा बहुत जाहाली. उठावयास शक्ति नाहीं, रेचन बहुत, ग्लानी फार, तेव्हां कूच जहालें असतां मुक्काम श्रीमंतांनीं करवावा. त्या कालीं ईश्वरें आरोग्य केलें. पुढें दर मजल चरमण्वती तीरीं गेलों. तेथें ग्रहण पडलें. स्नानदानादिकें करून आत्मा पवित्र होत्साता ध्यानेंकरून कालक्षेप चालत असे. पुढें सूर्यतनया यमुना इचें तीरीं गौघाटाजवळ गेलों. तेथें स्नान-संध्या करून दोहों दिवसांनंतर मुक्तिपुरीं श्रीमथुराक्षेत्रीं गेलों. तेथें क्षौर प्रायश्चित्त श्राद्धादिक करून तदनंतर पुढें भगवान पूर्णब्रह्म राधाकृष्ण याणें सकल लीला केल्या असें जें वृंदावन, त्या स्थळास गेलों. तेथें कालिया डोहीं कदंबवृक्ष ज्याजवर भगवान् बसून वस्त्रहरण करिता जहाला, त्याच्या शाखा अद्यापि यमुनेंत गेल्या आहेत, त्याखालीं जाऊन स्नानतर्पण करून तदनंतर गोपीचंदनाचे टिळे व तुळसीच्या माळा घालून भगवंताचें ध्यान करीत होत्साता वृंदावनांत अटलबिहारी व कुंजबिहारी व बालबिहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवंताच्या मूर्ती यांचीं दर्शनें घेतली. त्यांत कुंजबिहारी मध्यान्हकालीं चोपाळ्यावर निद्रिस्थ, कपाट लागलेलें, परंतु चोपाळ्याची दोरी बाहेर ओढीत असत. ती आपले हातीं ओढून भगवान् जो यास आंदोलन-लीला केली. तेथोन शृंगारवट जेथें भगवंतें राधेस शृंगार केले, तेथें जाऊन वटदर्शन घेऊन पुढें बंशीवटी, म्हणजे जेथें भगवंतें मुरलीवादन केलें, तेथें जाऊन वटाचें दर्शन केलें. तेथून सेवाबन, कुंजबन हीं स्थळें, कुंज कसें कीं भगवान् लीला करितो असाच भास होत असावा. सर्वही वृक्ष छत्राकार, ठेंगणे, भूमिस्थ पल्लवकंटक वृक्षासही, परंतु कंटक नाहीं. हें पाहून आनंदमय होत्साता यमुनातीरीं रेतींत भगवान् जो याणें बालरूपी लीला केली, पादारविंदसंबंधी रेणु रजःकण त्याची प्राप्ति मस्तकीं वंदावयाकरितां ब्रह्मादिक देव इच्छितात, तेथें जाऊन लोळून ती रेती मस्तकावर घेतली. तेथोन ज्ञानगुदडीस गेलों. तेथें थोर थोर संत, महंत, बैरागी भगवत्पर होत्साते, सायंकाळचे साहा घटिका दिवसास घेऊन बसून पुराणश्रवण करीत आहेत, भगवंताच्या कथा, नामें गाताहेत, त्यांचें दर्शन घेऊन चार घटका पाहून चित्त बहुत शांत जहालें. तदनंतर धीरसमीर जेथां प्रति कालिंदीतीरीं

जाऊन सायंकाल संध्या करून भगवान् सांबसदाशिव जो याचें एकाग्र मनेंकरून ध्यान करून येता जाहलों. याप्रमाणें तीन चार दिवस क्रमिले. अनेक जन्मांचें पुण्य कीं, असें वृंदावन दृष्टीस पडलें, तेणेंकरून भगवंताच्या मूर्ती व भगवद्भक्त त्यांचें दर्शनेंकरून नेत्र पवित्र झाले. पादेंकरून चालत गेलों, तेणेंकरून पायांचें सार्थक जाहालें. हस्तेंकरून नमस्कार करिता जाहालों तेणेंकरून हस्त पवित्र झाले. मुखेंकरून नामस्मरण केलें, तेणेंकरून मुख पवित्र जालें. कर्णें-करून भगवत्कथाश्रवण केलें, तेणेंकरून श्रोत्र पवित्रता पावले. स्नानेंकरून सर्व देह पवित्र झाला. ज्या वृंदावनांत बैरागी एकाग्र वृत्ति करून ध्यानस्थ होत्साते कुंजाखालीं जागां जागां बसले आहेत; कोणी पर्णेंच भक्षून, कोणी जलप्राशन मात्र करून, कोणी दुग्धसेवन करून, कोणी सिद्धान्न आणून घालील तेंच खाऊन राहिले आहेत; अशांचें दर्शन घेऊन सत्समागमाचें माहात्म्य किंचित् आनंदातें पावलों. त्यांत एका बैराग्यानें कृपा करून एक मंत्र भगवंताचें नामाचा सांगितला, कीं याचा जप करीत जावा. तो भगवंतेंच सांगितला असा मानून, सर्वांस यथाशक्ति देणें देऊन, संतोषातें पावलों. पुढें दिल्लीस गेलों. तेथें पृथ्वी-पतीचें दर्शन श्रीमंतांचे आज्ञेवरून घेतलें. त्याणीं बहुत कृपायुक्त भाषण करून, आशीर्वाद देऊन आपले जवळील वस्त्रें दिलीं, तीं घेतलीं. किंचित् संतोष जाहला कीं, भगवंताचे कृपेचे अंतर्वर्ती ही कृपा आहे. तदनंतर श्रीमंतांचें लष्करांत श्रीमंतांजवळ आलों. बसलों असतां भूमिकंप जाहाला. परंतु भगवंताचें ध्यान चित्तांत आणिता जालों दिल्लींतील चित्रें वगैरे विषय ज्यांत पाप नाहीं असेही घेतले. पाहिले. पुढें उत्तरेकडील यवन शत्रुत्वेंकरून यमुना पैलतीरीं पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली; तेणेंकरून उभय-पक्षीं स्तब्धताच जाहली. पुढें कुंजपुरा श्रीमंतांनीं शौर्येंकरून घेतला. मीही युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तों इतकियांत यवन आलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचें समोर गेले, गांठ पडली तेव्हां मी तर लहान. श्रीमंतांचे बुद्धीस महान बुद्धि, परंतु भावी अर्थ तेणेंकरून विपर्यास पडला. आप्त होते, बळवंतराव मातुल व नाना पुरंधरे वगैरे, ते अनाप्त झाले. जे अनाप्त शाह नवाजखानी, भवानीशंकर वगैरे ते आप्त झाले. त्यांचें वाक्याचे ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनांची रीत धरिली. परस्परें युद्ध होत असें. गोळे प्रत्यहीं शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत

होत कीं कसें होईल ? ते ते समयीं मातोश्रीस विनंती करीत गेलों, कीं मी विनंती करितों, एक ईश्वरीं लक्ष असावें. त्यांत मातुल युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें; परंतु रात्र जाहली यामुळें राहिलें. त्या दोन महिन्यांत मनुष्यें, पशु बहुत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं, असे श्रम पाहिले. पुढें मातुश्रीसि श्रम फार जाहले. होणार आवश्यक होतें, यदर्थीं संदेह धरूंच नये, हा माझा निश्चय. पुढें थोरलें युद्ध उदईक होणार, तों पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जहाला तरी शत्रूचे हातीं श्रीमंतांचें कुटुंब व आपलें, हातीं लागूं नये. आपणच नाश करवावा. आपण तर वाचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनीं याचीही योजना केली.

दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धिमान्, धैर्यवान्, शूर, कृतकर्मे गर्व मात्र विशिष्ट, परंतु तर्तूद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणाजवळील तर्तूद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्यस्थानींच गाठ पडली. मी श्रीमंतांसन्निध ईशस्मरण किंचित् करून असें. तों विश्वासरात्र यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघड्याचे धनी देखील पूर्वींच पळाले. उजवे बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसेनातसे जाहले. ईश्वरें बुद्धि दिली. माघारें फिरलों. पूर्वीं युद्धांत बापूजी पंतीं बोध केला, माघारें फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं, अशा समयीं श्रीमंतांस सोडणें ठीक नाहीं. परंतु पुढें याप्रमाणें जहालें. लक्ष सैन्य त्यांत मोठेमोठे सरदार असतां एकही त्या समयीं श्रीमंतांस आप्त न जहाला. बहुत अन्न भक्षिलें, कृपा पुत्रवत् केली. तितके, चांगला काल होता तेव्हां कशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वरघटित विपरीत काळ, त्यांत सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरें करून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा द्याव्या. निदानीं इतके असून त्यांचें देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं. सर्व वाताहत जहाले.

मी सायंकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलों. त्या देशाचा मार्ग अगदीं ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावयापुरते

रामाजीपंत उभे होते. सांगूं लागले, घोडे वस्त्रें टाकून द्यावीं. त्यावरून सर्व टाकून शुद्ध लंगोटीं लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तों एका कोसांत तीन चार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेस समागमेंचे दहावीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों, हें सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत, रामाजीपंत राहतच गेले. असें जातां दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों तों तेच शत्रु येऊन रामाजीपंत, बापूजीपंत वगैरे यांस जखमी भारी केले. पडले. मी एकटा राहिलों. तों गवतांत गेलों. ईश्वरें तृणें करून माझें रक्षण केलें. त्यांस मोहनी घातली. सर्वांस मारिलें असतां मी जवळ असतां न मारिलें, व गवत लांब असतां जाऊं दिलें. पुढें तें गेल्यावर जाऊं लागलों. तों पुढें दोन कोशांवर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समयीं ईश्वर त्यांतीलच एका वृद्धाचें मनांत संचार करिता जहाला, कीं कशास मारितां? मग गेले. तदनंतर माझी शक्ति पाणिपतावर बहुत क्षीण, आमविकारादिक विकारयुक्त, अन्न चालेना असा मी त्याजवर दयासमुद्र सांब सदाशिव जो याणें कृपा करून, शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं, व पादचारी, अभ्यास नसतां सोळा सत्रा कोश अन्न-उदका व्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला. तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों, तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृत समान लागली. नंतर निद्रा केली.

प्रातःकालीं गंगासहस्रनाम म्हणत ईश्वरस्मरण करित चाललों. तो एका गांवामध्यें गेलों. तेथें एक साहुकार होता त्यानें घरीं नेलें. एक ब्राह्मण होता व यशवंतराव चाबुकस्वाराकडील भेटला, त्याजकडून स्वयंपाक करवून भोजन केलें. तों शत्रूचे स्वार गांवांत आले हें वर्तमान कळलें. तेव्हां साहुकार म्हणाला कीं, आम्ही गाडी करून जयनगराकडे पावते करितों. गाडींत बसून चाललों. तों पाहिलें कीं हा फसवितो. असें बुद्धीस येऊन गाडी टाकून पायउताराच होऊन चाललों. बरोबर दोन तीन ब्राह्मण, दोन मराठी माणसें, या प्रमाणें दहा बारा कोश गेलों. असे सात दिवस पायीं चाललों. नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी. तेणेंकरून समागमचे मंडळीसुद्धां भक्षून रेवाडीं पावेतों आलों. तों लष्करचे पळे त्या वाटेनें गेले. त्यांस गांवांत बालोराव म्हणून चौधे भाऊ

असत. ते माझें नांव ऐकून पुसत, कसे आहेत? चेहरा कसा? खुणाखाणा सर्व त्यांनीं पुसून घेतलें. मागाहून हे येतात हें जाणून मार्गावर नेहमीं पहात बसत. आम्ही आलों तों त्यांनीं रेवाडीबाहेर ओळखिलें, पुसूं लागले. नांव न सांगावें हा निश्चय, परंतु तो अंगींच नांव लावूं लागला. त्याचें बोलण्यांत वाकडी गोष्ट नाहीं, आम्हांस साहित्य करून द्यावें, उपकार करावा हें पाहिलें. तेव्हां नांव सांगितल्यावर आपलें घरास मंडळीसुद्धां नेऊन उत्तम प्रकारें भोजनाचें साहित्य करून दिलें. भोजन केल्यावर वस्त्रें दिलीं. तदनंतर रामजीदास जोशी मातबर रेवाडींत असे, त्यास वर्तमान कळल्यावर त्यानें आपलें घरीं नेऊन ठेविलें. सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रें दिलीं. पुढें आमचें मानस दीग भरतपुरास जावयाचें. परंतु तो म्हणे, सोबत चांगली लावून गाडी करून देऊन पावतें करीन. त्यावर एक लग्न निघालें, त्याबरोबर गाडी करून देऊन पेढे साहित्य करून दिलें. आम्ही निघालों तों वाटेंत कृष्णंभट वैद्य आले. त्यांणीं सांगितलें कीं, स्त्री विरोजी बारावकर यांणीं संभाळून आणिली. ती नारोपंत गोखले यांचें घरीं आहे. तेथें त्या गृहस्थानें साहित्य वस्त्रपात्राचें केलें. आम्ही तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचें घातलें. तेव्हां आनंद झाला. मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालों. तों दिगेस आलों. तेथें पुरुषोत्तम महादेव पाणिपताहून आले होते, ते वानवळे यांचे गुमास्त्याचें बिऱ्हाडास राहिले होते, त्यांस कळतांच त्यांनीं आपलें बिऱ्हाडास नेलें. तेथें कुटुंबसुद्धां कमकसर महिनाभर होतों. क्षुधा फार लागत असे. त्यांनीं वस्त्रें वगैरे साहित्य भोजनाचें चांगलें केलें. तेथून मातुश्रीचा शोध फार केला. परंतु घरचा खिजमतगार बरोबर होता, त्यानें सांगितलें कीं घोड्यावरून पडून जखम लागून मेली. हेंच ठिकाण लागलें.

पुढें पालखी व घोडीं घेऊन ढवळपुरावरून ग्वाल्हेरीस सारें लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर, सारे होते तेथें आलों. अंतःकरणापासून होतें कीं, श्रीकाशीस जाऊन नेहमीं वास करावा. प्रपंचांतील विषयमात्रीं दुःख हें पुरतें समजलें. परंतु देहप्रारब्ध बलवत. तेथें आलियावर सर्वांनीं निषेध केला. एकदां देशीं जावें, मातोश्रींचा विधि करावा, वगैरे कित्येक प्रकार काशींत गेल्यावर कसें होईल. पाणिपत जालें तेव्हां काशीहि कशी होते असें चित्तांत येऊन लष्करावरोबर येऊं लागलों. पाणिपताचें वर्तमान

श्रीमंत नानासाहेबांनीं ऐकून माझें स्मरण फार गुरुजीजवळ केलें कीं, त्याचें शरीर अशक्त, कसा निभाव होईल ! परंतु ईश्वरकृपेनें व त्यांचे आशीर्वादें-करून मह्त्संकटांतून पार पडलों. पुढें श्रीमंत नानासाहेब यांचें दर्शन बऱ्हाण-पुरावर जालें. पाहातों तों शरीर फार क्षीण जहालें आहे. मर्जी बेतऱ्हा जाली आहे, बहुतांच्या अब्रू क्षणाक्षणां जातात. परंतु मजवर सदयतेनें लोभेंकरून भाषण करून वर्तमान पुसलें. सांगितलें. तीनचार दिवस बरोबर राहिलों. श्रीमंत गोपिकाबाई व नारायणराव यांस देवी आल्या. करितां त्यांसहवर्तमान नर्मदातीरीं राहिली. परस्परें उभयतांचें चित्तही ठीक नाहीं हें कळलें. कालवैपरित्येंकरून न घडावयाचें तेंही घडलें.

—(काव्येतिहाससंग्रह, ले. १९२)

★ क्र. ३०

## ' ध ' चा ' मा ' केला !

श्रीमंत नारायणरावसाहेब हूड होते. कारभारी यांचा बहुमान रक्षीत नसत. एके दिवशीं पर्वतीस स्वारी गेली. तेथें सारे बोथाट्या खेळत होते. याप्रमाणें खेळ खेळत असतां श्रीमंतानीं नाना फडणीस यांचें पागोटें बोथाटीनें पाडिलें, आणि हंसूं लागले जे, ' नाना तुमचें पागोटें खालीं पटलें. ' तेव्हां नानांनीं उत्तर केलें, कीं ' मी कारकूनच आहें. माझें पागोटें पडलें हें कांहीं आश्चर्य नाहीं. स्वामींनीं आपलें पागोटें संभाळावें. ' असें उत्तर केलें. परंतु नानांनीं सूचना केली हें कांहीं समजलें नाहीं. सूचना कोणती तर कांहीं सखारामबापूंसीं श्रीमंत दादासाहेब यांचें खलबत जाहलें, त्यांत श्रीमंत नारायणरावसाहेब यांस कैद करावें असें ठरलें. ही सूचना नानांनीं श्रीमंतास या प्रकारें केली, परंतु त्यांच्या समजुतींत आली नाहीं...

तों फितूर जाहाला जे, यांस कैद करावें. त्यास सुमेरसिंग गाडदी व खरक-सिंग गाडदी हे उभयतां पांच हजार गाडद्यांचे जमातदार, त्यांस सांगितलें जें, श्रीमंत नारायणरावसाहेब यांस तुम्हीं धरावें; म्हणजे तुम्हांस बक्षीस गांव इनाम वगैरे मिळतील...तों आनंदीबाई, रघुनाथरावदादा यांची पत्नी, तिनें

गाड्यास बोलावून सांगितलें जे, तुम्हांस धरावें असें लिहून दिलें; त्यास धरिलें असतां पुढें कांहीं लोक तिकडे, कांहीं इकडे, असें होऊन राजकारण उभें राहील. त्यास मारून टाकावें हेंच बरें, म्हणजे एकछत्री राज्य जाहलें! असेंच करावें. नंतर गाडदी यांनीं उत्तर केलें कीं, आपण धरावें असें लिहून दिलें आणि मारावें कसें ? तेव्हां आनंदीबाईनीं सांगितलें, 'कीं तुम्हास मारावें असें लिहून देतें. तुमचा कागद कोठें आहे तो आणवावा.' नंतर त्यांनीं कागद आणून दिला. तेथें धरावा जें होतें तेथेंच मारावा, असें करून दिलें. ध चा मा केला.

याप्रमाणें बंदोबस्त करून जे दिवशीं मारावयाचें तेच दिवशीं श्रीमंत गांवांतच पुणें मुक्कामीं सासुरवाडी होती तेथें भोजनास सहकुटुंब गेले होते. इकडे वाड्यांत नाकेबंदी होऊन तलब चढलीं म्हणोन गाडदी जमा जाहले. श्रीमंत सासुरवाडींत भोजन करून विडे घेतात तों कोणीं सूचना केली, कीं आपण वाड्यांत जाऊं नये, काहीं दगाफितुर आहे. तेव्हां त्याजवर रागें भरले आणि तसेंच पालखींत बसोन वाड्यात आले, आणि तिसरे मजल्यावर कबूतरखाना होता तेथें अम्मळ उभे राहिले तों उभयता गाडदी तेथें आले आणि विनंति केली, कीं महाराज, आमची तलब चढली त्याची वाट काय! आमचा रोजमुरा फडशा करून द्यावा. श्रीमंतांनीं आज्ञा केली, कीं तिसरे प्रहरीं कचेरीस विनंति करावी. नंतर काय जी आज्ञा व्हावयाची ती होईल. गाडदी यांनीं उत्तर केलें, कीं आम्हांस कचेरीचो काय गरज ? आपण धनी, आपण फडशा करावा. तों श्रीमंत तेथून खालीं येऊं लागले. तों जिना उतरतांनाच गाडदी यांनीं लगट केली, कीं आम्हांस येथें ऐवज द्यावा. नाहींपेक्षां आम्हीं उतरूं देणार नाहीं...तों श्रीमंत जिना उतरून खालीं आले, तों खालीं चौकांत पूजेच्या गाई दोन बांधिल्या होत्या त्या गारद्यांच्या नागव्या तरवारीं पाहून बुजाल्या आणि दावीं तोडून गारद्यांच्या अंगावर आल्या. तों तेथें फुरसद सांपडली. नाहींतर तेथेंच श्रीमंतास मारावें असें होतें. गाई आडव्या येतांच गाड्यांनीं तलवारीनें गाई ठार मारिल्या...गारद्यांस खून चढला. तों दादासाहेबाजवळ श्रीमंत जाऊन कमरेस मिठी घालून बोलले, कीं मला मारूं नका; किल्ल्यावर कैद करून पीठमीठ लावून ठेवा. मारूं नका! असें दीन वचन बोलले तेव्हां दादासाहेबांस दया आली. तों गाडदीहि तेथें आले

आणि बोलले कीं आतां आम्ही यास जिवंत सोडणार नाहीं. हा वाचल्यास आमचीं रांडापोरें ढाणकास वांटील. सर्पास दुखवून सोडितों कीं काय? असें म्हणतांच दादासाहेब म्हणाले, कीं अरे बाळास मारूं नका. असें म्हणून हात पुढें केला. तों आंत खोलींत तेथेंच आनंदीबाई होती तेथून दादासाहेब यांस म्हणाली, कीं आतां कांकणें हातांत घाल! असें म्हणून गाडद्यास सांगितलें, कीं उभयतांस मारून टाका! तों गाडद्यांनीं एक वार टाकिला तो दादासाहेब यांचे हातास लागला. तों तुळ्या पवार आनंदीबाईचा खिसमतगार होता त्यानें श्रीमंताचे पायास धरून दादासाहेब याचे कमरेपासून ओढिलें. तों चाफाजी टिळेकर तसाच श्रीमंतांवर पडला. तों गाडदी याची तलवार चालली. तेथें कांहीं बाकी राहिली नाहीं. उभयतांचे तुकडे एके ठिकाणीं जाहले. श्रीमंत साखरभात भोजन करून गेले तो पोटांतून तसाच पडला. हें कृत्य रघुनाथराव दादा यांचे समोर जाहलें. गर्दी जाहली. तो दिवस शके १६९५ भाद्रपद शुद्ध चतुर्दशी. याप्रमाणें जी गोष्ट न व्हावयाची ती जाहली.

नंतर गाडदी यांणीं वाड्यावरून रघुनाथराव यांची द्वाही फिरवून दीन गाजविला. दिल्ली दरवाजा लाविला. पानसे यांनीं तोफखान्यांतून तोफा ओढून आणून म्हणाले जे, वाड्यास तोफा लावून वाडा उडवून देतों. गाडदी यांनीं वरून सांगितलें जे, जी व्हावयाची ती गोष्ट सरकार–हुकुमावरून पार जाहली. आतां तुम्ही आक्रोश कां करितां? आतां सरकारच्या पायांपाशींच लक्ष ठेवा.

याप्रमाणें वरून बोलतात, तों त्रिंबकराव मामा हातात भाला आणि घोड्यावर बसोन आले...आंत रघुनाथराव दादांजवळ गेले तों मारलेले मुरदे गाशांत गुंडाळोन आंत खोलींत ठेविले होते. तों रघुनाथराव दादा बोलले, कीं मामा, माझ्या कपाळास ही गोष्ट आली. आपण आंत जाऊन पहावें. त्रिंबकराव-मामा यांचें मनांत नारायणराव जखमी असतील. असें वाटून आत जाऊन पाहतात तों फक्त मांस पाहिलें. नंतर तसेंच बाहेर येऊन रागानें रघुनाथरावदादा यांचें तोंडापुढें हात नेऊन बोलले, कीं श्रीमंत बाजीराव-साहेब यांचें पोटीं पोरगी जन्मास आली असतास तर एकाद्या ब्राह्मणाचें घर उभें राहतें! हें काय केलेंस! असें म्हणतांच दादासाहेब कपाळास हात लाऊन उगेच राहिले. आणि मामास म्हणाले, कीं आतां पुढें

याचें दहनाचा विचार करावा. मामा बोलले, कीं अरे दहन कशाचें करितोस? मलाहि मारून टाक म्हणजे झालें! तुझ्या घरीं ब्राह्मण कोण येतो? दहन कोण करितो? असे अनेक प्रकारें बोलले. रघुनाथराव दादा परम पुण्यवान् स्नानसंध्याशील. परंतु स्त्रीचे योगेंकरून अनर्थास पावून अपेश माथां घेतलें. पूर्वींहि राज्यनाशास कारण स्त्रीच. तसेंच आताहि जाहलें......

पुढें दुसरे दिवशी गांवांतील शिष्ट ब्राह्मण बोलावून विचार आरंभिला जे, कांहीं प्रायश्चित्त करावें. म्हणून सभा करून रामशास्त्री यांस बोलावून आणिलें. तों हें वर्तमान होतांच शास्त्रीबोवा यांनीं आपलीं मुलें माणसें माहुलीस रवाना करून आपण हातांत पंचपात्र घेऊन सोवळ्यानीं वाड्यांत आले.तों रघुनाथरावदादा कचेरीस बसले आहेत, तों शास्त्रीबावा येतांच श्रीमंतांनीं नमस्कार केला. तेव्हां शास्त्री बोलले कीं, 'नमस्कार न करणें. तुम्हांस अशौच आहे.' असें बोलतांच बरकड पंडित म्हणाले, कीं शास्त्रीबावा, आपणांस यजमान यानीं बोलाविलें जे, गारदी यांचे हातून हें कर्म जाहलें; परंतु शब्ददोष श्रीमंतांवर आला. त्यास कांहीं प्रायश्चित करावें, यामुळें आपणांस बोलाविलें. तेव्हां शास्त्रीबावा म्हणाले, कीं प्रायश्चित्त कशाचें करतां व कोणास देतां? ब्रह्महत्या, गोहत्या, बाळहत्या जेथें जाहल्या तेथें कोणतें प्रायश्चित्त पुस्तकांत लिहिलें आहे? एक प्रायश्चित्त. यास देहान्त प्रायश्चित्त करावें. शिसें तापवून प्राशन करावें, किंवा दर्भाचें गृह करून आंत बसावें आणि अग्निसंस्कार करावा. यांतून वाचल्यास पुढें प्रायश्चित्त करावें. असें म्हणतांच सारे पंडित बोलले जे, शास्त्रीबावा, आपण असें काय म्हणून बोलतां? हे बोलले, कीं मला यांचें राज्यांत कांहीं रहावयाचें नाहीं. तुम्हास रहावयाचें असेल म्हणून तुम्ही ग्रंथाखेरीज भाषण करितां. मी मुलेंमाणसें रवाना करून सोवळ्यानींच आलों. मी असाच निघणार. कालपासोन जलस्पर्श देखील नाहीं केला! मी जीवित्वास उदार जाहलों. मर्जी असल्यास आणखी एक ब्रह्महत्या करावी! याप्रमाणें शास्त्रीबावा बोलतांच कोणीएक बोलेनासें जाहलें. शास्त्रीबावा तसेंच निघून माहुलीस आले. नंतर अन्नव्यवहार केला. मागें कांहीं प्रायश्चित्त केलें नाहीं.

—( हरिवंशाची बखर, कलम ६८ ते ७४ )

★ क्र. ३१

# दीड महिनापर्यंत लग्नाशिवाय कारभार दुसरा झाला नाहीं

शके १७०४ मध्यें श्रीमंतांचें लग्नाचा बेत ठरला. तेव्हां अगोदर सरंजामाची तयारी होऊं लागली. तमाम बलावणीं करावयाचा बेत ठरला. हिंदुस्थान प्रांतींचे राजेरजवाडे वगैरे संस्थानी यांजकडे बलावण्यासाठीं वकील पाठविले. तसेंच हिंदुस्थानांत सरकारच्या फौजा बाळगणारे शिंदे, होळकर, विसाजी कृष्ण बिनीवाले, यांसही लग्नास येण्याची आज्ञा सरकारची झाली कीं, आपापले जागां सर्व बंदोबस्त करून, जेथें ठाणीं अंमल बसलेले असतील तेथें बंदोबस्त चांगला राखून तितक्या फौजा तेथें ठेवून खाशाखाशांनीं लग्नास यावें. अशी आज्ञा होतांच त्याच बेतानें अवघा बंदोबस्त करून खाशे लग्नास निघाले. समागमें हिंदुस्थान प्रांतींचे राजेरजवाडे, संस्थानी ज्यांस ज्यांस बोलावणीं होतीं तितक्यांस समागमें घेऊन निघाले कोणी खासे आले व कोणी कारभारी आले.

इकडे पुण्याहून हैदराबादेस नबाब निजामअल्लीखां यास लग्नाचें बलावणें करावयास पुण्याहून कारकून सरंजाम देऊन पाठविले. ते हैदराबादेस वकील सरकारचे होते त्याणीं नेऊन नबाबास भेटविले. सर्व मजकूर नबाबांस विदित केला कीं, "आपण वडिलपणें येऊन समारंभ केला पाहिजे" त्यावेळेस नबाब खुषवक्तींत होते. म्हणून संतोष पावले. नंतर नबाब बोललें, "बहुत आच्छा है." असें बोलणें झाल्यानंतर नबाब निजामअल्लीखां यांणीं आपले फर्जंदास हुकूम केला कीं, "राव पंडत प्रधान इन्की शादी होती है. तुमने साथ फौज लेके सरंजाम समेत पुणें शादीकू जाना." असा हुकूम नबाब पोलाजंग ह्यांस झाल्यानंतर सरंजाम फौजेसुद्धा पोलाजंग डेरे दाखल झाले. इकडे दक्षिण-प्रांतीं संस्थानी होते त्यांस लग्नाचीं बलावणीं झालीं......टिपू सुलतान यांस कारकून बलावण्यासाठीं गेले. त्यांणीं जाऊन टिपू सुलतान यांस बलावणें केलें, तेव्हां टिपूनें जबाब केला कीं "बहुत आच्छा है. हम आते."

अशीच तमाम मामलेदार यांस सरकारचीं पत्रें लग्नास येण्यासाठीं गेलीं होतीं. ते मामलेदार पुण्यास येऊन पोहोचले. सरदार ही आले. ज्यांस पुढें

इस्तमेल जाण्याची योग्यता, त्यास श्रीमंत जाऊन घेऊन आले. ज्यास कारभारी सामोरे जाऊन आणावयाचें त्यांस कारभारी यांणीं जाऊन आणिले. अष्टप्रधान, पंतप्रतिनिधि, पंत-सचिव, पंत-मंत्री, पंत-सुमंत, पंत-अमात्य, पंत-न्यायाधीश, पंत-राजाज्ञा, पंत डबीर, असे सारे बलावण्याबरोबर पुण्यास आले. तितक्यांस श्रीमंत सामोरे जाऊन, बहूत मानानें पुण्यास घेऊन आले. नबाब पोलाजंग यांस श्रीमंत पुढें जाऊन, इतमामानानें घेऊन आले. त्यांजला मुक्कामावर उतरून त्यांचें खाण्यापिण्याचा व सर्व फौजेचे घोडे व हत्ती व उंट इतक्यांच्या दाण्यारतिबाचा, जेथपर्यंत राहतील तेथपर्यंत एकदांच बंदोबस्त योग्यतेनुरूप करून दिला.

याप्रमाणें तयारी होऊन, वधूनिश्चय बाळाजी बहिरव थत्ते याची कन्या नेमस्त झाली. लग्नाचा नेम माघमाशीं ठरला. कृष्णाजी नाईक थत्ते यांच्या येथें लग्नसमारंभ करावयाचा ठरला. शहरांत आमंत्रण सर्व शहरास झालें. सरकारी मंडळी, मामलेदार मंडळी, एरवीं शहरचे लोक, ब्राह्मण मंडळी, गृहस्थ, अग्निहोत्री व दीक्षित व शास्त्री व वैदिक व ज्योतिषी अशीं सर्वांस आमंत्रणें लग्नास झालीं. खेरीज उदमी, व्यापारी, सावकार व सराफ अशीं सर्वांस आमंत्रणें केलीं....अष्टप्रधानसुद्धां आमंत्रणें झालीं.

अशी सर्व सिद्धता होऊन दोन्हीं मंडपीं देवस्थापना झाली. नवरीची उष्टी हळद श्रीमंतांस आली. देवस्थापना झाली त्या दिवसापासून शहरांत लाख घरांस सिधे चालू झाले. घरातील घरधन्यास आणखी बिऱ्हाडें होतीं त्यांसुद्धां टीप घेऊन सिधे पंचपक्वान्नांचे दहा दिवसपर्यंत चालू झाले. तसेंच बाहेरून लष्करें होतीं त्यांस सरंजाम पोंचतें होऊं लागले. उत्तम सिधे पक्वान्नांसुद्धां द्यावयाची आज्ञा झाली. ज्या दिवशीं देवस्थापना झाली त्या दिवसापासून आहेराचा समारंभ पांच दिवसपर्यंत होत होता. आहेराच्या कापडाचे शतावधी भोत भरले. श्रीमंतपूजन थत्ते यांजकडून यावयाचें त्या दिवशीं वाड्यांत मोठा समारंभ झाला. सर्वत्र लहानथोर सरदार होळकर, भोसले, गायकवाड...... असें किती गणतीस धरावें ! तसेंच सर्व पागे, तसेंच शिलेदार, तशीच सर्व मंडळी त्या सभेस आली. ब्राह्मण सरदार पटवर्धन, विंचुरकर, रास्ते...... तसे अष्टप्रधान, सारे त्या सभेस आले. महाराज सातारकर यांस तख्त बसावयास केलें होतें, तेथें येऊन महाराज बसले. सारी मुत्सद्दी मंडळी

। कारभारी व कारकून...फडाचे व बेहड्यांतील व जामदारखान्यांतील व एक-ेरजेंतील व शिलेखान्यांतील व जिन्नसखान्यांतील व तोफखान्यांतील व इशमां-कडील, त्या त्या कारखान्यांतील दरोगे सरदार कारकुनांसमवेत त्या सभेस येऊन बसले ......त्या सभेस पन्नास काठी सोन्याची उभी राहिली आहे. वेरीज रुप्याचे काठीवाले यांचा नेम नाहीं. थत्ते यांजकडील मंडळी श्रीमंतपूजन घेऊन आली. तीहि सभेंत येऊन बसली. सारी सभा नानांनीं अवलोकन करून पाहिली आणि चोपदारास विचारिलें. "कोणी यावयाचा राहिला कीं काय ?" असा शोध करितां दादाजी गंगाधर नेसवत होळकर व बाळाजीपंत ठोसर असे राहिले होते, त्यांस बलावणें जाताच तेही येऊन हजर झाले. अशी सारी मंडळी येऊन बसली. कळवंतिणीचे नाच होतात. वाजंत्र्याचे बाजे होतात, चौघडे वाजतात. त्यासमयीं शिलेदार कारकून असामी दोघे नानांनीं जवळ बोलावून त्या उभयतांस सांगितलें, "तुम्हीं आरसे महालांत जाऊन दाजिबा आपटे व मोरोपंत भावे यांस सांगावें कीं, सकळ मंडळी येऊन बसली आहे व महाराज येऊन तख्तावर बसले आहेत. थत्ते यांजकडील श्रीमंत पूजनविधी घेऊन बसले आहेत अशी विनंती करून श्रीमंतांस लवकर घेऊन यावें." असा निरोप कळतांच उभयतां आंत जाऊन त्यांनीं श्रीमंतांस विनंती केली. विनंती करताच सरकारची स्वारी उठली. आंगावर पोषाक तमामी केला. डोकीस फेटा तमामी, अंगांत निमा पायांत विजार घालून समागमें दाजिबा आपटे प्रमुख मंडळी निघाली. श्रीमंतांचें मस्तकीं शिरपेंच, व कलगी व तुरा मोत्यांचा व कानांत चौकडा, गळ्यात मोत्याच्या व पांचेच्या माळा, हातांत पोंच्या, अशी स्वारी सरकारची निघाली. समागमें खिजमतगार मंडळी आपआपले हुद्दे घेऊन चालते झाले. अशी स्वारी सरकारची जेथें मंडळी सभा होऊन बसली होती त्या दरवाज्या-जवळ येतांच सारे चोपदार ललकारतांच समोर महाराजांनी पाहिलें. त्यावेळेस दाजिबा आपटे यांनीं श्रीमंतांचे हातावरून फुलाचा हार गुंडाळून तेथून श्रीमंत आदब बजावीत चालले. ते तख्तापांशीं जाऊन, मुजरा करून राजापुढें उभे राहिले. त्यावेळेस सकळ सभा पोलाजंगसुद्धां उभी राहिली. त्या समयीं एकदांच साऱ्या चोपदारांची ललकारी झाली. तें पाहून नानांसुद्धां कित्येकांचे नेत्रांस आनन्दाश्रू लोटले. मग राजांनीं श्रीमंतांस बसावयास जागा दाखविली. तेथें

श्रीमंत महाराजांचे उजवे बाजूस तख्तानजिक बसले. नंतर श्रीमंतपूजनविधी झाला. त्यावेळेस भिक्षुक, ब्राह्मण, शास्त्री, पंडित, ज्योतिषी, अग्निहोत्री, वैदिक बसले होते, त्यांस देकार वाटला. सर्वत्रांस पानसुपारी झाली. अत्तरगुलाब, हार, गजरे, तुरे, सर्वत्रांस मानकरी व शिलेदार व परराज्यांतील आले होते त्यांस देऊन समारंभ झाला. अवघी मंडळी श्रीमंतांची आज्ञा घेऊन जाती झाली. महाराज उठले. त्यांस श्रीमंत दरवाज्या पावेंतों पोंचवीत गेले...... असा श्रीमंतपूजनविधी झाला.

दुसरे दिवशीं तेलफळ नवरीकडे सरकारातून निघालें त्यासमयीं थत्ते यांचे मांडवांत वऱ्हाडी व मानकरी व मुत्सदी व सरदार व बाहेरील संस्थानी वगैरे लग्नास येतील त्यांची मुदारत करण्याविषयीं थत्ते यांचे मांडवांत राघोजी आंगरे सरखेल यांची व हरिपंत फडके यांची नेमणूक झाली. वऱ्हाडी मानकरी यांची बसविण्याची योग्यता पाहून ज्या ज्या ठिकाणीं जे जे बसावयाचे त्या त्या ठिकाणीं बसवून, अत्तरगुलाब पानसुपारी हारतुरे गजरे वाटावयास सरकारांतून कारकून नेमून दिले. त्यांस ताकीद कीं, "तात्या व सरखेल सांगतील त्याप्रमाणें तुम्हीं चालावें." अशी नेमणूक तेथील झाली.

इकडे सरकारांत आहेराचा समारंभ चालला. राजे महाराजे सातारकर, अष्टप्रधान, नबाब...वगैरे मुत्सद्दी मंडळी यांचे व मामलेदार मंडळी व सरसुभे संस्थानी राजेरजवाडे यांचे, सर्व वकिलांचे या सर्वांचे आहेर सरकारांत आले. तेलफळ गेलें होतें तें माघारें येऊन थत्ते यांजकडून रुखवत सरकारांत आलें. रुखवताचा समारंभ होत आहे तों वर न्यावयास थत्ते याजकडून आले. वर-प्रस्थानाची सिद्धता झाली.

श्रीमंत देवांस नमस्कार करून स्वारी बाहेर निघाली थोरला हत्ती विनायक गज आणवून त्याजवर रुप्याची अंबारी ठेविली. त्यांत श्रीमंत बसले. पाठीमागें खवासखान्यात आपा बळवंत व अमृतराव पेठे हातीं चवऱ्या घेऊन बसले. पुढें खास जिलबीस बोथाटी बारदार, विटेदार व बाणदार व लगी, त्याच्यापुढें खासबरदार अशी जिलीब पुढें चालली. जिलबीपुढें वाजंत्र्याचे ताफे, ताशे, मरफे दोनशें वाजूं लागले, त्यापुढें चौघडे वाजतात. त्याचेपुढें जिलबीचे हत्ती शेंपन्नास चालिले आहेत. त्यामध्यें जरीपटक्याचा हत्ती. मागे कोतवाल घोडे पांचसातशें सोन्याचे गंडे, पट्टे व पाठीवर भरगच्ची झुली, गळ्यांत मोहोरा, पुतळ्यांच्या माळा

[असे चालले]. जिलबीच्या हत्तीपुढें पांच हजार खासे घोड्यांवर स्वार होऊन बंदुकांचें आवाज करीत चालले आहेत. त्याच्यापुढें सांडणीस्वार शेंदोनशें व सुतर-स्वार शेंपन्नास तोफांचे आवाज करीत चालले. त्याच्यापुढें दहा हजार स्वार चालिला. अशी स्वारी लग्नास वाडा डावा घालून निघाली तेव्हां आघाडी पानशे यांचें वाड्यापाशीं होती. श्रीमंतांच्या अंबारीमागें साहेबनौबती वाजत चालल्या. वाड्या-पासून तोफखान्यापावेतों एकसारखा फौजेचा थाट उभा राहिला आहे. सरकारचें पाठीमागें वऱ्हाडिणी बायका यांणीं चालावें. बायकांमध्यें पुरुषांची दाटी न होई अशा बेतानें सभोंवती शिपाई चालिले. त्याच्यामागें भिक्षुकमंडळी, शास्त्री पुराणिक, अग्निहोत्री, ज्योतिषी व वैदिक, असा समुदाय चालला. त्यांच्या मागें मोठाले सरदार......असे मानकरी चालिले. त्यांच्यामागें सातारकर महाराज अष्टप्रधान समवेत व त्यांच्या मागें नबाब पोलाजग आणि राजेरजवाडे, संस्थानी परराज्यांतील वकील असा समुदाय मिरवत चालला असतां त्यांच्यामागें सरकारची मुत्सद्दी मंडळी असा पुण्यांतील समुदाय चालला. उंटावरील नौबती शतावधी वाजतात. अशा थाटानें व समुदायानें मोठ्या सरंजामानें चालत असतां शहरचे लोक दुरस्ता माड्यांवर व गच्च्यांवर उभे राहून तमाशा पाहातात. त्यासमयीं शहरचे लोकांनीं सोन्यारुप्याचीं फुलें श्रीमंतांवर उडविलीं. अशी स्वारी समारंभानें नवरीचे मंडपांत पोहोंचली.

त्यासमयीं जलकुंभ मस्तकीं घेऊन दासी पुढें उभ्या. दहींभात वरून ओवाळून टाकिले कुळंबिणी घागरी घेऊन उभ्या होत्या, त्यांस देणगी देऊन स्वारी मंडपांत दाखल होऊन वरासनीं बसले. वरकड मंडळी मंडपांत दाखल झाली. अगोदरच राघोजी आंगरे व हरिपंत तात्या सोयऱ्यांचे मंडपांत तरतुदीस ठेविले होते. त्यांनीं पुढें येऊन सारे मंडळीस आंत घेऊन जाऊन ज्या ज्या ठिकाणीं योग्यतेनुरूप बसावावयाचे तसे बसविले....नंतर मधुपर्क–विधी होऊन पाणिग्रहण–विधी झाला. त्यासमयीं वाजंत्र्याचे बाजे, चौघडे व नौबती, अशीं एकदांच सारीं वजूं लागलीं व तोफांची सरबत्ती झाली. मग विवाहहोम होऊन ब्राह्मणांस दक्षिणा मंडपांत वाटली. मंडपांत वऱ्हाडी होते त्यांस पान-सुपारी, हार, गजरे, तुरे वाटिले. मग सर्वत्र मंडळी सरकारचा निरोप घेऊन निघाली ती आपापले ठिकाणीं गेलीं...

दुसरे दिवसापासून सर्वत्र लोकांस मेजवानीचीं आमंत्रणें करून भोजनास बलाविलें. मंडळी तितकीच आली. वाढावयास सर्व कारकून मंडळी नेमिली. तूप वाढावयास शहरचे सराफ नेमिले. एक एका पदार्थास एक एक कारकून नेमिला. पीतांबर नेसून, शालजोड्या कंबरेस बांधून, वाढावयास लागले. चार चार कारकुनांमागें एकेक शिष्या हातीं ओलीं धोत्रें घेऊन वाढणारांचे घाम पुशीत असे. असा रोज समारंभ होत राहिला. होळकर, गायकवाड, भोंसले व सरकारचे मानकरी...अशा अवघ्यांस भोजनास घालून सर्वांस पोषाक योग्यतेनुरूप दिले सर्वांस अलंकार वस्त्रें योग्यतेनुरूप दिलीं. दीड महिनापर्यंत लग्नाशिवाय कारभार दुसरा झाला नाहीं.

—( सोहनीकृत पेशव्याची बखर, पृ. ११५ ते १२३)

★ क्र. ३२

## दूत म्हणजे राजा याचे नेत्र होत

आतां दूत-प्रेषण म्हणजे दूत पाठविणें तें कसें म्हणाल तरि सांगतों. आपण जाऊन राजकार्य अवश्यमेव करूनच येईन असा ज्यास अभिमान व प्रौढ व स्मरणवान् व बोलणार व सकलशास्त्र जाणणार व शूर व कार्याचें ठायीं अति तत्पर असा असेल त्यासच योजून पाठवावा. आतां दूतांचीं लक्षणें तीन प्रकारचीं आहेत. तीं कशीं कशीं विचाराल तरि सांगतों. एक निसृष्टार्थ व मितार्थ व शासनवाहक असे तीन प्रकार. त्यांचीच त्रिविक्षा सागतों. निसृष्टार्थ म्हणजे देश, काल योग्य असें पाहून बोलणार यास निसृष्टार्थ म्हणावें. आतां मितार्थ सांगतों. जितकें सांगून पाठविलें तितकेंच जाऊन बोलणार त्यांस मितार्थ म्हणावें. आतां शासनहर सांगतों. इकडील पत्र त्यास नेऊन द्यावें, तिकडील उत्तर यास आणून द्यावें, यास शासनहर म्हणावें. याजप्रकारें तीन लक्षणें दूताचे ठायीं आहेत म्हणोन सांगितलीं. आतां निसृष्टार्थ दूत याणीं शत्रूकडे गेला असतां शत्रुनगराचे ठायीं उगेच जाऊं नये. आधीं त्या राजिशास सांगून पाठवावें. त्याची आज्ञा आणून नंतर त्याचें नगरांत प्रवेश करावा. नगरात गेल्यावरि राजसभेंतहि जाणें ते समर्थीं

राजिवास सांगून पाठवून त्याचें उत्तर आणून मग राजसभेंत जावें. सभेंत गेल्यावरि राजा यास अभिवंदन करून उभेंच रहावें. बसों नये. राजा येणें बसा म्हटलें तर बसावें. शत्रुराज्याचा सर्व शोध करावा व दुर्गांचाहि शोध घ्यावा. व दुर्गांत रक्षकादि कसे आहेत व तेथें यंत्रेंआदि करून साहित्य कसें आहे याचाहि शोध घ्यावा. राजा कोशसंपन्न कसा आहे व यास मित्र कोण कोण आहेत, कितीक आहेत व सेना किती आहे, ती कशी आहे, हें पाहून व राजाचीं छिद्रें असतील तीं सकळ जाणून व प्रजेचीं राजा याचे ठायीं अनुरक्तता कशी आहे किंवा उदास आहे, राजा याचें गुणवर्णन करिते किंवा नाहीं करीत, व फळेंकरून व द्रव्येंकरून व कर्मेंकरून राजास कशा भजतात याचा शोध घ्यावा व सभेचे ठायीं आपले स्वामीची आज्ञा तदनुरूप भय पावत नाहीं [ असें ] निःशंकपणें बोलावें. व आपले राजा याची व शत्रूकडे आला त्या राजाची—चतुर्विधवृत्त राज्यांत असावें तें पहिलें सांगितलें—त्या चतुर्विध प्रकारें करून राजाची स्तुति करावी व आणखी तीर्थें व आश्रम वगैरें स्थानें यांचें वर्णन करून राजा यांस संबोधन द्यावें कीं, हा राजा व आपला राजा सकळ शास्त्रें जाणणार असे आहेत हें बोलणें तें आणखी जन सभेंत बसले असतील त्यांशीं बोलत असावें व जनासि आपला राजा याचें ऐश्वर्य सांगावें. तें कसें म्हणाल तरि प्रताप व कुल व ऐश्वर्य म्हणजे संपत्ति व दानशूरता व मिष्टान्नें करून ब्राह्मणभोजनें घालणार असा थोर परमदक्ष याजप्रकारें करून बोलावें. व दूत जो येणें राजा आपणांसि अनिष्ट बोलला असतांहि त्याचें सहनच करावें. आपणांस कामक्रोधही नसावा आणि वेतसी वृक्ष म्हणजे नदीचे ठायीं शेरणीचे वृक्ष उंच असे असतात, महापूरही आला तरी नम्रत्वें करून असतां कदापि भय पावत नाहींत, तसें प्रकारें दूत जो येणें नम्रत्वें असावें. व आपणांसि बोलिला असतां आपण त्यांसि धिक्कारून बोलूं नये. त्याचा अंतर्भाव काढावा. आपण आपला अंतर्भाव देऊं नये एकटेच निद्रा करावी व स्त्रियांचा संग करूं नये व मद्यपानही करूं नये. याचें कारण सांगतों. आपला अंतर्भाव निद्रेंत स्वप्नांत बोलत उठल्या अन्यास कळेल, वास्तव एकटेंच निजावें. व स्त्रियाशीं संग केला असतां कामासक्त होऊन त्यांशीं कोणेसमयीं काय बोलणें पडेल न कळे व मद्यपानें करून अव्यवस्थपणेंही काय बोलणें घडेल न कळे, म्हणून तिन्हीं सांगितलेलीं कर्में करूं नयेत. सकळ राज्याचा शोध घ्यावा व

अरण्यें असतील त्यांचाही शोध घ्यावा व राजा यांचे आसमंताद्भागीं कोण कोण राजे आहेत, ते या राजियास अनुकूल कोण प्रतिकूल कोण आहेत व युद्धास भूमि चांगली कोणती याचा शोध करणें हीं दूताचीं कर्में होत दूत म्हणजे राजा याचे नेत्र होत. यास्तव दूतद्वारा राजा येणें सकळ जाणत असावें व परराज्यांतील वृत्तांत पाहत असावा. हीं निसृष्टार्थ दूत सांगितला त्याचीं लक्षणें व कर्में होत.

—( मल्हार रामराव चिटणीसकृत सप्तप्रकरणात्मक राजनीति,
बलप्रकरण, पृ. ७३–७५

★ क्र. ३३

## इंग्रज हे वरकड सावकारांसारखे नव्हत.

साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य आबादान होतें. न मिळे त्या वस्तुजात राज्यांत येतात तें राज्य श्रीमंत होतें. पडलें संकटप्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम मिळतें. तेणेंकरून आलें संकट परिहारिजेतें. साहुकाराचें संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा. कोणेविषयीं त्याजवर जलाल अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा. पेठापेठांत दुकानें, वखारी घालवून हत्ती, घोडे, जरमिना, जरबाब, पशमी आदिकरून वस्त्रजात, रत्नें, शस्त्रें आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा. हुजूर बाजारामध्येंही थोर थोर साहुकार आणून ठेवावे. वर्षसंबंधें तसेंच लग्नादि महोत्सावीं त्यांचे त्यांचे योग्यतेनुरूप प्रतिष्ठेनें बोलावून आणून वस्त्रपात्र देऊन समाधान करीत जावें. परमुलुखीं जे जे साहुकार असतील त्यांचीं समाधानें करून आणावें. त्यांस अनुकूल न पडेच तर असतील तेथेंच त्यांचें समाधान रक्षून आपली माया लावून त्यांचे मुतालिक आणून त्यांस अनुकूल जागा, दुकानें देऊन ठेवावें. तसेंच दर्यावर्दी साहुकार यांसही बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी. साहुकारांमध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज, फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात.

राजिबास सांगून पाठवून त्याचें उत्तर आणून मग राजसभेंत जावें. सभेंत गेल्यावरि राजा यास अभिवंदन करून उभेंच रहावें. बसों नये. राजा येणें बसा म्हटलें तर बसावें. शत्रुराज्याचा सर्व शोध करावा व दुर्गाचाहि शोध घ्यावा. व दुर्गांत रक्षकादि कसे आहेत व तेथें यंत्रेंआदि करून साहित्य कसें आहे याचाहि शोध घ्यावा. राजा कोशसंपन्न कसा आहे व यास मित्र कोण कोण आहेत, कितीक आहेत व सेना किती आहे, ती कशी आहे, हें पाहून व राजाचीं छिद्रें असतील तीं सकळ जाणून व प्रजेचीं राजा याचे ठायीं अनुरक्तता कशी आहे किंवा उदास आहे, राजा याचें गुणवर्णन करिते किंवा नाहीं करीत, व फळेंकरून व द्रव्येंकरून व कर्मेंकरून राजास कशा भजतात याचा शोध घ्यावा व सभेचे ठायीं आपले स्वामींची आज्ञा तदनुरूप भय पावत नाहीं [ असें ] निःशंकपणें बोलावें. व आपले राजा याची व शत्रूकडे आला त्या राजाची—चतुर्विधवृत्त राज्यांत असावें तें पहिलें सांगितलें— त्या चतुर्विध प्रकारें करून राजाची स्तुति करावी व आणखी तीर्थें व आश्रम वगैरें स्थानें यांचें वर्णन करून राजा यांस संबोधन द्यावें कीं, हा राजा व आपला राजा सकळ शास्त्रें जाणणार असे आहेत हें बोलणें तें आणखी जन सभेंत बसले असतील त्यांशीं बोलत असावें व जनांसि आपला राजा याचें ऐश्वर्य सांगावें. तें कसें म्हणाल तरि प्रताप व कुल व ऐश्वर्य म्हणजे संपत्ति व दानशूरता व मिष्टान्नें करून ब्राह्मणभोजनें घालणार असा थोर परमदक्ष याजप्रकारें करून बोलावें. व दूत जो येणें राजा आपणांसि अनिष्ट बोलला असतांहि त्याचें सहनच करावें. आपणास कामक्रोधही नसावा आणि वेतसी वृक्ष म्हणजे नदीचे ठायीं शेरणीचे वृक्ष उंच असे असतात, महापूरही आला तरी नम्रत्वें करून असतां कदापि भय पावत नाहींत, तसें प्रकारें दूत जो येणें नम्रत्वें असावें. व आपणांसि बोलिला असतां आपण त्यांसि धिक्कारून बोलूं नये. त्याचा अंतर्भाव काढावा. आपण आपला अंतर्भाव देऊं नये एकटेच निद्रा करावी व स्त्रियांचा संग करूं नये व मद्यपानही करूं नये. याचें कारण सांगतों. आपला अंतर्भाव निद्रेंत स्वप्नांत बोलत उठल्या अन्यास कळेल, यास्तव एकटेंच निजावें. व स्त्रियाशीं संग केला असतां कामासक्त होऊन त्यांशीं कोणेसमयीं काय बोलणें पडेल न कळे व मद्यपानें करून अव्यवस्थपणेंही काय बोलणें घडेल न कळे, म्हणून तिन्हीं सांगितलेलीं कर्में करूं नयेत. सकळ राज्याचा शोध घ्यावा व

अरण्यें असतील त्यांचाही शोध घ्यावा व राजा यांचे आसमंताद्भागीं कोण कोण राजे आहेत, ते या राजिवास अनुकूल कोण प्रतिकूल कोण आहेत व युद्धास भूमि चांगली कोणती याचा शोध करणें हीं दूताचीं कर्मे होत दूत म्हणजे राजा याचे नेत्र होत. यास्तव दूतद्वारा राजा येणें सकळ जाणत असावें व पराज्यांतलि वृत्तांत पाहत असावा. हीं निसृष्टार्थ दूत सांगितला त्याचीं लक्षणें व कर्मे होत.

—( मल्हार रामराव चिटणीसकृत सप्तप्रकरणात्मक राजनीति, बलप्रकरण, पृ. ७३–७५ )

★ क्र. ३३

## इंग्रज हे वरकड सावकारांसारखे नव्हत.

साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य आबादान होतें. न मिळे त्या वस्तुजात राज्यांत येतात तें राज्य श्रीमंत होतें. पडलें संकटप्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम मिळतें. तेणेंकरून आलें संकट परिहारिजेतें. साहुकाराचें संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा. कोणेविषयीं त्याजवर जलाल अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा. पेठापेठांत दुकानें, वखारी घालवून हत्ती, घोडे, जरमिना, जरबाव, पशमी आदिकरून वस्त्रजात, रत्नें, शस्त्रें आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा. हुजूर बाजारामध्येंही थोर थोर साहुकार आणून ठेवावे. वर्षसंबंधें तसेंच लग्नादि महोत्सावीं त्यांचे त्यांचे योग्यतेनुरूप प्रतिष्ठेनें बोलावून आणून वस्त्रपात्र देऊन समाधान करीत जावें. परमुलखीं जे जे साहुकार असतील त्यांचीं समाधानें करून आणावें. त्यांस अनुकूल न पडेच तर असतील तेथेंच त्यांचें समाधान रक्षून आपली माया लावून त्यांचे मुतालिक आणून त्यांस अनुकूल जागा, दुकानें देऊन ठेवावें. तसेंच दर्यावर्दी साहुकार यांसही बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी. साहुकारांमध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज, फरासीस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात.

परंतु ते वरकड सावकारांसारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्येच करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक या प्रांतीं साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पाहतें? तथापि टोपीकरास, या प्रांतीं प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावीं हा पूर्णाभिमान. तद्नुरूप स्थळोस्थळीं कृतकार्यही झालें आहेत. त्यास ही हट्टी जात, हातास आलें स्थळ मेल्यानेंही सोडावयाचें नव्हतें. यांची आमदरफ्ती आले गेले इतकीच असों द्यावी. त्यास केवळ नेहमीं जागा देऊं नये. जंजिऱ्यासमीप तों या लोकांचें येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित् वखारीस जागा देणें झाली तर खाडींचे मोबारीं समुद्रतीरीं न द्यावी. तसे ठिकाणीं जागा दिल्यानें जोंपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तों आहेत, नाहीं तें समयीं आरमार, तोफा, दारुगोळीं हेंच त्यांचें बळ, आरमार पाठीशीं देऊन त्याचें बळें त्या बंदरीं नूतन किल्लाच निर्माण करणार, तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें. याकरितां जागा देणेंच तर लांब खाडी, गांव दोन गांवें राजापुरासारखीं असेल तेथें फरासीसांस जागा दिला होता, त्या न्यायें दोन चार नामांकित थोर शहरें असतील त्यामध्यें जागा द्यावा. तो असा कीं, नीच जागा, शहराचें आवारीं शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारी घालाव्या. त्यास इमारतीचें घर बांधों देऊं नये. या प्रकारें राहिले तर बरें, नाहीं तर याविणें प्रयोजन नाहीं. आले गेले असून त्यांचे वाटेस आपण न जावें, आपले वाटेस त्यांणीं न जावें इतकेंच पुरे. गलिमाचे मुलुखांतील गालिमाचा मुलुख मारिल्यामुळें अथवा दर्याबर्दीमुळें साहुकार सांपडले तर अवसर पाहून त्यांशीं खंड करावा. खंडाचा वसूल घेणें तोही त्यांस राखून घ्यावा. खंड फारीक झाल्यावर थोडीबहुत त्यांची मेहमानी करून बहुमानें त्यांस त्यांचें स्थळास पाठवून द्यावें गलिमाकडील सेवक लोकांस जें शासन आहे तें साहुकार लोकांस उचित नाहीं.

—( अमात्यकृत " आज्ञापत्र " प्र. ५ )

★ क्र. ३४

# तुम्ही आम्ही सकळ देवाचे आहों

( रामदासांकडून रघुनाथभट गोसाव्यांस )

॥ श्रीरामसमर्थ ॥ शके १५९६ इ. १६७४.

उत्तमगुणाळंकृत रघुनाथभक्तिपरायेण परोपकार राजमान्य राजश्री रघुनाथ भट गोसांवी यांसी स्नेहपूर्वक सूचना. तुमचा निरोप घेउनु हेलवाकीहून स्वार जालों तें सुखरूप चाफलास पावलों. संकल्पाची समारादनाहि जाली. पुढें शरीराचा उपचारहि हळुहळु होतो. तुमचें मन मजवरी बहुत आहे तें तुमच्या आवडीच्या गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें. आपण ते कर्कष सीतलाईमधें बहुताचि श्रम पावलों, तो माझा सकळ श्रम घेउनु मज निरोप दिधला तो उपकार देव जाणे. येविसीं चीत चमत्कारलें तें पत्रीं किती म्हणौनु लेहावें ! माझें अरिष्ट तुम्हीं घेउनु मज उष्ण देशासी पाठविलें हा उपकार श्रीरघुनाथजींस जाला. मज रघुनाथजीवेगळें कोण्ही जिवलग नाहीं. आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला. याउपरी माझे ठाईं तुम्हीं आहां. रघुनाथकृपेचा प्रत्यये तुम्हास आलियावरी प्रचीतीसी कळों येईल. बहुत काये लेहावें ! हें इतुकें म्यां आवडीच्या कळवळ्यानें लिहिलें आहे. मनें मन साक्ष असेल. परंतु तुम्हांस उपचारसा वाटोन रंजीस व्हाल तरी न होणें, जैसा दिवाकरभट तैसे तुम्ही हा इत्यर्थ आहे. बरें कळलें पाहिजे. तुमचा आमचा येकांत प्रसंग जालियावरी मग ऐसें लिहितां न ये. म्हणौनि ये संधीमध्यें प्रसंग फावला, पुढें फावेना, म्हणौनि लांबेंकरून लिहिलें. वरकड इतर भाव मनामधें असेल तरी रघुनाथ साक्ष असे. तुम्ही रजीस न होणें आणि जें आहे तें लिहिलें, या मधें मिथ्या स्तुती नाहीं. तुम्ही सर्वज्ञ आहां. तुमचें जें कांहीं आहे तें सकल माझेंचि आहे. म्यां मज माझ्या मनास येईल तैसें लिहिलें, येथें तुमचें काय गेलें ! कांहीं चिंता न कीजे. तुम्ही आमचेचि आहां, तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों. शरीरभेदावरी न जाणें. अंतरस्थिति पाहिल्याउपरी कळों येईल.

—( श्रीसांप्रदायिक कागदपत्रें )

★ क्र. ३५

# मराठ्याची तों इज्जत वांचणार नाहीं!

( शिवाजीकडून फौजेच्या अधिकाऱ्यास )

वैशाख शु. १५ शके १५९६
ता. ९ मे १६७४

॥ श्रीभवानी शंकर ॥

मशरुल अनाम राजश्री जुमलेदारानीं व हवालदारानीं व कारकुनानीं दिमत पायगो मु मौजे हलवर्ण, तर्फ चिपळूण, मामले दाभोळ, प्रति राजश्री शिवाजी राजे. कसबे चिपळुणीं साहेबीं लष्कराची विल्हे केली, आणि बाउपरी घाटावरी कटक जावें ऐसा मान नाहीं, म्हणून एव्हां छावणीस रवाना केले. ऐसीयास, चिपळुणीं कटकाचा मुक्काम होता, याकरितां दाभोळच्या सुभेयांत पावसाळ्याकारणें पागेस सामान व दाणा व वरकड केला होता. तो कित्येक खर्च होऊन गेला. व चिपळुणा आसपास विलातींत लष्कराची तसवीस व गवताची व वरकड दरएक बाब लागली. त्याकरितां हाल काहीं उरला नाहीं. ऐसे असतां वैशाखाचे वीस दिवस उन्हाळा, हेही पागेस अधिक बैठी पडली. परंतु जरूर झालें, त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडीं गल्ला असेल तो देववून जैशीं तैशीं पागेची बेगमी केली आहे. त्यास तुम्ही मनास मानेल ऐसा दाणा, रातिब व गवत मागाल, असेल तोंवरी धुंदी करून चाराल, नाहींसें झालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं. उपास पडतील, घोडीं मरायला लागतील. म्हणजे घोडीं तुम्हींच मारिलीं ऐसें होईल, व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास लोक जातील, कोणी कुणब्याचे येथिल दाणे आणील, कोणी भाकर, कोणी गवत, कोणी फाटें, कोणी भाजी, कोणी पाले, ऐसें करूं लागलेत, म्हणजे जे कुणबी घर धरून जीव मात्र घेऊन राहिले आहेत, तेही जाऊं लागतील. कित्येक उपाशी मराया लागतील. म्हणजे त्यांला ऐसें होईल कीं मोंगल मुलकांत आले त्याहूनही अधिक तुम्ही, ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतेची व घोड्यांची सारी बदनामी तुम्हांवर येईल. हें तुम्ही बरें जाणून, सिपाई हो, अगर पावखलक हो, बहुत यादी धरून

वर्तणूक करणें. कोणी पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिले असाल, त्यांनीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाहीं. आपल्या जागांहून बाहीर पाय घालावा गरज नाहीं. साहेबीं खजानांतून वांटण्या पदगीं घातल्या आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो, अगर गुरेंढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटें, भाजीपाले व वरकड विकावया येईल, तें रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोणावरही जुलूम अगर ज्याजती अगर कोणासही कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस साम केला आहे, तो पावसाळा पुरला पाहिजे ऐसे तजविजीनें दाणा रातीब कारकून देत जातील, तेणें प्रमाणेंच घेत जाणें, कीं उपास न पडतां रोजबरोज खायाला सांपडे, आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनाशीं घसपस कराया, अगर अमकेंच द्या, तमकेंच द्या असें म्हणाया धुंदी करून खासदार कोठींत कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं.

हल्लीं उन्हाळयाला आहे तैसे खलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहतील, कोणी आगट्या करतील, कोणी भलतेच जागां चुली रंधनाला करतील, कोणी तंबाकूला आगी घेतील, गवत पडलें आहे अगर वारें लागलें आहे तैसें मनास ना आणितां म्हणजे अविस्ताच एखादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लहळयांस कोणीकडून तरी विस्तव जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळया आहेत तितक्या एकेक जळोन जातील. तेव्हां मग कांहीं कुणब्यांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनास ताकीद करावी तैसी केली, तरी कांहीं खण कराया एक लांकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं. हें तों अवघ्यांला कळतें. या कारणें बरी ताकीद करून खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधनें करितां, आगट्या जाळितां, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्ताच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो, आगीचा दगा न हो, खण गवत वांचेल तें करणें, म्हणजे पावसाळीं घोडीं वांचलीं. नाहीं तर मग घोडीं बांधावीं न लगेत, खायास घालावें न लगे, पागाच बुडाली, तुम्ही निसूर जालेत, ऐसें होईल. या कारणें तपसिलें तुम्हांस लिहिलें असे.

जितके खासे खासे जुमलेदार, हवालदार, कारकून आहां, तितके हा रोखा तपशिलें ऐकणें आणि हुशार राहणें. वरचेवरी रोजचा रोज खबर घेऊन,

ताकीद करून, येणेंप्रमाणें वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल, त्यास मराठयाची तों इज्जत वांचणार नाहीं. मग रोजगार कैसा ? खलक समजों जाज्ती केल्या वेगळ सोडणार नाहीं, हें बरें म्हणून वर्तणूक करणें.

—( राजवाडे, खंड ८, ले. २८ )

★ क्र. ३६

## असल्या चाकरास ठीकठीक केले पाहिजेत !

( शिवाजीकडून सुमेदार जिवाजी विनायक यांस )

माघ शु. ३ शके १५९६

इ. १८ जानेवारी १६७५

" राजश्री जिवाजी विनायक सुभेदार व कारकुन सुभे मामले प्रभावळी, प्रती राजश्री शिवाजीराजे दंडवत. दौलतखां व दरियासारंग यासी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता सुभे मजकुरावरी दिधल्या. त्यास तुम्हीं कांहीं पाठविलें नाहीं म्हणोन कळोन आलें. त्यावरून अजब वाटलें कीं ऐसे नादान थेडे असतील ! तुम्हास समजलें कीं याला ऐवज, कोठेंतरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुराच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी फाटी आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार वेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील. आणि तुम्ही ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल ! एवढी हारामखोरी तुम्ही कराल; आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाला त्यावरी साहेब रिझतील कीं काय ! हें गोष्ट घडावयाचीं तऱ्ही होय न कळे कीं हबाशियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुम्हाला केले असतील ! त्याकारितां ऐसी बुद्धि केली असेल ! तरी असल्या चाकरास ठीकठीक केले पाहिजेत ! ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो ! याउपरी तऱ्ही त्याला ऐवज व गल्ला राजश्री मोरापंतीं देविला असे

तो देवितील. तो खजाना रसद पाविलियाहून अधिक जाणून तेणेंप्रमाणें आदा करणें कीं, तें तुमची फिर्याद न करीत व त्यांचें पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहत तें करणें. याउपरी बोभाट आलियाउपरी तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनिमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा पावेल. ताकीद असे.

—(राजवाडे, खंड ८, ले. ३१)

★ क्र. ३७

## नाइकाल तरी तुम्हीच कष्टी व्हाल

(शिवाजीकडून व्यंकोजीस)

(इ. १६७६–७७)

रा. शिवाजी राजे–रा. येकोजी राजे. आशीर्वाद उपरी, कैलासवासी साहेबीं कैलासवास केला त्यास आजी तेरा वर्षे जालीं. महाराजांचे पैके व जडाव व हाती व घोडे व मुलूख व आवघेहि रा. रघुनाथपंतीं तुम्हांला राज्यावरी बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिल्हें. यैसियास आमचा अर्ध वांटा तेरा वर्षे तुम्हींच खादला. आम्ही जरि तुम्हांजवळी मागावें तरी बहुत दूर होतों. बऱ्या बोलें तुम्हीं देणार नव्हां. म्हणून तेरा वर्षे सबूरी केली. मनामध्यें यैसा विचार केला कीं, बरे महाराजांचे पुत्र तेहि आहेत. खाती तोंवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समई आम्हांला फावेल ते समई आम्हीं वेव्हार सांगोन घेऊन. यैसें मनीं धरून होतों. येसियास राजकारणप्रसंगें आम्हीं कुतुबशहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. जंजी घेतली, व येलूरतर्फेचा मुलूख घेतला. व सेरखानास झगडियांत मोडून गर्देस मेळविलें. सेरखानाचे हातीं मुलूख होता तेवडाहि घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलों. तेथून तुम्हांला पत्रें लिहिलीं कीं, रा. गोविंदभट गो व रा. काकाजीपंत व रा. निलोबा नाईक व रा. रंगोबा नाईक व तिमाजी यक्षीयार राऊ यैसे भले लोक आम्हांपाशीं पाठवणें म्हणून तुम्हांला बहुता रीतीं लिहून पाठविलें. त्यावरून तुम्हीं सदरहू भले लोक आम्हांपाशीं पाठवून दिल्हे, त्या भले लोकाशी बहुता रीतीं

घरोबियाचा वेव्हार सांगोन आमचा अर्धा वांटा आम्हांला वन्या बोलें द्या म्हणोन सांगोन पाठविलें. त्या बराबरी रा. बाळंभट गो व रा. कृस्ण ज्योतिर्षी व कृस्णाजी सेखजी यैसे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हां-जवळीं जाऊन बहुतां रीतीं बोलिले कीं, गृहकलह करूं नये, आपला अर्धा वांटा मागतात तो द्यावा यैसे बोलिले. परंतु कपटबुद्धि तुम्हीं यैसीं मनीं धरली कीं. या समयांत आम्हीं बहुत थोर राजे जालों आहों. आम्हांसी आपण खासां भेटीस येऊनु हलभल नरमी बहुत दाखवावी आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादलें; पुढेंहि सारें राज्य आपणच खावें. यैसी बुद्धि मनीं धरुन वाटिआचा निवडियाची तह न करितां आपण खासांच आमचे भेटीस आलेस आमची व तुमची भेट जाली. त्याउपरी आम्हीं बहुतां रीतीं तुम्हासी बोलिलों कीं, आमचा वांटा अरधा द्या, परंतु, तुम्हीं वांटा द्यावा हा विचार मनीं धराचना. मग जरूर जालें कीं, तुम्हीं धाकटे भाऊ आपण होऊन आमचे भेटीस आलेस आणि तुम्हाला धरावें आणि वाटा मागावा हे गोष्टी थोरपणाचे इज्जतीमध्यें लाख नव्हे. या निमित्य तुम्हांला चंजाउरास जावयाचा निरोप दिधला......

आम्हीं स्वार होऊन तोरगल प्रांतास आलों तेथें यैसी खबर आइकिली कीं, तुम्हीं तुरुक लोकांच्या बुधीस लागोन आमच्या लोकांसी झगडा करावा यैसें मनीं धरून आपली सारी जमेत येकत्रट करून आमच्या लोकांवरी पाठवून दिल्हेत. ते वालगोंडपुरास आले. तुमचे लोक चालोन आल्यावरी तुमच्या आमच्या लोकांत थोर झगडा जाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी दबीर यैसे तिघे धरिले व कितीयेक लोक मारिले; कितीयेक पलोन दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार आइकिला. हे ऐकोन बहुत नवल यैसें वाटलें कीं, कै. महाराज त्यांचे तुम्हीं पुत्र, बहुत थोर लोक, यैसे असोन कांहीं विचार करीत नाहीं व धर्माधर्म विचारीत नाहीं. यैसे असतां कस्टी व्हाल याचें नवल काय? तुम्हीं म्हणाल कीं, काये विचार करावा? तरी यैसा विचार करावा होता कीं......श्री देवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण जाली आहे. दुस्ट तुर्कांला ते मारितात. आपल्या सैन्यांतहि तुरुक लोकच असतां जये कैसा होतो, आणि तुरुक लोक कैसे वाचों पाहातात, हा विचार करावा होता. आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधना-

सारखी बुधी धरून युध्य केलें आणि लोक मारविले. जें जालें तें जालें. पुढें तरी हट न करणें. तेरा वर्षे तुम्हीं सारें राज्य खादलें तें खादलें. याउपरी कितेक आमचे आम्हीं घेतलें असे. अरणी, बेंगलूर, कोल्हार, होसकोट, सिरलकटे व किरकोल जागे व चंजाऊर ऐसे जे जागें तुमचे हातीं उरले आहे ती ते आमचे लोकांचे हातीं देणें. आणि नगद पैके व जडाव व हाती व घोडे यांचा अरधा वांटा देणें. ऐसा विचार करून आम्हांसी संधी करणें. तुम्हीं ऐसा संधी निर्मलपणें केलिया आम्हीं आपणांपासोन तुम्हांला तुंगभद्रे आलाड पनाले प्रांते तिन्ही लक्ष होनांची दौलत देऊन; अथवा आम्हां जवलील दौलत तुम्हांला मानेना तरी कुतुबशाहास अर्ज करून त्यापासून ३ तीन लक्षांची दौलत देवऊनु. ऐसे दोन्ही विचार तुम्हांला लिहिले आहेत. या दोन्हीमधील येक मनीं धरून मान्य करणें. हटाचे हातीं न देणें. आपल्यांत आपण गृहकलह करावा आणि कस्टी व्हावें याचें कांहीं प्रयोजन नाहीं. या उपरी तऱ्ही आमचा आपला संधी व्हावा ऐसी बुधी मनीं धरून वांटियाचा वेव्हार निर्गमून टाकणें आणि सुखें असणें. गृहकलह बरा नव्हे. आम्ही तरी वडीलपणें आजीवरी तुम्हांला सांगितलें, आतांहि सांगतों. ऐकाल तरी बरें. तुम्हींच सुख पावाल. नाइकाल तरी तुम्हीच कस्टी व्हाल. आमचें काय चालतें ? बहुत काय लिहिणें. 'मर्यादेयं विराजते'

—(पत्रसारसंग्रह, भाग २, क्र. २३३२)

★ क्र. ३८

# मनीं धरावें तें होतें

श्री

आश्विन शु॥ १० शके १६००

(इ. १६७८)

श्रीसद्‌गुरुवर्य श्रीसकळतीर्थरूप श्रीकैवल्यधाम,

श्रीमहाराज स्वामीचे सेवेसी.

चरणरज शिवाजी राजे यांनीं चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना जे, मजवर कृपा करुनु सनाथ केले. आज्ञा केली कीं तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करून

धर्मस्थापना, देवब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करुनु, पाळण रक्षण करावें; हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्ही जे मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील. त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावीं ऐसें जें जें मनीं धरिलें तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले.

याउपरी राज्य सर्व संपादिलें तें चरणी अर्पण करूनु सर्वकाळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहली कीं, "तुम्हांस पूर्वीं धर्म सांगितले तेच करावेस. तीच सेवा होय." ऐसें आज्ञापिलें.

यावरून निकटवास घडूनु वारंवार दर्शन घडावें; श्रीची स्थापना कोठेंतरी होऊनु सांप्रदाय, शिष्य व भक्ती दिगंता विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात् गिरिगव्हरीं वास करूनु चाफळीं श्रीची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंता विस्तीर्णता घडली.

त्यास चाफळीं श्रीची पूजा, मोहोछाव, ब्राह्मणभोजन, अतिथि, इमारत सर्व यथासांग घडावें. जेथें जेथें श्रीची मूर्तिस्थापना जाहाली तेथें उछाव पूजा घडावी. यास राज्य संपादिलें. यांतील ग्रामभूमी कोठें काय नेमावी तें आज्ञा व्हावी. तेव्हां आज्ञा जाहाली कीं, "विशेष उपाधीचें कारण काय? तथापि तुमचें मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय जाहाला त्यास यथावकाश जेथें जें नेमावेसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तैसें करीत जावें." या प्रकारें आज्ञा जाहली.

★ क्र. ३९

## वैराग्य उत्तरवयीं कराल तें थोडें !

(शिवाजीकडून व्यंकोजीस)

(जानेवारी १६८०)

श्रियासह चिरंजीव अखंडित लक्ष्मीअलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री महाराज एकोजी राजे प्रती राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद.

येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशललेखन करणें. विशेष, कित्येक दिवस जाले, तुमचें पत्र येत नाहीं. याकरितां समाधान वाटत नाहीं. सांप्रत राजश्री

रघुनाथपंतीं लिहिलें कीं, तुम्ही आपले ठायीं उदासवृत्ति धरून पहिलेसारखें आपलें शरीरसंरक्षण करीत नाहीं. सणवार उत्सवादि हेंही कांहीं करीत नाहीं. सेना बहुत आहे, परंतु उद्योग करून कार्य प्रयोजन करवावें, हेंही कांहीं करीत नाहीं. वैराग्य धरिलें आहे. एखादे तीर्थीचे जागीं बसून कालक्रमणा करूं ऐशा गोष्टी सांगतां, म्हणोन विस्तारें लिहिलें होतें.

तरी या गोष्टी आम्हांस बहुत अपूर्व वाटल्या कीं, कैलासवासी स्वामींनीं कसे कसे प्रसंग पडले ते निर्वाह करून, यवनांच्या सेवा करून, आपल्या पुरुषार्थें बाजी संवारून, उत्कर्ष करून घेतला. शेवट बरा निर्वाह केला. तें सर्व तुम्ही जाणतां. त्यांच्या साह्यतेस त्यांच्या बुद्धियुक्ती सर्वही तुम्हांस उपतिष्ठोन त्यांपासून शहाणे जाले आहां त्याउपरी आम्हीही जे जे प्रसंग पडले ते निर्वाह करून कोणे तऱ्हेनें राज्य मिळविलें हें जाणतां व देखत आहां.

असें असोन तुम्हांला ऐसा कोणता प्रसंग पडला जे, इतक्याच मध्यें आपल्या संसाराची कृतकृत्यता मानून, नसतें वैराग्य मनावरी आणून, कार्य प्रयोजनाचा उद्योग सोडोन, लोकांहातीं रिकामेपणीं द्रव्य खाऊन नाश करवणें, व आपल्या शरीराची उपेक्षा करणें हें कोण शहाणपण व कोणती नीति? आम्ही तुम्हांस वडील असतां चिंता कोणे गोष्टीची आहे? याउपरी सहसा वैराग्य न धरितां मनांतून विषण्णता काढून कालक्रमणा करीत जाणें. सणवार उत्साह व पूर्ववत करीत जाऊन तुम्ही आपलें शरीरसंरक्षण बरें करीत जाणें. जमेती सेवक लोकांना रिकामें न ठेवून, कार्य प्रयोजनाचा उद्योग करून त्यांपासून सेवा करून पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. तुम्ही त्या प्रांतें पुरुषार्थ करून संतोषरूप असलिया आम्हांस समाधान व श्लाघ्य आहे कीं, कनिष्ठ बंधु असे पुरुषार्थी आहेती रा. रघुनाथ पंडित त्या प्रांतीं आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आपले पुरातन, तुम्हांसी रीतीनें वर्तावें हें निपुण जाणितात. आम्हांस मानितात तसे तुम्हांस मानितात. आम्हीं त्यांचे ठायीं विश्वास ठेविला आहे, तैसा विश्वास तुम्हीही ठेवून कार्य प्रयोजनास परस्परें अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणें. पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. रिकामें बैसोन लोकांहातीं नाचीज खाववून, काल व्यर्थ न गमावणें. कार्य प्रयोजनाचे दिवस हे आहेती. वैराग्य उत्तरवयीं कराल तें थोडें. आज उद्योग करून आम्हांसही तमासे दाखविणें. बहुत काय लिहिणें, तुम्ही सुज्ञ असां

—( इतिहाससंग्रह, ‘तंजावरचें राजघराणें,’ पृ. ४२ )

★ क्र. ४०

# श्रीच्या धर्मस्थापनेसि अंतर पडे ऐसें न करणें

( कल्याणस्वामीकडून दिवाकर गोसाव्यांस )

श्रीराम वरद ( इ. १६८२ (?)

समर्थ स्वामी

श्रीगुरुभक्तपरायेण मोक्षश्रीया विराजित विराजमान दिवाकर गोसावी यांप्रति कल्याणनाम्ने कृतानेक नमस्कार विनंति उपरि. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ अवगत जाइलें. सर्व प्रकारें विस्तारें ल्याहावें तरि श्री याची आज्ञा-प्रमाणें वर्तावें हें उचित. तेहि सुज्ञ आसेत. वडीलपणाची नीती जे परंपरागत उपासना स्छापना जे केली आहे तें भजन चालावें. तेथें कलहास कारण नाहीं. आपण श्रीच्या आज्ञेप्रमाणें देवाचा कार्यभाग चालूं देणें. श्री शिवथरचे घळिस आस्तां तुम्हांवर संतोष होऊन नळ नाम संवत्छरिं आज्ञा सर्वत्रांस केली जे, हा महाबळेश्वरकर आहे, बुद्धि हि महाबळ आहे. राजद्वारीं कित्येक प्रसंगीं पाठवायास योग्य आसे. प्रस्छानपारपत्या योग्य याच्या हस्तें श्रीचें. संस्छान जों-पर्यंत तों कार्य कर्तव्य वंशपरंपरेनें घ्यावें. ऐसें बोलोन तुम्हांस श्रीनी तांबुल दिघला ते समयीं रा॥ उद्धव गोसावी व विठल गोसावी व चीमणाबाई व भानजी गोसावी व आम्हीं आणिक कित्येक समुदायि होते ते आज्ञा स्मरोन अभिमान अक्रोध होउन भजनास प्रवर्तल्यानें श्री दया करितील तुम्हीं धैर्य न टाकणें. यांच्या कलहामुळें श्रीच्या धर्मस्छापनेसि अंतर पडे ऐसे न करणें. त्यांचा संतोषरूप आशीर्वाद आसे. सर्वेहि यश देतील. राजश्री उद्धव गोसावी यांस हि पत्र लिहिलें आसे त्यावरून विदित होईल. आम्ही हि लवकरच येतों. बहुत काय लिहिणें. धैर्य श्रीभजनाचें न टाकणें.

—( श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें, ले. ४१ )

★ क्र ४१

# स्वामीचे आमचे शफत तुळशीबेलाचे श्रीवरील आहे.

( संताजी घोरपड्याकडून पंत अमात्यास )

( इ. स. १६९५ )

राजश्री पंत अमात्य स्वामीचें सेवेसी

सकळगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित संताजी घोरपडे सेनापती जसनमुलुक दंडवत. विनंति. येथील कुशल तो प्रताप स्वामीचा जाणऊन स्वानंदवैभवलेखन केलें पाहिजे. विशेष. स्वामींनीं राजश्री सेखोजी खरगे व बाजी शिंदे याज बराबरी कितेक बुद्धिवाद सांगोन पाठविला कीं आपली भेट घेतली नाहीं, परस्पर निघोन गेलेत, म्हणून शब्द लाविला. ऐसियास, स्वामीची आमची क्रिया ऐसी नाहीं जे स्वामीसी द्वैतभाव धरावा. आम्हीं त्या प्रातें असतां दहाविसाचें साक्षीनसी ऐकिलें कीं, संताजी घोरपडे यांस त्या प्रातें ठेऊन राजश्री धनाजी जाधवराऊ यांस पाठवून देणें. म्हणवून पत्रें राजश्रीस लिहिलीं. त्यावरूनच द्वैत प्रकार दिसून आला. स्वामीचे आज्ञे-व्यतिरिक्त आम्हीं काहींच नव्हतों. विश्वासाची जाती म्हणावी तरी स्वामीचे आमचे शफत तुळशीबेलाचे श्रीवरील आहे. स्वामीचे मांडीवरी आम्हीं उसें ठेवून निजावें, आमचे मांडीवरी स्वामींनीं ठेवावें, शरीरमात्र भिन्न, आत्मा एक, ऐसें असतां ही गोष्ट द्वैताची होऊन आली. म्हणूनच वितरागें येणें जालें गतवर्षापासून श्रमाची जाती म्हणावी तर कागदीं लिहितां पुरवत नाहीं. बरें, जे गोष्ट जाहाली ते जाहाली. याउपरी तऱ्ही राज्यांत डोहणा न होय तो पदार्थ केला पाहिजे......स्वामीवितिरिक्त आम्ही काहीं नाहीं. जैसी पूर्वी आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक केली तैसीच करूं कळलें पाहिजे.

श्री राजाराम चरणीं तत्पर, संताजी घोरपडे निरंतर.

बिरुदावलि लेखनावधि :

—( राजवाडे, खंड ८, ले. ४७ )

★ क्र. ४२

# आम्ही तों कर्जदारांचे नरकांत बुडालों !

( बाजीरावाकडून ब्रह्मेंद्रस्वामीस )

( इ. १७३४ (?) )

श्रीमत् परमहंस परशरामबावा स्वामींचे सेवेसी

विनंति सेवक आज्ञाधारक बाजीराऊ कृतानेक विज्ञापना.

महाराजांनीं खंडूबरोबर आशीर्वादपत्र पाठविलें व कित्येक आज्ञा केली-तरी बावा, आम्हांस काय चिंता आहे ? तुम्ही जालेत गोसावी आणि आम्हांकडे प्रपंच लाविला. त्या प्रपंचामुळें आम्हीं जोड इतकीच केली कीं वीस लाख रुपये कर्जदार झालों. कर्जदारांचें नरकांत कुजतों इतकेंच मिळविलें. या दुःखास्तव गतवर्षीं पिंपरीस आलों तेव्हां सारें तुमच्या हवालीं करून मोकळें होऊन देवाची सेवा करावी हा हेतू धरून स्वामीस विनंति केली. स्वामी कृपालु होऊन आश्वासन दिल्हें कीं " भार्गव तुझें ध्यानीं आहे. फत्ते तुझी होईल, व पैकाहि उदंडसा मिळोन कर्ज फिटेल. सर्व साह्यकारी भार्गव आहे." तेवढें वचनावर दृष्टि देऊन होतों. त्यास चिरंजीव तुझा तिकडे गेला होता. यश मात्र थोडेंबहुत आलें. पैका न मिळाला. लष्करचे हाल श्रीरंगपट्टणचें वेळेस जाले होते तसेच जाले. आपण या गोष्टीचा शोध करावा. आतां नित्य उठोन् कर्जदारांचे पायां पडावें. शिलेदारांचें पायां पडतां पडतां कपाळ छिनत चाललें. आतां हीं सुखें आम्हांस नकोत. तुम्ही या आणि आपला कारभार संभाळा. अगर टाकून उठोन येतों. वरकड तुम्हीं आपल्या पैक्यासाठीं लिहिलें तरी स्वामींनीं कांहीं चिन्ता न करावी. आमचा जीव आहे तों पैकियाची काय चिन्ता आहे ? कोणे समयीं पैका पाहिजे तें आम्हांसही कळतें. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तों आमचा जीवच मात्र आहे. तो येथें येऊन घेणें अगर तेथें बोलावशील तरी सर्व संग टाकून येतों. तुम्हीं थोर देव. तुम्हांस वचनास धरावें, तें वचन खरें न जालें म्हणून आम्हीं लेकरांनीं तुमची रड तुम्हांपाशीं रडावी आणि रडतियाची अशी तुम्ही पुसोन परिणाम त्याचा

करावा तो कराल. तुमचें झाड लाविलें, तोडाल तरी आतां तोडा; वाढवाल तरी वाढवा. या गोष्टीस नादर कोण आहे ? तुमचे दबवणीस आम्ही कां भिऊं ? मारशील तरी तूंच, बावा, मारशील. यांतहि कीर्ती तुझीच आहे. आणि आम्हां लेकरांचे लडिवाळ चालवून कीर्तिरूप होसील तरी तूंच होसील. आम्ही तों कर्जदाराचे नरकांत बुडालों. तुझें वचनावर अवंदाचें सालीं जर मला कर्ज व राजा व लोक यांचें देणियापासून मुक्त करशील यास्तव देवाजवळ आमचा प्राण देऊं. आम्हांस लेकरास मुक्त कराल ऐसें वचन अभयपूर्वक आलिया एवढे आठ महिने आणीक जीव धरून पाहूं. यांत जर आम्हीं कृत्रिम लिहिलें असेल तरी आम्हांस तुझीच शफत असे. काय तें उत्तर लवकर पाठविणें तैसीच तजवीज करूं. तूं देव कैसा कीं आमची कृत्रिमता किंवा निर्मळता न कळे. ध्यानांत येईना तेव्हां आम्हीच प्राक्तनाचे गाढे आमचें कपाळ फुटलें ! तुमचा कोप आम्हां गरीबांवर कशास ? जे दुष्ट असतील त्यांजवर करा कीं ! तेणेंकरून प्रजा सुख पावे. आज दाभाडे गायकवाड, बांडे, कोटी कोटी रुपये खजिने, आणि मीन आम्हीं तुझे पायापाशीं व धन्याचे पायाशीं निष्ठेनें वर्ततों ते अन्नास महाग जालों ! त्यांत आम्हीं चिपळुणें, तुझे वाढविले. लाज तुला असावी. लाज धरशील तरी त्यांजवर कोप करा, आणि आमचें उर्जित करून, राहिलें ब्राह्मणाचें काम करून घ्या. नाहीं तरी आम्हांवरी कोपराग कशास पाहिजे ? आपले स्वाधीन करून घे आणि आम्हांस मुक्त कर. आणीक एखादा देव पाहून सेवा करूं. विंपरीसच बोलिले आहां कीं, "माझा राग तुजवर होणार नाहीं कदाचित् रागें भरलों तरी चालणार नाहीं." त्यास आता लिहिलें कीं, "विंपरीस मरत होतों. ज्वरानें शुद्ध नव्हती. ते बोली प्रमाण नाहीं." तरी मरत होतास तरी रात्रींच माझे रक्षणास कैसा आलास ? ह्या गोष्टी कैशास लिहितां ? जर आम्हीं उमगतों न, तरी त्वां भार्गवच साक्ष असेल. आतांच उठोन संन्यासी होऊन एखादेकडे उठोन जावें ऐसें वाटत नसेल तरी भार्गवाची शफत आहे. परंतु मागती कांहीं विवेक करून धीर धरून पाहतों. जर धीर धरवेल तरी धरवून पाहूं. नका म्हणाल तरी आम्हीं तों सिद्धच आहों. सेवेसी श्रुत होय. हजार रुपये साताऱ्याहून धावडशीस पावते करणें

म्हणून पूर्वींच खंडूचें अगोदर दोन दिवस पत्र लिहून पाठविलें आहे. पावले असतील अगर पावतील. उत्तर पाठवावें हे विज्ञति.

—( ब्रह्मेंद्रस्वामी–पत्रव्यवहार, ले. ३२ )

★ क्र. ४३

## मीच तुमचा बाजीराव !

( बाजीरावाकडून मृत सैनिकाच्या आईस )

( ११ जानेवारी १७३९, शके १६६० पौष व० १३ )

गंगाजान्हवीसमान मातुश्री वेणूबाई काकी वडिलाचे सेवेसी

अपत्ये बाजीराव बल्लाळ साष्टांग नमस्कार वि॥ येथील ता॥ पौष वद्य १३ पावेतों. स्वकीय लिहित जाणें. विशेष. पौष शु० ११ स तारापुरावर हल्ला केला ते समयीं बाजी भिवराव तोंडांत गोळी लागून कैलासवासी जाहले. ईश्वरें मोठें अनुचित केलें! तुम्हांस मोठा शोक प्राप्त जाला आमचा तर भाऊ गेला त्यास, तुम्ही वडिल, दुःखाचें परिमार्जन करून विवेक करावा. त्यांचीं मुलें व चिमणाजी आप्पा आहेत, त्यांचेहि त्याजपेक्षां अधिक चालेल. परंतु आमचा भाऊ गेला. बाजू गेली. उपाय नाहीं. त्यास, चिमणाजी भिवराव हे पाठविले आहेत. हे सांगतील तें ऐकावें. सारांश, मीच तुमचा बाजीराव असा विवेक करून धीर धरावा. मजवर दृष्टी द्यावी. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे विनंती.

—( राजवाडे, खंड ३, ले. १६७ )

★ क्र. ४४

## सावध वर्तावें

( बाळाजी बाजीरावाकडून रघुनाथरावास )

( ९ जुलै १७४२ )

श्री

चिरंजीव राजश्री रघुनाथ यांसी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद

उपरि. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें. विशेष. येथून जातेसमयीं जें सुचलें तें तुम्हांस सांगितलें आहे. त्याचें स्मरण निरंतर मनांत असूं देत जाणें. रघुवंश व विदूरनीत, चाणाख्य व जें तुम्हांस येत असेल त्याची नेमपूर्वक चिंतणिका करून थोडेंबहुत शास्त्री यांजवळ नित्य म्हणत जाणें. विराटपर्वापासून पुढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. नेमेंकरून शंभर दोनशें दंड निरंतर काढीत जाणें. केवळ घोडीं फेरावयाचे छंदास न लागणें. वजनी, कैली, बेरीज, बराबर्द करावयाचा सराव बहुत करणें. चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करित जाणें. जे आज्ञा करतील तेंच काम करावें. बहुतकरून भाऊबरोबरच जेवीत जाणें. घोडीं वेगळीं बांधीत न जाणें. क्षुद्र मनुष्याशीं सहवास कोणें प्रकारेंहि न करणें. मातुःश्रीबाई, ताई, अनुबाई यांसी एका दोहों दिवशीं घटकाभर जाऊन बसत जाणें. शरीरप्रकृत नीट नाहीं यास्तव औषध कांहीं नेमेंकरून घेत जाणें. भाऊसमागमें घोडीं फेरावयास जात जाणें. सातारियास जर जावयाची आज्ञा केली तर चिमणगिरी गंगाधर भटास भाऊजवळ विनंति करून बरोबर दिल्हे तर घेऊन जाणें. सातारियास गेलियावर दोहीं बाईकडे विना बोलाविल्यावांचून अथवा गोविंदराव यांणीं आपणहून सांगितल्यावांचून न जाणें. कालानुरूप वयास उचित, योग्य वेष करीत असावे. देवपूजा थोडी, परंतु एकांती, न बोलतां, करीत जाणें. इतकेंहि नेमेंकरून करावें आणि गर्व न करावा. निरंतर साधनवृत्तीनें वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावें. सर्व जें मनेंकरून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुसावें शिष्यधर्में असलिया फार उपयोग आहे. चिरंजीव जनार्दन बहुत कामहि करून पढतात. हे हरएक गोष्टींत अधिक जाहल्यास तुम्हीं मान्य पुरुष यांस असें व्हाल. विशेष काय लिहिणें. येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचविसा दिवसांत पावलों. श्रीकृपेनें मेहनत करून दिल्लीचे सुमारें जात आहों. जसें पुढील वर्तमान येत जाईल तैसी योजना होईल. हे आशीर्वाद.

—( राजवाडे, खंड. १, ले. ५४ )

★ क्र. ४५

## पुण्यांतील रूक्षता दूर होय ऐसें करणें

( बाळाजी बाजीरावाकडून सरदार नाना पुरंदरे यांस )

( इ. स. १७४३ (?)

चि. रा. नाना प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशीर्वाद उपरि... राज्यकार्यप्रसंग विचार करितां भगीरथसमान कैलासवासी यांनीं उत्तरेहून दक्षण पावेतों सुवर्णनदीप्रवाह चोवीस वर्षें वाहविला. त्यांचे आशीर्वादें अलिकडेही निरंतर वर्धमान वाहत असतां, देशाधिकारी, सेनामुख्य व अकृत्रिमास पूर्ण या नदीनें संतुष्ट केलें. एक तृष्णा मात्र त्या सुवर्णओघानें वर्धमान केली. दक्षण देशांतून सुवर्णनदी मार्गें रघूजी फत्तेसिंग बावांनीं आणिली, परंतु जागां जागां जिरली. मध्यें बहुत दिवस दक्षिणनदी न वाहिली. श्रीइच्छेनें या वर्षींही कालानुरूप द्रव्यनदी उत्तमच या सैन्यांत आहे. परंतु पुण्याकडे जातां रुक्ष देश फार आहे, याजमुळें सर्व जिरून जाईल. एकदां उत्तरेकडील सुवर्णनदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम सागरकूप समान पुणें या स्थळीं, मध्यें न जिरतां, पूरयुक्त योग घडणें, तेव्हां ऋणोद्धार श्रमसार्थक इहलोक परलोकीं उत्तम होईल. भागीरथी सागरासाठीं उत्पन्न, परंतु विश्वातें उद्धार करिते, तशी या काळीं हे उत्तर–दक्षण नदी वाहते, बहुतजनांस उपकारक होतें. सर्वही नद्या जलौघें समुद्रास जातात, एक कावेरी मात्र बहुत लोकांनीं उपयोगास आणिली. तशी हे द्रव्यनदी मुख्य कार्य थोडें, व गौणजनकार्य मात्र बहुत करिते. हा न्याय अन्याय, हा विचार साक्षी दृष्टिवंत असतील त्यांनीं विचारून पुण्यांतील रूक्षता दूर होय व मध्यें कार्याकारण जिरे ऐसें करणें, हें योग्य असे. बहुत काय लिहिणें ! हे आशीर्वाद.

—( राजवाडे, खंड ६, ले. १६० )

★ क्र. ४६

## घर आहे तेथें बोलाचाली आहेतच

( नानासाहेब पेशव्यांकडून शिंद्यांच्या कारभाऱ्यास )

( इ. स. १७४७ )

तुमचा व मल्हारजी होळकराचा परस्पर पेंच वाढला आहे, म्हणोन

वर्तमान बहुतां मुखें ऐकलें जातें. ऐशास, आपले घरांत सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा, हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलाचाली आहेतच, परंतु परस्पर रुष्टता कोणी बाळगीत नव्हते. सर्वही एकचित्तेंकरून ज्यांत धन्याचें हित व नक्ष तेच मनसुबा करीत गेले. श्रीकृपे व वडिलांचें पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें तें सिद्धीतें पावत गेलें. यथावह कर्मे तुम्हींच संपादिलीं. नक्ष लौकिक म्हणावा तसा लोकोत्तर जाला पुढेंही तुम्ही स्वामिसेवेस चुकतां असा अर्थ नाहीं. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्ही स्तंभच आहां. उचित मनसुबा असेल तो करितां व करालच, संदेह नाहीं. परंतु घरांत घरभेद सर्वस्वीं नसावा. या मागें तुमचें सांगणें मल्हाररावांनीं केलें; त्यांचा मनोभाव तुम्हीं सिद्धीस नेला. म्हणोन उत्तम शोभा जाहली. एकतत्त्वी फौज, एकदील. कोणाचाही बुद्धिभेद चालला नाहीं. प्रस्तुत तुमची परस्पर रुष्टता या करितां राज्यांत काय मोगलाईत काय, उमद्या उमद्यांचे घरीं मन मानें तैशा चर्चा करितात. आमचें कोणास सुख आहे ऐसें नाहीं. परंतु वडिलांचें तपोबलें आमची फौज भारी, सरदार एकदील, मर्द, कर्ते, अस्मानही कडाडलें तरी आपल्या मर्दानगीस, हिंमतीस अंतर करणार नाहींत, व केलें नाहीं. ज्यांच्या मर्दुमकीची व दिलेदाराची तारीफ सर्वही करितात. सांप्रत मल्हारबा इंदुरासच राहून राणाजीच्या भेटीस जाणार, तुम्ही देशास येणार म्हणोन ऐकतों. तर ते तिकडे राहिले, तुम्ही एकटे इकडे आल्यास लोकांत कसें दिसेल ? उमदे लोक चर्चा करितात, आमच्या सरदारांत फूट पाडावी, आपली कारीगिरी चालवावी हें इच्छितात, तेंच घडूं सकेल...नबाब आसफजाचा विचार दगाबाजीचा. एकास पळ म्हणावें, एकास पाठीस लाग म्हणावें. हा त्याचा विचार तुम्हीं जाणतच आहां. त्यास कांहीं चमत्कार दाखवावा, विचारावरी आणावें, येविशींचा विचार करावा. सारांश तुम्हीं उभयतांनीं यावें, घरचे बाहेरचें मनसुबे उचित दिसतील तैसें तुम्हां सर्वांच्या विचारें करावें, असा विचार आहे. तरी मल्हाररावास उत्तम प्रकारें सांगून त्यास घेऊन येणें. ते इकडे न येण्याचें हरप्रकारें पर्याय लावतील; तथापि बहुतां प्रकारें प्रसन्न करून खामखा घेऊन यावेंच यावें. उभयतां एक जागां जालियावर त्यांच्या चित्तांतील कलुषता दूर करून पूर्ववत्प्रमाणें तुम्ही ते

वर्तो, दरम्यान विकृतभाव नव्हे, ऐसाच विचार देवाच्या दयें करून होईल चिंता नाहीं......

—( मराठी रियासत, मध्यविभाग, भा. २, पृ. ७१–७३ )

★ क्र. ४७

## देहसंमंधैक ऊर्मि आंवरत नाहीं

( भालगांव मठपतीकडून डोमगांव मठपतीस )

( इ. १७४९ )

श्रीगुरुभजनैकनिष्ठ विमळअंतःकरण रघुपतिदयाग्रहणार्त बंधुवर्य परमश्रिया विराजित राजेश्री भीमाजी गोसावी व रामचंद्र गोसावी यांप्रति खंडोबानाम्ना कृतानेक नमस्कार विनंति उपरि. आपणांकडील पत्र आलें तेथें लिहिलें होतें कीं श्री परंधामवासि जाले तेणेंकरून बहुत असमाधान जालें तें हृदयवासि परस्परें साक्ष आसे. ते तों ब्रह्मानंदघन, परंतु देहसंमंधैक ऊर्मि आवरत नाहीं. त्या समर्थांच येत होतों. येथें जो आवरोध जाला तें सविस्तर राजेश्री नारायेण बावा निवेदितील त्याजवरून विदित होइल. उपासनेचा अभिमान श्रीस आसे. आपण खेद टाकून त्यांचा पादुकांचा ध्यास करणें. सर्व निर्वाह ते चि करितील. कांहीं चिंता न करणें. आम्हांसहि तुम्हांवेगळें अन नाहीं बहुत बहुत प्रकारें आपलें शरिर रक्षणें, अशनीं, भाषणीं, वस्त्रग्रहणीं, परस्थळिं, स्वस्थळिं सावध आसणें, लोकींकीं प्रकार अनेक जाले आहेत. श्रीचे दयेकरून सर्व कल्याण चि होईल. तुम्हीं तों विवेकी सुज्ञ आसां. बहुत काय लिहिणें वर्षाकाळानंतर श्रीस्थळास येतों. वारंवार साकल्यलेखन करणें, लोभ न टाकणें हें विनंति. तुम्हीं श्रीस्थाळें वडीलावडीली स्वामीचें संस्थान रक्षिलें. आतां जें भजन कराल तें समर्थास बहुतसें मान्य आसे. तुम्ही जे परमार्थरक्षणीं ध्वजा आसां. आम्हीं समाचार ऐकतांच यावें परंतु येथील वर्तमान रा॰ नारायण गो॰ निवेदितां विदित होईल. बहुत काय लिहिणें हे सूचना.

—( श्रीसांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड )

★ क्र. ४८

# जों जों राजकारणें करतां तों तों काम नासतें

( नानासाहेब पेशव्याकडून सेनानी गोपाळराव पटवर्धन यांस )

( १ एप्रिल १७६० )

श्री

राजश्री गोपाळराव गोविंदस्वामी गोसावी यांसी नमस्कार. विनंति उपरि. वारंवार लिहितां, कीं हीं स्थळें दुर्घट आहेत, शहास गुंततां येत नाहीं, विचारें कार्यसिद्धि करावी लागत्ये, यास्तव हल्ला राहविली म्हणोन लिहिता हें बहुत अपूर्व वाटतें. विचार दूरंदेशी तुम्हांसच कळते हें पूर्ण प्रत्ययास येऊन गेलें. परंतु हें राजकारण प्रथम नरम धरिलेंत, रस्त बंद न केली, ये गोष्टीची तारीफ चिरंजीव भाऊ वगैरे सर्व शहाणे तुमची फार करितात. तुम्हांस स्थळें अवघड वाटतात, परंतु श्रीकृपेनें तृणप्राय आहेत. मल्हारबानीं घोडप हल्ला करून घेतली तें स्थळ हल्ला करून यावयाचें होतें? कालच्या मोगलावर उभयतां चिरंजीवानीं सफेजंगी केली. एका लढाईंत मोगल चक्काचूर केला. हें कोणाचे तर्कांत येत होतें? लाखों असाध्य कामें श्रीकृपातेज-प्रतापापुढें तृणप्राय आहेत. परंतु करणारासारखें फल होतें. तुम्हीं सख्त जलद शिपाई असें जाणून मीं तुम्हांस पाठविलें होतें. तुम्हींच आम्हास विचार लिहिणार, इतकेंच कळलें असतें तर एकादे लहानसहान पथके पाठविले असते. तो प्रथम दिवशीं रस्त बंद करिता. कांहींच द्यावयाचें न बोलता, म्हणजे आज काम जाहलें असतें. तुम्ही मातबर, तुम्हांस कार्य जाहल्यावांचून आणतां नये, यास्तव तुम्हांस यश यावें म्हणून तुम्हांसच आज्ञा करितों, ते तुम्ही करीत नाहीं, ये गोष्टीस इलाज कोणता करावा? गोपाळरावजी! हे दौलताबाद तुम्हास दुर्घट वाटत्ये, परंतु दो महिन्यांत सख्तीनें वेढा घालून एक रुपया न देतां घेऊं. कां कीं त्यांची कुमक कोणी करीत नाहीं. मोगलानें कुमक केली तर पुनरपि श्रीकृपेनें पन्नास हजार फौज जमा करून अगदीं मोगल दक्षिणेंत होता कीं नव्हतासा करूं. हें मोगल समजले आहेत तुम्हीं समजत नाहीं यास इलाज काय करावा? तुम्हांस बहुत दूरंदेशी समजते. रागें

भरून लिहिलें म्हणोन तुम्हांस आतां राग येईल. परंतु तुम्ही वारंवार आम्हांस विचार लिहितां यास्तव लिहिणें प्राप्त जाहलें. या पत्रापूर्वी कार्य जाहलें असेल तर उत्तम आहे. नाहीं तर परिच्छिन्न शहरपन्हा घेऊन वेढा बसविणें. श्रीकृपेनें कार्य होईल जों जों तुम्ही राजकारणें कारितां तों तों काम नासतें. या उपर या पत्रावरून जितका राग येईल तितका त्याजवर काढणें. जर कार्य जाहलें असेल तर मग व्यर्थ राग येऊं न देणें. तुमचा स्वभाव रागीट, यास्तव इतके दिवस सख्त लिहिलें नाहीं. आतां वारंवार तुम्ही विचार लिहूं लागलां तेव्हां लाइलाज जाणून लिहिलें आहे. हें पत्र कोणास ठाऊक नाहीं. लेंकरा-दाखल सेवकावर एकांतीं रागें भरल्यास वाईट मानूं नये. हे विनंती

--(ऐति. लेखसंग्रह-खरे-ले. १५)

★ क्र. ४९

## आम्हीं एक झालों हीच गोष्ट एका करोडीची जाहली

(माधवराव पेशव्याकडून मातुश्रीस)

(ता. १७-२-१७६३)

श्री

तीर्थरूप मातुश्रीबाई वडिलांचे सेवेशीं.

विज्ञापना. कारभारी यांचे पेंचामुळें आमचे दौलतीच्या तणावा तुटत चालल्या. पहिल्यापासून राखिलें असतें तर सर्वही आपआपला कारभार करून लगामी राहते. तें न झाल्यामुळें सर्व मुलुख बुडाला. पतयातेज उडाली. लोक फितूर फार झाले धन्याचें वजन राहिलें नाहीं. शत्रू बलवत्तर झाले. तथापि पैसा असता तरी सर्वही गोष्टी इतकेही पेच सांभाळून नीट होत्या त्यास पैसा नाहीं. पैसा नाहीं तेव्हां फौज कशावर ठेवावी? फौज नाहीं, दौलत कशी राहणार? असें बारीक पाहतां सारें अवघडच आहे. प्रस्तुत तीर्थरूप राजश्री दादासाहेब व आम्हीं एक झालों हीच गोष्ट एका करोडीची जाहली. त्यांची आमची एकवाक्यता झाली. ममताही परस्परें पहिल्यापेक्षां अधिकोत्तर मिळाली.

कारभारीहि लगामीं उत्तम प्रकारें लागले. आमची दौलत पूर्वींप्रमाणें करावी हेंच मानस अंतर्यामापासून आहे. याउपर त्याचा दुसरा संकल्प नाहीं. जें करणें तें आपले व आमचे विचारें करावें. दौलतीस ज्या गोष्टीनें कल्याण तीच गोष्टी साऱ्यांनीं करावी. हीच बुद्धि आहे व प्रस्तुत याप्रमाणेंच चालत आहे. आतां गोष्टी जाहल्या आहेत, याच गोष्टी दृष्टीस असाव्या येणेंकडून पार लागेल तो लागेल! नासलें त्यास दुसरें झालें तरी अगदींच नासेल. यास्तव झालें तें उत्तम आहे. एक विचार असावा तो आहेच. परिणाम लाविणार परमेश्वर समर्थ आहे व वडिलांचें पुण्य आहे. बहूत काय लिहूं? हें विज्ञापना

—(ऐतिहासिक लेखसंग्रह, वर्ष १ लें, ले. ९१)

★ क्र ५०

## तुम्ही काळचक्रासहि फिरवाल!

(आनंदीबाईकडून सखाराम बापूस)

(२ सप्टेंबर १७७८)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सखाराम भगवंत यासी,—प्रति सौ. आनंदीबाई नमस्कार विनंती उपरी येथिल कुशल जाणून स्वकीय लिहिणें. बुंदेलखंडांत इंग्रेज दोन कंपू आले आहेत. हुजूरचीं पत्रें इंग्रेजास जाऊन इंग्रेज आले. जबरदस्त आहेत. दौलत आपणास घेऊन देतों, आम्हांस कोठीस आपल्या जवळ जागा द्यावा व आमचा फौज नेहमीं दहा हजार पर्यंत ठेवीत जावी ही गोष्ट हुजूर काठिण असें समजले. परंतु ज्यापक्षीं रानोमाळ हिंडावें, त्यापक्षीं कबूल करावें हें समजोन श्रमेंकरून कबूल केलें. हल्लीं इंग्रेज घरांत येऊं पाहतात. तमाम अंमल उठवून आपले अंमल बसवितात. आमचें निमित्य करून सर्व दौलतेस गिराईक होतील. सुजाद्दौले व महमदअल्ली यांच्या घरांतून प्रथम चाकरीस येतों म्हणून नम्रतेनें पायरव करून घेतली, आणि आता उभयतांस पोटापुरतें देऊन सर्व दौलतीचे धनी जाले आहेत. या सर्व गोष्टी तुम्हांस ठाऊक आहेत. तसेंच आमच्या घरांत होईल. ते जातीनें खबरदार व मनुष्यें जवळ चांगलीं, असें असोन उभयतांच्या गती या प्रमाणें

जाल्या. आमचे येथें तों कारभारी जवळ मातबर कोण आहे. व पायरव कोणाची आहे, व मर्जीही कोणत्या तऱ्हेची आहे, ह्या सर्व गोष्टी तुम्हांस ठाऊक असोन, तुम्ही तिहीं पिढ्यांचे कारभारी ही ब्राह्मणी दौलत बुडावयाजोगी करितां, हें तुम्हास करणें ठीक दिसत नाहीं. तुम्हास हुजूरची मर्जी कोण्या तऱ्हेनें समजावल्यानें नीट राहाते हें सर्व, कोण्या तऱ्हेनें विनंती केल्यास बिघडते यास तुम्ही माहीत आहां. पहिल्यापासून आम्हांकडील दिमतीचे तुम्हीच कारभारी. मर्जी राखून सर्व गोष्टी करीत गेलां, आणि हल्ली या तऱ्हा दिसतात. हें कालचक्र विपरीत आलें. परंतु आम्हांस हाच भरंवसा आहे कीं तुम्ही कालचक्रासही फिरवाल. हें जाणून तुम्हास पत्र लिहिलें आहे. तरी ब्राह्मणी दौलत नीट राहून, हुजूरचाही संतोष राहून सर्व गोष्टी बऱ्या होतील त्या कराव्या. न केल्यास जन्मभर चांगलें केलें आणि शेवटीं म्हातारपणीं इंग्रेजांच्या घरांत ब्राह्मणी दौलत घातली, हें अपेश येई, तो अर्थ न करावा. हुजूर ऐकत नाहीं असें म्हणाल, तर ज्या पक्षीं तुम्हीं प्राण घेतां किंवा पेंचात आणितां, त्यापक्षीं काय होईल तें हो, परंतु तुमचे हातीं नच लागावें हा निश्चय आहे, तो वाजवी आहे. कोणाचाही पेंच कोणासही सोसत नाहीं. ही गोष्ट सत्यमिथ्या तुम्हींच विचार करून आपल्या चित्तात समजणें. सारांश हाच की, इंग्रेजाच्या हातीं ब्राह्मण न चालतां, दौलतीचा बंदोबस्त होऊन यावा. विशेष लिहावें तरी तुमचें दशाशही आम्हांस समजत नाहीं. परंतु यश अपेश याचे धनी तुम्ही. ही गोष्ट लहान माधवराव पाळण्यांत आहेत त्यासही समजते. मग दहा वर्षांवर जें मनुष्य असेल त्यास न समजे असा पर्याय नाहीं. आम्ही लिहून विशेष तों नाहीं तुम्ही मोजीतही नाहीं ! परंतु आकार दिसत चालला यास्तव सूचना लिहिली आहे. तरी जें कर्तव्य असेल तें विचारें करावें. पूर्वीं तुम्हांस दोन पत्रें पाठविलीं होतीं, व नवी भावजय लाडकी केली, तिचें नाव काय ठेविलें, व दुसरी करावयाची कधीं, हा मजकूर विशेष लिहिला होता, त्याचें उत्तर कांहींच आलें नाहीं. पत्रे पोहोंचलीं कीं नाहीं हें न कळे. तर उत्तर पाठविणें. बहुत काय लिहिणें, हे विनंती.

—( ऐति टिपणें, भा. १, ले. १९ )

★ क्र. ५१

## संसारीं नवनवेंच गुंते पडतात

( कविवर्य मोरोपंतांकडून विठोबादादा चातुर्मासे यांस )

( इ. १७७८ )

श्रीमद्‌भगवद्‌भक्तवर्य राजमान्य राजश्री विठोबादादा यांचे शेवेशीं,

विद्यार्थी मयूर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. भवानीमनुष्याहातीं पुस्तक पाठविलें ( तें ) पावोन समाधान झालें......विजयादशमी जाल्यावरि येणें म्हणोन आज्ञा ती मस्तकीं धरून यावयाच्या उद्योगातें करितों श्रीमंताजवळ हरिवंश होतो ऐसें आहे. श्रीमंत जों गृहीं असतात पर्जन्यकाळीं, तोंच आपलाही समाज श्रीक्षेत्रीं. यांस सोडून यावें तरी यांच्या चित्तानुकूळतेंकरून ! अशास तुमच्या कृपेनें घडेल तें पहावें. सुश्रुतग्रंथ श्री बाबा उपाध्याय यांशीं पावता करावा. तुम्हांस काहीं पुस्तकें पाठविलीं पहावीं. श्री द्रोणपर्व श्री गुरुपुत्रांकडील आलें नाहीं आल्यावरी आपणाकडे येईल. शांतिपर्व राजधर्मपर्व प्रारंभ झाला आहे. सांप्रत वर्षाकाळीं बुद्धीस आळस आला, राहिलें. खोकला झाला आहे. आपणही चार दिवस धीर धरावा. वर्षाकाळीं असें बुद्धिमांद्य किंचित् होतें. वृद्धपणीं शक्त्युत्साह उणा पडतो. श्री ज्ञानदेवाचें चरितार्चें कीर्तन झालें. पुढेंही चालेल. मीही यावयाच्या यत्नांत आहें. संसारीं नवनवेंच गुंते पडतात देव कृपा करील तरीच सत्समागम घडोन अत्युत्सवपात्र जन होतो. बहुत काय लिहिणें. दया करावी हें विनंती. गंगाभागीरथी श्री मातृश्री जिजीबाईच्या चरणीं साष्टांग नमस्कार प्रविष्ट करावा. श्रीभगवद्भक्त भैराळ बाबा स्वामीचे शेवेशीं साष्टांग नमस्कार. गतशोक न करावा. तीर्थरूपांच्या हृदयाशीं तोषवावें हें विनंती.

—( मोरोपंताचें चरित्र—पांगारकर, पृ. १३०–१३१ )

★ क्र. ५२

## तेरा कलमी

( गोपिकाबाईकडून सवाई माधवरावास )

( ८ जाने. १७८३ )

श्रियासह चिरंजीव राजश्री माधवराव प्रधान यांसि प्रति गोपिकाबाई मुक्काम

नाशिक आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें.

"मी लहान, वडिलीं सर्व-त्याग करून श्रीक्षेत्रीं वास केला आहे, त्यास सर्व माहीत वडिलांस, यास्तव कोणे रीतीनें चालावें हें सर्व ल्याहावयास आज्ञा व्हावी." म्हणोन लिहिलें त्यास. सूर्यग्रहण-संधिअन्वयें कृष्णपक्ष होऊन लोप जाहला होता, तो हल्लीं पुण्योदयें करून दुष्टांचा संहार व सुष्टांचें पालनग्रहणार्थ तुम्ही या कुळांत जन्म घेऊन पुरंदर येथें उदयास आलां. त्यापक्षीं इकडून लिहावयाचें कारण दिसत नाहीं. परंतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिलें, त्यापेक्षां तूर्त चालावयाचें जें सुचलें तें लिहिलें आहे. तपसील कलमबंदी--

१ प्रातःकालचे घटका रात्री उठोन दिशेस जाऊन पादप्रक्षालन मुखप्रक्षालन करून दिवाणखान्यांतील श्रीमृत्तिका गणपतींचें दर्शन घेऊन प्रातःस्मरणाचें श्लोक म्हणावे. नंतर सूर्योदयाबरोबर वैद्यांनीं येऊन हात पहावा. प्रकृतिअन्वयें औषध घ्यावें. नंतर लिहावयास बसावें. कित्यांत हात फिरवून मग ज्या कागदावर निशाणें व्हावयाचीं असतील ते लिखितान्वयेंच वाचावे. ते समयीं जवळ गुरुजी व आणखी एक दोघे संभावित योग्य असतील ते असावे. जास्त असों नये. येणेंप्रमाणें घटिका तीन. येकूण घटिका......कलम १

१ तालीमखान्यांत जाऊन दंड काढावें. दिवसेंदिवस शक्तिअन्वयें चढते दंड असावे. बरोबर समवयी मुलें पांच चार संभावितांचीं असावी; व जेठी एक दोघे व नेहमी विश्वासुक गृहस्थ बरोबर असावयाचे ते असावे. खिजमतगार कार्याकारण असावे. जेठी यांनीं कुस्तीचे डाव शिकवावें. नंतर समवयी मुलांसुद्धां प्रकृतीस जो खुराख मानेल तो नेमेंकरून घेत जावा. येणेंप्रमाणें घटिका दीड एकूण घटी साडेचार......कलम २.

१ स्नान करावयाचे समयीं पंचांग जोशी वाचून संकल्प सांगावा. नंतर गंगाष्टक म्हणावें. संध्या थोडकी, परंतु न बोलतां करावी. नंतर नित्य दानें देऊन क्षणभर बसावें. ये समयीं शास्त्री व वैदिक महान् शिष्ट आल्यास नमस्कार करून योग्यतेनुरूप उत्थापन देऊन कांहीं भाषण करावें. नंतर उपहार करावयास जावें. येणेंप्रमाणें घटी साडेतीन. येकूण घटी आठ...... कलम ३.

१ कचेरीस यावें ते समयीं सर्वांक्ष देऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें. कचेरींत लघु शब्द बोलूं नये. मनुष्यपरीक्षा असावी. गैरवाखा एखाद्यानें समजाविलेस पक्केपर्णी विचार करून अपराध ठरल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध करवावें. आपण नेत्रकटाक्ष करून पहावें. अपराधानुरूप पारपत्य करावें. परंतु संभावित गृहस्थ बहुत दिवस पदरींचा, प्रामाणिक, अशानें रदबदली केली असतां क्षमा करावी. दुसऱ्याचें क्षुद्र काढूं नये. येणेंकरून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचें मनांत दंश राहतो, साधल्यानुरूप नाश करील, आणि आपल्यास लघुपणा येईल. संन्निधानीं लोभांत लघु मनुष्य राखल्यास जें केलें त्यास ते रुकार होतात, परंतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती. येणेंप्रमाणें घटी तीन. ऐकूण घटी अकरा...कलम ४.

१. भोजनाचे पूर्वीं सोवळें जाहले नंतर थोरल्या देवघरांत जाऊन फुलें घालून, नमस्कार करून, ब्राह्मणांस उदक सोडून, भोजनास बसावें. ते समयीं भाषण करावें तें राजसूययज्ञांतील ब्राह्मणभोजन प्रकरणीं वगैरे योग्य सर्वांस दिसेल तें बोलावें. पाक करणार व शिष्यमंडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे. घटी २. येणेंप्रमाणें घटी १३......कलम ५

१ भोजनोत्तर आचमन करून शतपदी करून तांबूल घ्यावा. नंतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे. एकादे दिवशीं निद्रा आल्यास घटी अर्ध-घटिका निजावें. येणेंप्रमाणे घटी २. येकूण घटी पंधरा......कलम ६

१ शास्त्री यांजवळ विराटपर्वापासून भारतांतील चिंतनिका करीत असावी; व वृद्ध मनुष्यें पदरचीं बहुत दिवशीं व अन्य शहाणे असतील त्यांशीं दिल्ली प्रकरणीं व महाराज प्रकरणीं गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यांत असाव्या. आपले वडिलांच्या गोष्टी कारभारी यांसीं एकांत स्थळीं विचारीत असावे; व तसबिरा व नकाशे अनेक पहात असावे. तें समयीं शहाणे बुद्धिमान असतील ते जवळ असावे. येणेंप्रमाणें घटिका चार एकूण घटिका. १९......कलम ७

१ खडें लिहावयास बसले, तें समयीं एक दोन मुलें संभावित गृहस्थांची बुद्धिमान पहावयास असावीं. करदन, बस्तन, गुणाकार, भागाकार करावयाचा सराव बहुत असावा. गुरुजी यांनीं विद्याभ्यासाकरितां बोलणें प्राप्त आहे. परंतु लिहावयाचे जागींच बोलणें. तेथें विशेष कोणी असों नये. घटी चार एकूण घटिका तेवीस......कलम ८

१ लिहिणें जाहलें नंतर कांहीं उपहार थोडासा मर्जी असल्यास मुलां-समवेत घेऊन करावा. नंतर तांबूल घ्यावा. घटी एक. एकूण घटिका चोवीस ......कलम ९

१ घोडीं फेरावयास चार रोजांनीं जात जावे. तें समयीं बरोबर पटवर्धन मंडळी व अन्यत्र सरदार असावे. त्यांशीं भाषण करणें तें संतोषवृत्तीनें करावें. परंतु अत्यंत लोभईा नसावा व विरुद्धही न दाखवावे. कांहीं अंतर जाहल्यास क्षमा होणार नाहीं असें भय असावें. योग्यता बघून त्यांशीं भाषण संतोषेंकरून करावें. ज्या दिवशीं स्वारी जावयाची नाहीं, त्या दिवशीं कागदपत्र दवलत प्रकरणीं असतील ते कारभारी यांणीं समजावीत असावे. ते समयीं कोणी असों नये. व गंगाभागीरथी ताई साठी यांची भेटी चार रोजीं एक वेळ घेत असावी. त्यांसच वाड्यांत यावयाचा बेत व्हावा. नंतर त्यांस बहुत संतोषेंकरून बोलावें व मूलपणानें बोलण्याचा डौल दाखवावा. वाड्यांतच आज रहावें असा आग्रह करून ठेऊन घेत जावी. दिवाण यांणीं राजकारणाचें वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विनंती करीत असावी. त्या समयीं अन्यत्र कोणी असों नये व त्यांतील अभिप्राय दुसऱ्यापाशीं निघों नये. म्हणजे मसलती असाध्य होत नाहींत. बातमी हरतऱ्हेची राखावी, म्हणजे मसलतीस बल बहुत आहे. पदरच्या मनुष्यांचें चालवावयाचें त्यास जिकीर करूं नये. एकूण घटी चार. एकूण घटिका अठ्ठावीस...कलम १०

१ तिरंदाजी करावयास जावें. तेथें बरोबर सरदार व पागे व मानकरी बरोबर असल्यास तीर कोण कसे मारताहेत ध्यानांत असावें व हरएक खेळ पहावयाचे ते सर्वत्र समवेत पहावे. येणेंप्रमाणें घटिका दोन. एकूण घटिका ३०......कलम ११

१ दीपदर्शन जाहल्यानंतर संध्येस वस्त्रांतर करून बसावें. संध्या जाहलेनंतर स्तोत्रपाठ म्हणावा. नंतर पुरुषसूक्त अथवा पवमानांतील अध्याय म्हणावे. ते समयीं आश्रितांनीं जवळ असावें. नंतर भोजनास जावें. भोजन होऊन उठे-पर्यंत घटी चार......कलम १२

१ भोजनोत्तर तांबूल खावयास दिवाणखान्यांत क्षणभर बसून तांबूल घ्यावें.

नंतर कार्याकारण मंडळी जवळ असावी. तें समयीं बातमीदार यांणीं वर्तमान गुप्त सांगत असावें; व हरएक बातमीचीं पत्रें आलेलीं पहावयाजोगीं असतील तीं पहावीं, बाकीचीं पत्रें विश्वासुक मनुष्य कोण असेल त्याजकडे काम योजावें. त्याणीं सांगावें व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सांगतात याची चौकशी असावी. नंतर निद्रेस जावें. येणेंप्रमाणें घटी तीन. एकूण घटिका सात.

एकूण कलमें तेरा लिहिलीं आहेत, तीं ध्यानीं आणोन चालल्यास उपयोगीं पडतील. बहुत काय लिहिणें. हे आशीर्वाद.

—( काव्येतिहाससंग्रह, ले. ३९३ )

★ क्र. ५३

## पहिली दिल्ली आतां राहिली नाहीं

( शंकराजी सखदेवाकडून नाना फडणिसास )

(२२ फेब्रु. १७८३)

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,

सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल स्वामींचें कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष पत्रीं आज्ञा कीं, "आम्हांस श्रींच्या चित्रांचे मुरक्क्याची गरज आहे. याकरितां दिल्लींत निधामल वगैरे जुने कारीगरांच्या हातच्या तसबिरा श्रीकृष्णाच्या बहुत चांगल्या मेळवून, विकत घेऊन, त्यांस सोनेरी हासिया करून, त्याची वही बांधवून बहुत माबजतीनें पाठवावे. पैका पडेल तो पाठवून देऊं परंतु तारीफलायक चित्रें मेळवून पाठवावीं म्हणोन पत्रीं आज्ञा. त्यास निधामल म्हणून मुसव्वर हिंदु, अहमदशहा पातशहाचे अंमलांत येथें होता. त्याची निष्ठा ईश्वरचरणीं बहुत होती. म्हणून श्रीकृष्णाची वगैरे देवांच्या तसबिरी हमेशा करीत होता. व त्यासमयीं काईत, क्षत्री, मुत्सद्दी, खालसेवाले वगैरे वकील लोक मातबर होते,

तेही श्रींच्या तसबिरा करवीत होते. त्या अलिकडे अबदालीची गर्दी झाली, त्यामुळें निधामल दिल्लीहून उठोन लखनऊस गेला. तेथें मृत्यु पावला. त्याचे पुत्र लखनऊस दोघे आहेत. त्यापैकीं एक तों केवळ नाकारच आहे. एक कांहींसी मुस्वरी करितो. परंतु त्याप्रमाणें नाहीं. म्हणून श्रवणांत आलें आहे... मुसलमान कारीगर आहेत. ते या काळाप्रमाणें तसबिरा करितात. श्रीकृष्णाचें ध्यानाची तसबीर आपल्या पसंती योग्य करितां येत नाहीं ऐसे कारीगर आहेत. याहीवर आज्ञेप्रमाणें आजपावेतों तलाश केला. ऐसी जुनी तसबीर हातीं लागली नाहीं. पुढेंही तलाशांत आहे. श्रीकृष्णाच्या तसबिरा हातीं लागल्यास सेवेसीं आज्ञेप्रमाणें तयारी करून पाठवीन. या दिवसांत येथें कोणी जुने लोक हिंदु मातबर राहिले नाहींत. कुल उपासामुळें व बेरोजगारीमुळें लखनऊकडे चांगला कारीगर वगैरे कसबी लोक उठोन गेले. बहुत मृत्यु पावले. कांहीं त्यांचे वंशीं आहेत ते नाकारे ! याप्रमाणें दिल्लीची अवस्था जाली आहे. पहिली दिल्ली लोकांनीं पाहिली होती, ते आतां राहिली नाहीं नांव मात्र राहिलें आहे. रविसंक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत. ते स्वीकारून उत्तरीं लोभ करावा. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञाप्ति.

★. क्र. ५४

## राजकारणास शपथ कोठें धरून बसतात

( अलिबहादारास त्याच्या आईकडून )

श्री

( शके १८११ आश्विन शु ७)
( २५ सप्टेंबर १७८९ )

सहस्त्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री अलीबहादुर यांसी आसीर्वाद उपरी. येथिल कुशल तागाईत छ मोहरम पावेतो वर्तमान यथास्थित असे. विशेष पत्रें डाकेबरोबर पाठविलीं तीं पावलीं. लेखनार्थ कळला. तुमचे व राजश्री पाटील बावाचा तुम्ही गेलियापासून स्नेह ऐकीत होतो, तो पर्यंत येक वियोगाची चिंता मात्र होती. दुसरी कालजी वाटत नव्हती. तुम्ही येथें पत्र

लिहितां त्यांत राजश्री नानास कितीयेक न्यून गोष्टी राजश्री पाटील बावाच्या लिहितां. त्यांस कोणास लिहू नयेत कोणा वेलेस कोणाचे हातीं पत्र जाण्यास आश्चीर्य नाहीं. तेव्हां तुम्हांस वाईट. या करितां डाकेवा अथवा जासुदावा वगैरे कदापि लिहूं नये. इतवारी कोणी आल्यास मुखजबानी त्याजबरोबर असी गोष्ट सांगून पाठवावी. परन्तु पत्रीं कदापि लिहूं नये. त्याविशीं संदेह धरूं नये. चोराचा अगर मवासाचा अगर हरएक वाटाण्याने पत्र धरून वांचून पाहतील. यास्तव याप्रो लिहून पा। म्हणोन राजश्री नानांनीं दिनकरपंतास बलावून सांगून पाठविले त्याजवरून सूचना लिहिली आहे. तरी पाटील बावाच्या उण्या गोष्टी पत्रीं कदापि लिहूं नये. तुमचें पत्रीं दरबारचें वर्तमान शोध करून बरोबर लिहावयास आज्ञा जाली पाहिजे म्हणोन आहे, त्यास सुर्माजिवा सविस्तर लिहून पाठविले आहे. डाकेवा हमेशा पाठवावें तर चित्तांत मार्गाचा संशय येतो. म्हणून लिहिण्यांत येत नाहीं व तर्से नवल विशेषही प्रस्तुत नाही. राजश्री पाटील बावाचा व तुमचा स्नेह बहुत उपयोगी पडता. विरूधांत जोड नाहीं. तुमचे अभिमानी येक राजश्री नाना आहेत, दुसरा कोणी नाहीं. पुढें येथें लक्ष वाल्यानें स्नेह राहून तोड पडे तो अर्थ घडल्यातच बहुत उत्तम आहे. राजकारणास सपत कोठें धरून बसतात ! रंग पाहून काम करीत आहेत. प्रस्तुत राजश्री निजामअलीखां यांणीं तुमचे देखत श्रीमंत कैलासवासी दादासाहेब यास शपत कुराण उचलून हातीं दिल्हें. पुढें वर्तणूक जाहाली ती तुम्हास माहीतच आहे. दमाजी गायकवाड यास शपत घेऊन लुटिले व बापूजी नाईक याजवा मराठयास शपथ देऊन आणिला आणि डोकें मारिलें अशा गोष्टी राजकारणाच्या आहेत. राजश्री पाटीलबावांनींही तुम्हाकडून शपत देवऊन गोसावी हाताखालीं घालावयाची काबू केली होती. परन्तु तुम्ही त्याचा दस्तऐवज पका न घेता शपत देऊन चुकलां. जाली गोष्ट येत नाहीं. परन्तु पुढें तरी जें करणें तें विचार पाहून करीत जावें. बहुत काय लिहिणें. हे आसीर्वाद.

—( मराठी दप्तर, रुमाल ३ रा, लेखांक. १२ )

★. क्र. ५५

# जितकें जिदीचें भाषण बोलाल तितकें अधिक वाढेल.

( खासगी कारभाऱ्याकडून अलिबहादरास )

श्री गणराज

( शके १७१३ भाद्रपद व. ३० )
( २७ सप्टेंबर १७९१ )

साहेबाहेचें सेवेसी विज्ञापना. श्रीमंत सौ. रहिमतबीबी याणीं मोहरमांत विटालसे कुणबिणीस काम सांगितलें. सिवली. त्यावरून वडिलांनीं निषेध केला, कीं " आमचें येथें हें आचरण नसतां, हें काय ? " असे रीतीनें सांगितलें असतां समजोन बीबीनें उगेच राहून रीतीनें चालावें तें न करितां जीद बहुत घालूं लागलीं. " मलाच मना करितां ! वर्कड सारी सिवतात त्यास मना करित नाहीं." ऐसे मुर्खपणाचें बोलणें बोलों लागली. एक रोज माझें समक्ष याप्रोाच भाषणें होऊन बहुत वाढों लागलें. तेव्हां मी बीबी त्यास उठोन लाविलें कीं, " तुम्हीं दुसरे कामास जा. समजोन बोलत नाहीं." याकरितां तेव्हां उठोन गेली. नंतर फुलाबाईचे समक्ष या प्रो होऊं लागलें. तेव्हां याणीं उठोन लाविलें तेव्हां उठोन भितीपलिकडे जाऊन भाद्रपदी अमावास्येचे दिवसीं मोठ्यानें रडों लागली. तेव्हां वडिलांनीं सांगितलें कीं, " आज अवसेचे रडत्येस ? कामास येणार नाहीं. उगीच राहा. नाहींतर उठल्यावर येऊन तोंडांत मारीन." त्याचें उत्तर पांच सात वेळ बीबीनीं केलें कीं, " या, कसी येता ती मारा ! " त्या रागानें वडील उठोन जाऊं लागली. तेव्हां येक दोघांनीं एकवेल अर्ज करून राहाविलें. मागती ' या, कसी येता ती पाहूं बरे ' असीं भाषणें आईकीलीं. तेव्हां उठोन जाऊन दोन च्यार तमाचे व लहानसें लाकूड सांपडलें तें येक दोन मारिलें. बीबीनीं जाबसालहि बहुत मनस्वीच घटाईचें केलें. मग जवलच्यानीं वडिलांस विनंती करून आरसेमहालांत आणिलें. मजपासीं सर्व वर्तमान बोलावून सांगितलें, " आपण आलियावर हा वेलपर्यंत बहुत ममतेनच राखिले." या समई वडिलांनीं निग्रह प्रथमता धरला नवता. मर्यादा व आचरणावरून उपदेस करूं लागली. त्याचीं उत्तरें जिदीची होऊं लागलीं.

त्यावरून मारापर्यंत आले. नंतर दुसरे दिवशीं सेख फाजल वाड्यांत येऊन बोलों लागले कीं, " हें काय ! यांत आमची आबरु राहात नाहीं." याप्रो बोलूं लागले. वडिलांनीं उत्तरें जाले वर्तमानाचीच केलीं. नंतर मीं त्यास येकीकडे येऊन सांगितलें कीं, ' या या तऱ्हेनें जालें. वडील धनी चांगली गोष्ट सांगत असतां आईकावी. जीद करावी आणि या थरास आणावें कीं काय ! बरे, जालें तें जालें. पुढें तुम्ही दम खाऊन बीबीस निषेध करावा. येक दो रोजीं वडिलास अर्जी करून पायावर घालावें, आणि मर्यादेन चालावें यांतच ठीक. जितकें जिदीचें भाषण बोलाल तितकें अधिक वाढेल......पुढें थमोन मग लिहावें म्हणोन दम खाला होता. हाली वडिलांची मर्जी केवल कडक नाहीं. जिदीचें जाबसालानें वाढलें. आतां कांहीं समजुतीवरच येईल. विदीत व्हावें. बहुत काय लिहूं ! हें विज्ञापना.

—( मराठी दफ्तर, रुमाल ३ रा, ले. १८० )

★ क्र. ५६

## संशय दूर जाले, हें अति चांगलें ! अति चांगलें !

( गोविंदराव काळ्याकडून नाना फडणिसास )

( ता. १-७-१७९२ )

...पेशियास, पत्र पाहतांच रोमांच उभे राहून अति संतोष जाला. याचा विस्तार पत्रीं किती लिहूं ! सीमा असे. यावरून ग्रंथांचे ग्रंथ मनांत आले. ते लिहिल्यानें बहुचकपणा दिसतो. दिसो, परंतु जें मनांत आलें त्यांतून किंचित् अमर्याद करून लिहितों. एक एक रकम मनांत आणून दीर्घ दृष्टीनें तोलून पाहिल्यास खरें आहे असेंच निघेल. तें काय ? तपशील:—अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतों हिंदूंचें स्थान—तुरकस्थान नव्हे—हे आपली हद्द पांडवांपासोन विक्रमाजितपावेतों त्यांनीं राखून उपभोग केला. त्यामागें राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचें प्राबल्य जालें. चकत्यांनीं हस्तनापूरचें पद घेतलें. शेवटीं आलमगीराचे कारकीर्दीस यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजया बसून, ओलें अन्न विकावें, सर्वांनीं घ्यावें हे नौबत गुजरली.

त्या दिवसांत कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते व धर्म राखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत धर्मसंरक्षण केलें. पुढें कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे जाले कीं, असें कधीं झालें नाहीं. अमुक ब्राह्मणांनीं राज्य केलें असें शास्त्रीं पुराणीं वर्णन नाहीं. परशुराम अवतारीं काय असेल तें असो त्या गोष्टी यांस शिंदे—होळकर दोन बाजू होऊन प्राप्त जाल्या. हल्लीं श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून व राजश्री पाटील बावांचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमेंकडून सर्व घरास आलें. परंतु जालें कसें ? प्राप्त जालें तेणेंकडून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असे, तरी मोठे मोठे तवारीखनामे आले असते. यवनाच्या जातींत तिळाइतकी चांगली गोष्ट जाल्यास गगनाबरोबर करून शोभवावी; आमचे हिंदूंत गगनाइतकी जाली असतां उच्चार न करावा हें चाल आहे. असो. अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरास आल्या. यांचें संरक्षण करणें परम कठिण ! दोस्त दुष्मन फार. यवनांचें मनांत कीं काफरशाही जाली हें बोलतात. लेकीन ज्यांनीं हिंदुस्थानांत शिरें उचललीं त्यांचीं शिरें पाटीलबावांनीं फोडिलीं. कोणाच्याही मनांत हें वहाडलें, तें शेवटास जाऊं नये, यास्तव नानास्वरूपें व युक्तीकडून नाश करावे ऐसे आहेत. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग घ्यावे हें पुढेंच आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे. झाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्य प्राप्त, इतकेंच नाहीं तर वेदशास्त्ररक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व हातीं लागणें, कीर्ति, यश यांचें नगारे वाजणें इतक्या गोष्टी आहेत. हें किमया संभाळणें हक्क आपला व पाटीलबावांचा ! यांत वेत्यास पडला कीं दोस्त दुष्मन मवजूद. संशय दूर जाले हें अति चांगलें ! अति चांगलें ! या उपरी हे जमाव व या फौजा लाहोराच्या मैदानांत असाव्या, त्यांचे मनसबे दौडावे, वेत्यास पडावे, तमाशे पहावे, असे जन जे आहेत ते उशापायथ्यास लागून आहेत. चैन नव्हते. आतां आपण लिहिल्यावरून स्वस्थ जालें. जितकें लिहिलें इतक्याचें उगेच मनन व्हावें. खरें कीं लटकें हें समजावें. हे विनंति.

—( ऐतिहासिक टिपण, भाग १, टिपण ११ )

★ क्र. ५७

## श्रीलक्ष्मीनारायणकल्याण नाटक

### नांदी

जय जलधिगंभीर । जय सुरुचिराकार ।
जय शमितअरिजाल । जय भक्तानुकूल ॥ १ ॥

**सूत्रधारवचन :—**

येणें रीती नांद्यारंभ करून लक्ष्मीनारायणकल्याण नाटक निर्विघ्नसिद्धि सर्वजनांस संतोष होयाकारणें इष्ट देवतांची प्रार्थना करितों पहा......येणें रीती प्रार्थना केली असतां आनंदेंकरून विघ्नराज नाट्यरंगनृत्य करीत येतो पहा...येणें रीती विघ्नेश्वर आल्यानंतर कथा ऐसी जे श्रीमन्नारायण जगदाधार निजसभास्थळास आनंदेंकरून येताति म्हणवून सभास्थांस सावध करावया-कारणें कंचुकीराय विनोदी येतो पहा—

॥ दरु ॥

पट्टे नाम धरी । अट्टाहास करी ।
काठी घेऊनि करीं । कंचुकी आला सभांतरीं ॥१॥

**सूत्रधार :**—तूं कोण रे ?
**कंचुकीराय विनोदी :**—तूं कोण रे ?
**सू.** :—आम्ही भागवत.
**कं** :—भाग्यवंत जाले तरी मंदिल कोठें ? चादर कोठें ? झगा कोठें ?
**सू.** :—अरे, भाग्यवंत नव्हे रे. आम्ही दशावतार.
**कं.** :—अरे, दश जाले तरी कोठें रे ?
**सू.** :—हेंगे तरुबुरु नट्टुमुट्टु हेंगे मृदंग.
**कं.** :—तरुबुरु नट्टुमुट्टु मीरु देंगु.
**सू.** :—अरे, आम्हांस पुसतोस कां ? तूं कोण ? तुझें नांव काय ? सांग,
**कं.** :—माझें नांव कंचुकीराय विनोदी.
**सू.** :—कशास आलास रे ?

कं.:—मी श्रीमन्नारायण जगदाधार सभेस येताति, सभा सिद्ध करावा-कारणें आलों.

सू.:—सभा सिद्ध काय करावी रे ?

कं.:—पाणी बांधावें, तोरण सिंपावें, केळीचे खांब घालावे.

सू.:—तसें नव्हे रे कंचुकी. तोरणें बांधावीं, पाणी सिंपावें, केळीचे खांब लावावें.

कं.:—अरे, तसेंच, तसेंच.

सू.:—अरे कंचुकी, तूं सांगितल्याप्रमाणें सभा सिद्ध केलीहे. तूं जाऊन, विष्णूस सांगून, बोलावून आणी.

कं.:—अवश्य, तसेंच करितों.

सू.:—येणें रीती कंचुकीराय विनोदी येऊन सभास्थांस सावध केल्यानंतर श्रीमद्विष्णु सकलजनांस दर्शन द्यावयास येतील पहा......

कटिवचन:—स्वामी, सभा सिद्ध केलाहे.

विष्णुवचन:—अरे कंचुकी, नृत्य पहावयाची वासना आहे. देवांगनांस बोलावून आणी.

कटिवचन:—स्वामी, आज्ञेप्रमाणें बोलावून आणितों.

सू.:—येणें रीती महाविष्णु सभेस आल्यानंतर सभारंजन कौतुकासाठीं अप्सरा नृत्य दाखवावयास येताति पहा.

विष्णु:—अरे कंचुकी, जेठयाचा तमाशा पहायाची वासना आहे. मल्ल पाचारुनि ये.

कं.:—अवश्य, तसेंचि करितों.

सू.:—येणें रीतीं विष्णूचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन मल्ल पाचारिले असतां आपापले पराक्रम दाखवावयास मल्ल येताति पहा. तदनंतर विष्णु-सभेस ब्रह्मा अकस्मात आला पाहा.

विष्णु:—कुमारा, चिरंजीव! निज उद्योग टाकून येथें यावयास कारण काय? साचिंतसें मुख दिसतें याचें कारण काय हें सांग.

ब्रह्मा:—सर्वजनांत अपचार एक निर्माण जाला हें आइकून न सोसवति. तुम्हांपासीं येऊन त्याचा परिहार करावा, म्हणोन आलों. अभय दिल्हया बोलेन.

विष्णु :—अवश्य. भिऊं नको. सांग.

ब्रह्मा :— ॥ दरु ॥

अभय मज दिल्हया। अंतस्थ सांगेन विष्णुदेवा।
मायेविण पुत्र मज म्हणताति जाण विष्णुदेवा।
यासि काय उपाय करावा म्यां विष्णुदेवा ॥ १ ॥
विनति आइक बरी, विवाहासिद्धि करी विष्णुदेवा।
आजि मन माझें स्वस्थ करीं, माझी माय दाखवा हरी,
विष्णुदेवा ॥ २ ॥

सू. :—येणें रीती विष्णु ब्रह्मासि बोलतो पहा.

॥ दरु ॥

उत्तम गोष्टी सांगितली त्वां चतुर्मुखा।
माझें उचितसें आलें मना चतुर्मुखा ॥
वयरूपगुणयुक्त असेल चतुर्मुखा।
अवश्य करीन मी तीसीं चतुर्मुखा ॥ १ ॥

ब्रह्मा :—अवश्य. तुम्ही संमत जालां तेच पुरें. तुम्ही जैसी इच्छितां तैसीच तुम्हां योग्य स्त्री, आम्हां योग्य माता, मी पाहून आलों आहे. तुम्ही पाहून मानल्या करा.

विष्णु :—त्वां पाहिलें असेल तें उचित उत्तम असेल. तथापि तूं पहा म्हणतोसि तरि अवश्य दाखीव चतुर्मुखा.

सू. :—येणें रीती लक्ष्मी देवी सखीसहवर्तमान उचितरम्य प्रदेशीं संतोषें येऊन बसली. तें पाहून ब्रह्मा विष्णूस दाखवितो, पहा.

ब्रह्मा :—स्वामी, म्यां सांगितली ते कन्या सखींमध्यें मदनसायकसी दिसते तेच लक्ष्मीनामांकित समुद्रराजकन्या ते हेच.

विष्णु :—त्वां पहिलें सांगितलें तेव्हांच म्यां म्हटलें, कीं त्वां पाहिलें असेल तें उचित उत्तम असेल. तथापि आता पाहतां त्वां सांगितलें यापेक्षांहि यौवन-रूपगुणाधिक हें स्त्रीरत्न आहे.

सू. :—येणें रीती लक्ष्मीस पाहून, वर्णून, विष्णु विरहाभित पहा.

॥ दरु ॥

माझ्यानें न राहवे येक क्षण ॥
हरिलें सतीनें माझें मन ॥
तुझे यत्नेंकरून लवकरि करीं हें संघट्टन ॥

ब्रह्मा :—ऐका स्वामी, काशास इतकी चिंता करितां ? तुम्हांस मानल्या लग्नसिद्दि होयसा मी जाऊन यत्न करितों.

विष्णु : —अवश्य, याहून काय पाहिजे ? विलंब न करितां बोलिल्याप्रमाणें शीघ्र जाऊन कार्यसिद्धि करून ये.

सू.:—येणें रीती विष्णूची आज्ञा घेऊन ब्रह्मा कन्येसि बोलायास येतो. येणें रीती ब्रह्मा लक्ष्मीपासीं गेल्यानंतर विष्णूचा विवाह होतो म्हणून वडे, पोळया, घारिगे यथेष्ट मिळेल म्हणून ब्राह्मण येतो पहा —

॥ दरु ॥

पट्टेवर्धन लाऊन । पंचांग घेऊन ॥
काठी टेकीत । बोचरा काशीभट्ट आला ॥

सू. :— येणें रीती आपला भर्ता अगोधर येऊन वडे, पोळया यथेष्ट खाईल म्हणोन म्हातारी सवाष्णी येते पहा—

॥ दरु ॥

वांकडे बोचरे दांत वांकून चालते ते काठी हातां ।
खोल बोलें बोलते ।

सखी :—समुद्रराजकन्ये, त्रैलोक्यपितामहा कधीं येणार नव्हे. तो आजि इकडे येतो. काय आश्चर्य आहे नकळे. उठा, यास सामोरे चला. नमस्कार करूं.

सू. :— येणें रीती सखीजन आइकून, ब्रह्मयास सामोरी जाऊन. लक्ष्मीदेवी नमस्कार करून बोलली पहा.

लक्ष्मी : —वंदितें तुझे पाय लोकपितामहा !

ब्रह्मा :—वंदन म्हणिजे काय ? तूं माझी माय.

लक्ष्मी :—आश्चर्य हें ! काय न कळे आम्हां !

ब्रह्मा :—आश्चर्य नव्हे, माय.

लक्ष्मी :—तुझा कोण पिता, कोठें आहे, तूं मज सांग.

ब्रह्मा :—कोण म्हणजे विष्णु.

लक्ष्मी :—हें कौतुक पहा.

ब्रह्मा :— कौतुक कैचें !

लक्ष्मी :—येथें याया हेतु काय हें सांग आम्हां.

ब्रह्मा :—येथें याया हेतु हा, माय. तूं आमुची माय. सांगसी निश्चो काय ?

सू. :—येणें रीती ब्रह्मयानें विष्णूस लक्ष्मीतें दाखविलें, तें पाहून लज्जा-नम्रमुखी होऊन उभी राहते. तें पाहून ब्रह्मा बोलता जाला.

ब्रह्मा :—कां लाजिल्यात ? तुमच्या अंत:करणींचा हेतु काय असेल तो सांगा. तसेंच करितों.

लक्ष्मी :—हें आम्हांस कशास सांगतां ? आम्ही कन्या पित्याअधीन. जें बोलणें तें त्यासि बोला. त्यांच्या चित्तास येईल त्यास देतील.

ब्रह्मा :—अवश्य. हें वर्तमान विष्णूस सांगून, त्यांचे आज्ञेनें समुद्रराजास बोलावून, त्यास या कार्यास अनुकूल करून घेऊन येतों.

लक्ष्मी :—अवश्य, तसेंच करा.

सू. :—येणें रीती ब्रह्मा लक्ष्मीची आज्ञा घेऊन विष्णुसमीप गेल्यानंतर कथा ऐसी जे. ब्रह्मा येऊन लक्ष्मीचा सील वृत्तांत सर्वहि विष्णुपासीं सांगता जाला.

विष्णु :—आइक ब्रह्मा. तूं गेल्याचें कार्य काय करून आलास तें सांग.

ब्रह्मा :—स्वामी, गेल्या कार्याची अनुकूलता करून आलों. परंतु त्यांनीं आपलें पित्याची आज्ञा पाहिजे ऐसें म्हटलें आहे. हें वृत्त तुम्हांस सांगून तुमचे आज्ञेनें समुद्रराजास येथेंच बोलावून, त्यास या कार्यास अनुकूल करून लग्नसिद्धि करावी म्हणून आलों.

विष्णु :—अवश्य, तसेंच करा.

ब्रह्मा :—अरे कंचुकी, समुद्रराजासि जाऊन विष्णूनें ब्रह्मानें कार्यानिमित्त तुम्हांस बोलाविलें म्हणून शीघ्र जाऊन बोलावून आणी,

**सू.** :—येणें रीती ब्रह्मयाच्या आज्ञेवरून कंचुकी जाऊन समुद्रराजास बोलाविलें. संतोषेंकरून समुद्रराजा विष्णुदर्शनास येतो.

**समुद्र** :— देवदेवोत्तमा, स्वामी मज बोलाविलें. आज्ञेप्रमाणें मी आलों जें आज्ञा करणें असेल तें करा.

**विष्णु** :—आइक. समुद्रराजा. सर्वहि ब्रह्मयास सांगितलें आहे. तो सांगेल तशी वर्तणूक करा.

**ब्रह्मा** :— समुद्रराजा, स्वामीस काय पुसतां ? सर्वहि स्वामीची आज्ञा मी सांगतों तुमची कन्या लक्ष्मीदेवी तिचा पाणिग्रहणाचा स्वामीनें अंगीकार केला आहे. त्यास तुम्ही संमत होऊन लग्नसिद्धि महोत्सवाचा अंगीकार करा.

॥ दरु ॥

**समुद्र** :—

ऐकिलें तुमचें वचन । ऐसें गोड अमृताहून ।
काय वर्णूं याचे गुण । धन्य जालों ॥ १ ॥

**ब्रह्मा** :—समुद्रराजा, तुम्हांस उचित तें तुम्ही बोलला तें ऐकून आम्हांस संतोष अपार जाला. सकल देवतांस, ऋषींस बोलावून येथेंच लग्नसिद्धि महोत्सव आता सुमुहूर्तीं करा.

**समुद्र** :—अवश्य, तसेंच करा.

**ब्रह्मा** :—कंचुकी, विष्णूच्या विवाहानिमित्त ब्रह्मयानें पाचारिलें म्हणून बृहस्पतीस बोलावून आणी.

**कंचुकी** :—स्वामी, बरें.

**सूत्रधार** :—येणें रीती विष्णूच्या विवाहानिमित्त ब्रह्मयानें पाचारिलें असता सानंदें येतो पहा.

**ब्रह्मा** :—बृहस्पति, यावें. अरे कंचुकी, नारायणस्वामीचा विवाह होतो कीं. सकल सामग्री सिद्ध करायास अनामधेय बाष्कळपंतास बोलावून आणी.

**कंचुकी** :—स्वामी, बरें.

**ब्रह्मा** :—बृहस्पति, मी जाऊन सकल देवतांस, ऋषींस बोलावून येतों. काद्याभट्ट, तुम्ही गणितार्थ पहात असा.

**बृहस्पति** :— बरें,

**सूत्रधार**:—येणें रीती, विष्णूच्या विवाहानिमित्त सकल सामग्री करावयाला अनामधेय बाष्कळपंत येतो पहा.

॥ दरु ॥

**पंत येताति पहा। बाष्कळपंत येताति पहा।**
**पोळ्या खाउनि सोळा। पोटावरि हात फिरवित आला।**
**काळे मैशीचा टिळा। कपाळीं मुद्रा लाविलेला।**
**कानीं लेखणी खोवून। कागद हातीं घेऊन।**
**कानभर कुडक्या घालून। कार्यास आला आपून।**

**ब्रह्मा**:—समुद्राराजा, सकलदेव, ऋषीश्वर आले कीं. कन्येस बोलाऊं आणा, म्हणा.

**समुद्र**:—कंचुकी, या शृंगारवनीं पाहिलें. तें रम्य प्रदेशीं सखीसहवर्तमान कन्या मणिक्रीडा करीत होती. सखीस सांगोन कन्येस बोलाऊन आणा.

**कंचु** :—अवश्य. आज्ञेप्रमाणें तसें करितों.

**सू.**:—येणें रीती समुद्रराजाचें आज्ञेवरून कंचुकी जाऊन, सखीस सांगून कन्येसी बोलाविलें असतां, लक्ष्मीदेवी संतोषें करून पित्यासमीप येते पहा. येणें रीती लक्ष्मीदेवी आल्यानंतर सकलदेव, ऋषीश्वर लक्ष्मीनारायणास विवाह करिताति पहा—

॥ **मंगलाष्टकें** ॥

येणें रीती लक्ष्मीचें पाणिग्रहण नारायणानें केलें. तें पाहून सकल देव, ऋषीश्वर, नारद, किन्नर, किंपुरुष मंगलें गातीं ऐसीं—

॥ **जयमंगलं शुभ मंगलं** ॥

---

क्र. १

## श्रवणबेळगोळ-शिलालेख

हा आद्य मराठी शिलालेख म्हैसूर प्रांतातील श्रवणबेळगोळा या गांवाजवळील दोड्डबेट्ट किंवा इंद्रगिरी नांवाच्या टेकडीवरील गोमतेश्वराच्या पुतळ्याच्या पायथ्याशी खोदलेला आहे. ५७ फूट उंचीचा हा अति प्रचंड व अखंड पुतळा आज हजार वर्षे सर्वांचें शांतमुखानें अहोरात्र स्वागत करीत आहे. या पुतळ्याच्या पायाशी देवनागरी लिपीत खोदलेली ही दोन मराठी वाक्ये असून त्यावरून या शिल्पाचा रचनाकाल ठरवितां येतो. पैकी पहिल्या वाक्यात कर्नाटकातील सुप्रसिद्ध गंग घराण्यांतील राजा राजमल्ल याचा प्रधान चामुंडराय यानें हे शिल्प करविल्याचा उल्लेख असून इतिहासावरून त्याचा काळ शके ९०५ च्या आसपास ठरतो. दुसऱ्या वाक्यात प्रख्यात राजा विष्णुवर्धन याचा प्रधान गंगराज यानें गोमतेश्वराच्या पुतळ्याभोंवतीं 'सुत्ताले' म्हणजे तट घातल्याचा उल्लेख असून हें काम शके १०३९ च्या सुमारचें असावे. म्हणजे पहिल्या वाक्यानंतर दुसरे वाक्य चांगले सव्वाशें वर्षांनंतर खोदले गेले आहे. या दोन वाक्यात भाषादृष्ट्याहि कांहीं फरक दिसतात. पहिल्यात 'जे' आणि 'ले' यांवर अनुस्वार आहेत तर दुसऱ्यांत ते नाहींत. तसेच चामुंडरायाच्या लेखांतील अनुस्वार भरीव तर गंगराजाच्या लेखांतील 'ग' वरील अनुस्वार पोकळ आहे. दोन 'श्री' कारांतील वळणेहि भिन्न दिसतात. तात्पर्य, हीं दोन वाक्ये समकालीन नाहीत हें निश्चित. संशोधक राइस याचें मत निराळे असलें तरी या लेखाची भाषा मराठीच आहे यात वाद नाही. लेखाचा आकार पुतळ्याच्या भव्यतेला साजेसा असून पहिली 'श्री' उंचीत सुमारें १॥ फूट भरावी. या लेखाचें वाचन आणि मनन आजवर राइस (इन्स्क्रिप्शन्स ऑफ् श्रवणबेळगोळा, क्र. ९), डॉ. हुल्ट्झ् (एपिग्राफिआ इंडिका, खं. ७, भा ३, क्र. १४), रा. ब. नरसिंहाचार (एपिग्राफिआ कर्नाटिका, व्हॉ. २) आणि प्रो. द. वा. पोतदार (म. सा. पत्रिका वर्ष १५, अं. ३) या चार विद्वानांनीं केलें आहे.

क्र. २

## पाटण-शिलालेख

प्रस्तुत शिलालेखात पाटण येथील हेमाडिदेव नांवाच्या निकुंभ राजानें प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य याचा नातू चागदेव याच्या मठाच्या योग-क्षेमासाठी काही उत्पन्न करून दिल्याचा उल्लेख आहे. लेखाच्या एकूण ओळी ३६ असून पैकी शेवटच्या ५–६ ओळी मराठी भाषेंत आहेत. या शिलालेखाचें वाचन आजवर डॉ. भाऊ दाजी, बर्जेस् व फ्लीट, किल्हॉर्न व राजवाडे यानीं केलें आहे. या शिलालेखाचा अर्थ ल. रा. पांगारकर यानीं राजवाडे यांच्या विवेचनाच्या आधारे लावण्याचा प्रयत्न केला आहे. ( पहा–म वा. इतिहास, खं. १, पृ. ३५७ )

**नग**––लेखांतील पाचव्या ओळीतील हा शद्व किल्हॉर्नच्या मतें 'नगरें' तर राजवाड्याच्या मतें 'मगरे' असा आहे. किल्हॉर्नचा पाठ अर्थदृष्टचा अधिक संयुक्तिक वाटतो.

**मढ**––स० मठ. हा शद्व त्याच लेखांत एकदा संस्कृत तर एकदां प्राकृत रूपात येतो हें पाहण्यासारखें आहे.

क्र. ३

## तासगांव-ताम्रपट

प्रस्तुत ताम्रपटाचे एकूण चार पत्रे संशोधक ग. ह. खरे यांना मिळाले. ताम्रपटाच्या एकूण ओळी १०६ असून त्यांपैकीं ८२ ते ९७ एवढ्या मराठी भाषेंत आहेत. इतर सर्व लेख संस्कृतांत आहे. पृष्ठमात्रेचा उपयोग सरसहा केलेला असून कोरक्या अडाणी दिसतो. कारण लेखांत अशुद्धें फार आहेत. कालोल्लेख स्पष्ट नाही. पण ताम्रपट यादव कृष्ण किंवा कन्हरदेव याच्या राजवटींतील म्हणजे इ. स. १२५० च्या आसपासचा असावा. हें शासन लिहिणारा कोणी म्हाइंदेव या नांवाचा षड्भाषाचक्रवर्ती कवि होता. लेखांतील मराठी भागांत यादवांचा मांडलीक चंद्र व त्याचा भाऊ केशव या दोघांनीं मोठया भक्तीनें कलिदेव नांवाचें शिवालय बांधल्याचा व त्या देवाच्या

अष्टांगभोगासाठीं मंजरवाटक गांवाचा अर्धा भाग व २५ ब्राह्मणाच्या भोजना-साठीं अर्धा भाग अग्रहार करून दिल्याचा उल्लेख आहे. लेखांत मंजरबाडें, गोवरु, वालगवाड, हृदिनौर व पेढ अशा पांच गावाचा निर्देश आहे. हीं सर्व गांवें सातारा जिल्ह्यांतील तासगांवच्या आसपास असून त्यांचीं आजची नांवें अनुक्रमें माजर्डे, गोवरगांव किंवा घोगाव, बलगवडें, हतनूर व पेड अशी आहेत.

**स्थानापर्ती–स्थल**–सं. स्थान–स्थल

**क्र. ४**

## पंढरपूर–शिलालेख

चौऱ्यांयशीचा शिलालेख या नावानें ओळखलें जाणारे हें खोदकाम शके ११९५ पासून ९९ पर्यंत म्हणजे चार वर्षे चालू होतें. शके ११९५ मध्यें पंढरपूरच्या विठ्ठलमंदिराचा जीर्णोद्धार झाला त्या प्रसंगीं प्रस्तुत लेख खोदला गेला. लेखांत विठ्ठलदेवाच्या योगक्षेमासाठी ज्यांनी पैका दिला त्यांची नावें त्यांच्या देणग्यांसह कालानुक्रमानें व रकानेवारीनें आलीं आहेत. सबंध शिलेचे एकूण रकाने आठ असून त्यात अनेक यादवकालीन नांवें आढळतात. लेख फार लांब व यादीवजा असल्यानें त्यापैकी तीनच ओळी प्रस्तुत उताऱ्यांत घेतल्या आहेत. पैकी पहिली ओळ प्रास्ताविक असून दुसरीत हेमाडपंताच्या व तिसरीत प्रत्यक्ष रामदेवराव यादवाच्या देणग्याचा तपशील आहे. उतारा इतिहासदृष्टचा व भाषादृष्टचा अति महत्वाचा आहे. या लेखास चौऱ्यां-यशीचा शिलालेख असें म्हणतात. याचीं कारणें दोनतीन आहेत एक तर या शिळेवर पाठ घासली असतां जीव चौऱ्यांयशीच्या फेऱ्यांतून मुक्त होतो. ही कल्पना. दुसरें कारण असें, कीं लेखारंभींचा शकांक ११९५ असा आहे, तो अनभ्यस्तास ११८४ असा वाटतो. तिसरें कारण हें, कीं या शिळेवर प्रथम ८४ देणगीदारांचीं नांवें खोदलीं गेलीं, म्हणून त्यास चौऱ्यांयशीची शिळा असें नांव पडलें. यांपैकीं कोणतें कारण खरें तें एक शिळाच जाणें! लाखों भाविक वारकऱ्यांची पाठ लागल्यानें शिलालेख अस्पष्ट होत चालला आहे, एवढें मात्र खरें.

प्रस्तुत लेख प्रथम डॉ. भगवानलाल इंद्रजीनें वाचून त्याचें वर्णन सोलापूर गॅझेटियरमध्यें दिले होतें. पुढें इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी 'ग्रंथमाले' त त्याचें सटीप विवेचन केले असून तें सर्वच अभ्यासनीय आहे.

**फागनिपुर**–राजवाड्याच्या मतें सं. फाल्गुनिपुर या शब्दाचा हा अपभ्रंश असून पंढरपूरचे हे दुसरें नांव असावें. पांगारकर 'फाल्गुनी पौर्णिमा असा अर्थ सुचवितात. (म. वा. इतिहास खं. १ पृ. ३३५)

**तिसासिती**–तीस शते (?)

**सोडवीकार हेमाडी**–सोडवी नांवाच्या गांवचा हेमाद्रि पंडित (रामदेवराव यादवाचा करणाधिप)

**ग**–'गद्यान' याचें संक्षिप्त रूप. गद्यान हे एक तत्कालीन सोन्याचें नाणें असून त्याची किमत साधारण १५ रु होती.

**पांढरीफडमुख्य**–ग्रामसस्थेचा अधिकारी ( पांढर = ग्रामसंस्था, गांवठाण ). किवा पढरीतील ( वारकरी ) फडाचा मुख्य.

**द**–सं. दत्तम् याचें संक्षिप्त रूप.

**भक्तिमालिआं**–(सं.) भक्तिमालिका याची तृतीया.

**वृषे**-सोमवारी.

**वदि, सुदि**–वद्य, शुद्ध.

**क्र. ५**

## वेळापूर–शिलालेख

पंढरपूरच्या पश्चिमेस १०–१२ कोसावर पुणें–सोलापूर रस्त्यावरील वेळापूर या गावी सशोधक ग. ह. खरे यांना जे चार शिलालेख मिळाले त्यांपैकी हा एक आहे. प्रस्तुत लेख एका खडबडीत दगडावर कोरलेला असून त्याची उंची ४ फूट व रूदी १ फूट आहे शिलेवर साब व चंद्रसूर्य यांच्या आकृतिहि आहेत. लेखाच्या एकूण ओळी १४ असून प्रत्येक ओळींत १० ते १५ अक्षरें आहेत. लेखांत पृष्ठमात्रा नाही. लिपी देवनागरी व भाषा संस्कृतप्रचुर मराठी आहे. लेखनकाल शके १२२२ असा आहे. लेखांत रामदेवराव यादव, त्याचा

सर्वाधिकारी श्रीजोइदेव, त्याच्या हाताखालील ब्रम्हदेत्रराणा व त्याचा भाऊ बाइदेव याचे उल्लेख असून शिवाय बाइदेवानें वटेश्वर देवाला मठ करून ओवरी दिल्याचें सांगितलें आहे.

**मठअ** –( सं. ) मठस्य (?).... षष्टीचें प्राचीन रूप.

**लेषक**–सं लेखक.

क्र. ६

## श्रीकृष्ण–चरित्र

वि. ल. भावे ( महाराष्ट्र–सारस्वत, भाग १ पृ. ९२ ), य. खु. देशपांडे ( महानुभावांचे चरित्रग्रंथ, भा. इ. सं. म. त्रै. वर्ष १३, अंक २ ), आणि वा. ना. देशपांडे ( विविधज्ञानविस्तार, ऑक्टोबर १९२८ ) या तिघांच्या मतें प्रस्तुत श्रीकृष्ण–चरित्राचा लेखक कवीश्वर भास्करभट्ट हा होय. प्रो. कोलते याच्या मते या चरित्र ग्रंथाचें कर्तृत्व म्हाइंभटाकडे जातें किंवा जावें. ( भास्करभट्ट बोरीकर, पृ. ५५–५८ ) प्रो. कोलते याचें म्हणणें अधिक संयुक्तिक दिसतें. कारण एक तर 'वृद्धाचार' किंवा 'वृद्धान्वय' यापैकीं एकाहि ग्रंथातील जंत्रीत भास्कराच्या नावावर प्रस्तुत चरित्रग्रंथाचा उल्लेख नाहीं. दुसरे म्हणजे अशा प्रकारचे सर्वच गद्य चरित्रग्रंथ म्हाइंभटानें लिहिल्याचा पुरावा उपलब्ध आहे. चक्रधराच्या प्रयाणानंतर नागदेवाचार्य हें नेहमीं कशाचें तरी चिंतन करण्यात मग्न असलेले पाहून म्हाइंभटानें एक दिवस त्यांना विचारले, "हा भटो : तुम्ही निरंतर काइसयाचें मनन करीत असां ?" यावर आपण संप्रदायांतील पंचकृष्णांच्या लीला आठवीत असतों अशा अर्थाचें उत्तर नागदेवाचार्यांनी दिल्याचें प्रसिद्ध आहे. याच सर्व लीला म्हाइंभटाने आपल्या चरित्रग्रंथांतून संग्रहित केल्या आहेत. त्यांतील द्वापरीचिया लीळांना 'श्रीकृष्ण–चरित्र' असें नांव असून विरुद्ध पुराव्याच्या अभावीं या गद्य ग्रंथाचा लेखक म्हाइंभटच दिसतो. प्रश्न विवाद्य आहे एवढें मात्र निश्चित.

प्रस्तुत उतारा कृष्णचरित्रांतील शिशुपालवधाच्या प्रसंगींचा आहे.

पृ. ८ **महाछाअँनसीं**—सं० महोत्सव याच्या अपभ्रष्ट रूपाची अपभ्रष्ट तृतीया.

पृ. ८ **वाणवेन्ही**--बाणांनी. ('वेन्ही' या शद्बयोगी अव्ययाचा तृतीयेसाठी उपयोग.)

**क्र. ७-८**

## लीळाचरित्र व गोविंदप्रभुचरित्र

ही दोन प्रकरणे आद्य मराठी चरित्रकार महिंद्रभट्ट किंवा म्हाइंभट यांच्या हातची आहेत. म्हाइंभट हा मूळचा नगर प्रांतांतील साराळें या गांवचा एक गर्भश्रीमंत ब्राम्हण. गणपति आपयो नावाच्या विद्यागुरूपाशी पूर्वाध्ययन करून पुढील शास्त्राभ्यासासाठी तो तेलंगणांतील विद्यानगरीला गेला. तेथून पूर्ण होऊन आल्यावर स्वतःच्या विद्वत्तेचा त्याला असा कांही गर्व चढला, कीं आपण इतराना कसें तृणवत् लेखतों याचें गमक म्हणून तो आपल्या पायांत गवताची वांकी घालीत असें. पुढें गणपति आपयोच्या सूचनेवरून त्याने डोमेग्रामी श्री चक्रधरांची भेट घेतली व तेव्हापासून त्याची वृत्ति एकदम पालटली. तो देहाने स्वगृहीं परतला, पण त्याचें मन मात्र चक्रधरांपाशी राहिलें. ही वैराग्योर्मि असह्य होऊन पुढे लौकरच म्हइंभट सरळ रिधपुराला आला व गोविदप्रभूस अनुसरला. या प्रसंगाचे बहारीचें वर्णन त्याने स्वत: आपल्या 'गोविदप्रभुचरित्रां' त (क्र ९७) केलें आहे. श्रीमंतीत वाढलेल्या म्हाइंभटाला चक्रधराच्या आश्रमांतील कदान्न प्रथम गेलें नाही; पण अंगाच्या निर्धारानें लौकरच त्याने तें अंगवळणीं पाडलें. स्वतःची संपत्ति त्यानें गुरुसेवेकडे लावली व रिधपूर येथील राजमठाभोंवतालचा परिसर खरीदून त्यावर 'तांबेयाचें पत्र' केले मात्र अजूनही त्याच्या चित्तांत सूक्ष्म अहंकार होताच. नागदेवाचार्यास तो तुच्छतेने 'सुठदेव' म्हणे व स्वतःस मात्र 'योगभ्रष्ट' म्हणवी. परंतु एकदां नागदेवाचार्याच्या तोंडून "योगभ्रष्ट तव माझिये दयेचा नव्हे, मा तुमचिये दशेचा काइ होइल?" अशी स्पष्टोक्ति ऐकून तो मनांत वरमला. म्हाइंभटाबरोबर त्याची बायको देमाइसा हीहि मानभाव पंथांत आली. पण तिची वागणूक बरी नसावी असें वाटतें (गो. चरित्र, १९७-८). स्वतः

इंभट मात्र गुरुकुलाशीं आमरण एकनिष्ठ राहिला. तो सदा गोविंदप्रभूंच्या
रपास असावयाचा. "म्हाइंभटातें श्रीप्रभुदास्यावेगळे जो दाखवी तयासी
महावाक्य वाखाणीन" ( स्मृतिस्थळ, २४७ ) अशी होड भटोबासांनी
ली होती ती उगीच नव्हे "तुम्ही माझेया चक्रस्वामीचिया धुरा"
आउसेनें म्हाइंभटाविषयी व्यक्त केलेला अभिप्राय अनेक दृष्टीनी सार्थ
े (स्मृ. १९७) असो. चक्रधर आणि गोविदप्रभु यांच्या चरित्ररचनेचें
ं सपविल्यानंतर "माझे कांही वोखटें निघावे" अशी विनवणी
ोबासाना करून म्हाइंभटानी देह ठेविला. (स्मृ. १९८). म्हणजे त्यांचा
ुकाळ इ. स. १३०० च्या आसपास येतो.

म्हाइभटाचें नांव मुख्यत. चरित्रकार म्हणून ऐकू येतें. 'लीळाचरित्र' व
ोविदप्रभुचरित्र' हे त्याचे दोन प्रमुख ग्रंथ होत. याशिवाय महदंबाकृत
वळचां' तील उत्तरार्धात त्याचा कांही भाग असणें शक्य आहे ( स्मृ.
४) म्हाइंभटाच्या नांवावर कांही गोड आरत्याहि आढळतात. 'श्रीकृष्ण
त्रा' चा कर्ताहि प्रो. कोलत्यांच्या मते तोच ठरतो. असो. म्हाइंभट हा
ाठी भाषेंतील आद्य चरित्रकार असून या कामी त्याने विशेष परिश्रम
लेले दिसतात. 'लीळा–चरित्र' रचतांना चक्रधरांच्या आठवणी जेथें
ून मिळणें शक्य होते ती सर्व ठिकाणे त्यानें धाडोळल्याचा निर्वाळ 'स्मृति-
ळ' कार देतात (स्मृ. १४०). पंथीयांपाशी एकेक आठवणीची भीक
ून म्हाइंभटानें हा लीलासंग्रह सिद्ध केला व पुढें त्यावर नागदेवाचार्यांचा
ा एकवार फिरल्यावर तो पूर्ण दशेस आला. आठवणी गोळा करणें, त्या
ाडणें, त्यांतील खऱ्याखोटयाची पारख करणे, त्या एका सूत्रांत ओवणे
ादि अनेक संस्कारांनी युक्त असा हा ग्रंथोद्योग कौतुकास्पद आहे. स्मृति–
लनकार या दृष्टीनें म्हाइंभट श्रेष्ठ ठरतो.

'लीळाचरित्रा' ची रचना चक्रधरांच्या प्रयाणानंतर म्हणजे इ. स. १२७६
ा सुमारास झाली असावी. 'लीळाचरित्रा' चे एकूण तीन भाग असून
ना अनुक्रमें एकाक, पूर्वार्ध व उत्तरार्ध अशी नावें आहेत. 'गोविंदप्रभु-
त्र' किंवा 'ऋद्धिपूरचरित्र' हा दुसरा ग्रंथ गोविंदप्रभूंच्या पश्चात्
ाजे इ स. १२८८ च्या सुमारास निर्माण झाला.

## लीळाचरित्र

( १ ) चक्रधराचें पूर्वचरित्र सांगणारी ही आठवण महत्त्वाची आहे. चक्रधराचें मूळचें नांव हरपाळदेव. गुजराथेंतील भडोचचा राजा मल्लदेव याचा प्रधान जो विशाळदेव त्याचा हरपाळ हा पुत्र. देवगिरीकर यादवराजा सिंघण यानें केलेल्या गुजराथवरील चढाईच्या प्रसंगी हरपाळदेव यानें प्रत्यक्ष लढाईंत भागहि घेतला होता. यानंतर लौकरच हरपाळ वारला. पण त्याच्या मृत देहात महानुभावीय पंचकृष्णांपैकी तृतीयावतार जे द्वारावतीकार चक्रपाणि चागदेव त्यानी प्रवेश केल्यामुळे तो पुनः जिवंत झाला. यानंतर रामटेकच्या यात्रेस निघण्यापूर्वी जो अल्पसा काळ हरपाळानें प्रपंचांत काढला त्या काळांतील ही आठवण आहे.

**गोसावी, सर्वज्ञ**-श्रीचक्रधर

**गोपाळण्ही आण**--गोपाळकृष्णाची शपथ. हरपाळाने ( म्हणजच चक्रधरानें ) पुनः सजीव झाल्यानंतर गोपाळमंत्राची दीक्षा घेतली होती व त्यामुळे तो नेहमी गोपाळाची आण म्हणजे शपथ घेई, (लीलाचरित्र, एकांक, ५ ). मराठींत जसा 'च' तसा गुजराथीत षष्ठीचा प्रत्यय 'न–ण' आहे. त्यामुळें 'गोपाळण्ही' असें गुजराथीतील षष्ठीचें रूप चक्रधराच्या तोडीं येतें. तें चिंतनीय आहे.

**कमळाइसा**-हरपाळदेवाची बायको.

( २ ) रामटेकच्या यात्रेचें निमित्त करून हरपाळानें म्ह. चक्रधरानें घर सोडले व ऋद्धिपुरास येऊन श्रीगोविंदप्रभूकडून ज्ञानशक्तीचा स्वीकार केला, ती हकीगत प्रस्तुत लीलेंत आहे.

**गगनाची वास पाति**-वर आकाशाकडे पहात.

( ३ ) **अवस्था स्वीकारिली**--वैराग्य धारण केलें.

(४) **स्त्रिया पुरुषाचा...देहत्यागु केला**—भक्ताचें चक्रधरप्रेम पाहून ब्राह्मणास आश्चर्य वाटलें व त्याची निष्ठा पाहण्यासाठीं म्हणून त्यानें चक्रधर सर्पदंशानें वारले असें त्या भक्तास त्रिवार खोटेंच सांगितलें. हें एकतांच भक्ताचा निष्प्राण देह खालीं कोसळला.

**मासा पाखा** — महिना-पंधरा दिवस.

( ५ ) **आम्हीं देऊनि, बांधौनि, दोहौनि**—आम्ही देऊं, बांधू, दोहूं. ( भविष्ये प्र. पु. अ. व. )

**श्रीमूर्ति** —श्रीचक्रधराची मूर्ति.

## गोविंदप्रभुचरित्र

गुडम राउळ या नांवानें ओळखले जाणारे गोविंदप्रभु हे महानुभाव पथाचा संस्थापक जो चक्रश्वर त्याचे गुरु. गोविंद प्रभूचें बहुतेक सर्व आयुष्य वऱ्हाडांतील रिधपूर या गावीं गेले व तेथेच त्यांनी शके १२०७ मध्ये देह ठेवला. गोविद प्रभु कृष्णभक्त असून त्याची वृत्ति बालोन्मत्तपिशाचवत् होती, व तीच प्रस्तुत स्मृतीत व्यक्त झाली आहे.

( १ ) **आवो मेला जाये**--गोविंद प्रभूच्या तोंडातील एक आवडीची शिवी.

**महाजनापासि न्यावो सांघावेया**--गांवातील शिष्ट जनांकडून न्यायनिवाडा करून घेण्यासाठी.

**राउळ**-श्री गोविदप्रभु.

( २ ) **वेढे करीत**-फेऱ्या मारीत, येरझारा करीत.

**भावैची चतुर्दशी**-ज्येष्ठ व. १४

**साष्टांग दंडवत घातलें**- याचें कारण एक स्मृतिकार देतात, कीं मज देव दाखविला म्हणौनि तयासि साष्टाग नमस्कार घातले.'

( ३ ) **कोपु नटले**-रागाचा अविर्भाव केला.

**संदी पडली**-सवड किंवा संधि सापडली.

( ४ ) कृष्ण भक्त गोविंद प्रभूस एकदां रुक्मिणी-स्वयवराचा प्रसग प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा झाली त्यासबधीची ही स्मृति आहे. स्वतः गोविद प्रभु कृष्ण झाले, ईश्वरनायक नावाच्या भक्तानें त्यास आपली कन्या देऊं केली व महादायिसेनें स्वतःकडे करवलीची भूमिका घेऊन 'धवळे' गायिले. अर्थात् हें सर्व नाटक होतें. या प्रसंगी गोविद प्रभूच्या सागण्यावरून

महदायिसेने जें रुक्मिणी-स्वयंवर विषयक काव्य रचिले तेच 'धवळे' या नांवानें प्रसिद्ध आहे.

**धवळे**--सं. 'धव' + ल. विवाहप्रसंगीं गावयाचें वरविषयक गीत. हा शब्द एकनाथाच्या 'रुक्मिणी-स्वयंवरा' तहि येतो (' सभा बैसली निजबोधें। धवळे गाती आनंदें ॥ ' रु. १६।४६)

**नीरुता लागला जीवीं**—

' नावडे त्यागभोगु सकळै वीखो तिया त्यजिले रुक्मिणी ।
लागला नीरुता जीवी योगिया वल्लभु श्रीचक्रपाणी ॥ '
—(धवळे, पूर्वार्ध, ३१)

(५) मूळ उताऱ्याचा मथळा छापण्यात चूक झाली असून स्मृतीतील लेक ही चक्रधराची नसून ती गोविंदप्रभूची लेक आहे.

**रिधौरें**- ऋद्धिपूर (रिधपूर).

**ईश्वराचें पुर तें कर्पूरवत**--कापूर उडून जावा त्याप्रमाणे गोविंदप्रभूचा देह वास्तविक स्वरूपाकार होऊन गेला होता.

**क्र. ९**

**स्मृतिस्थळ**

' स्मृतिस्थळ ' हा लीळाचरित्राच्या तोडीचा असा चरित्रग्रंथ आहे. त्यांत महानुभाव पंथाचा आद्य प्रचारक नागदेवाचार्य याचें चरित्र आठवणींच्या रूपाने आलेले असून शिवाय आघाडीच्या मानभाव ग्रंथकारांची माहिती करून देणारा संदर्भग्रंथ म्हणूनहि त्याचें महत्व आहे. 'स्मृतिस्थळा' चे संपादक वा. ना. देशपांडे यांच्या मते ' स्मृतिस्थळा' चा लेखक कोणी एक असा नसून अनेकाच्या पाठाचें हे संकलन आहे तरी पण नरेंद्र व परशराम हे मूळ लेखक किंवा स्मृतिकार, आणि मालोबास व गुर्जर शिवबास हे संस्करणकार असावे असें मानण्यास आधार आहे. ' अन्वयस्थळ ' कार म्हणतात, ' नरेंद्रबासीं रुक्मिणीसैंवर केलें: आणि सातसें स्मृती जैसिया वर्तल्या तैस्याचि लिहिल्या: कवि मालोबास त्यांही पांचशे स्मृती: सवासें वृधाचार अन्वयी लाविली ": अर्थात्

या सर्व स्मृति आज कोणत्याच पाठांत उपलब्ध नाहीत. 'स्मृतिस्थळा'ची रचना नागदेवाचार्याच्या मृत्यूनंतर लौकरच झाली असल्यानें त्याचा रचनाकाल शके १२३० च्या आसपास ठरतो. स्वतः स्मृतिकार ग्रंथरचनेच्या कामांत कुशल दिसतात. पैकीं परशरामबास हा धर्मवार्ता करण्यांत निपुण असून त्याचें व्याख्यानचातुर्य पाहून आनोबासानें एका समयी "परशरामाचें बोलणें तें गगना गवसणी कीं" असे म्हटल्याचें प्रसिद्ध आहे. दुसरा स्मृतिकार नरेंद्र हा कवि म्हणून प्रसिद्धच आहे.

श्रीचक्रधर हा जसा 'लीळाचरित्रा'चा त्याप्रमाणें नागदेवाचार्य हा 'स्मृतिस्थळा'चा मुख्य विषय होय. नागदेव किंवा भटोबास हा महानुभाव पथाचा आद्याचार्य. स्वतः लेखक नसला तरी म्हाइंभट, बाइदेवबास, केसोबास इत्यादि थोर ग्रथकाराचा तो मार्गदर्शक होता. चक्रधरांच्या मागे त्याच्या लीला आणि विचार यांचा संग्रह करविण्याचें सर्व श्रेय नागदेवाचार्याकडे जातें. म्हणजे तो ग्रंथकारांचा ग्रथकार ठरतो. त्याच्या हयातीत पंथाचा प्रसारहि सपाटून झाला. चक्रधरानंतर एवढी मोठी व्यक्ति मानभावात दुसरी नाही. असो. नागदेवाचार्याचा मृत्युशक साप्रदायिकाच्या मते १२२४, वा. ना. देशपांड्याच्या मतें १२३१ व प्रो कोलत्यांच्या मते १२२८ असा आहे.

(१) **पंडितबास**–दामोदर पंडित ('वच्छहरण' कर्ता)

**पांचास्या गुरुकुळातें**–पंचमुखी गुरुकुल. (श्रीकृष्ण, दत्तात्रेयप्रभु, द्वारावतीकार चागदेव राउळ, गुडम राउळ आणि चक्रधर हे महानुभावाचे पच कृष्ण होत.)

**बाइसा**–नागाबिका.

**शकें १२२४**––नागदेवाच्या निधनशकाविषयीचें हें सांप्रदायिक मत अनैतिहासिक आहे. कारण शके १२३१ मध्यें रामदेवराव यादवाच्या निधनसमयी तो जिवंत होता असें 'स्मृतिस्थळ' सागतें (स्मृ. १४९).नागदेवाच्या तोंडीं 'मी वर्ते तंव मऱ्हाटें वर्तैल' अशी भविष्यवाणी आली आहे (स्मृ. ८६). यादवांचें 'मऱ्हाटे' राज्य शके १२३४ मध्यें बुडालें. म्हणजे शके १२३१ ते ३४ च्या मध्यंतरी नागदेव मरण पावला असें अंतःप्रमाणांवरून सिद्ध होतें.

**सासीट वर्षे राज्य केलें**-- वयाच्या ३२ वर्षानंतर पंथांत प्रवेश, नंतर चक्रधरांच्या सान्निध्यांत ४ वर्षे, त्यांच्या पश्चात् ऋद्धिपूर येथें गोविद-प्रभूच्या सान्निध्यांत १८ वर्षे, व त्याच्या निधनानंतर निबगांवीं १६ वर्षे याप्रमाणे नागदेवाचार्यांच्या एकूण ६६ वर्षांच्या आयुष्याची विभागणी आहे. यापुढील स्मृति वृद्धाचारांतील आहेत.

(३) **कवीश्वरबास**-'शिशुपालवध' कर्ता प्रसिद्ध कवि भास्करभट्ट बोरीकर.

**देह थोर तुटलें**—क्षीणता आली.

**दुष्टें गांजिलें इ.**···एक तत्कालीन म्हण.

**धातुसाम्य**--कफ–वात—पित्त या त्रिधातूची साम्यावस्था.

(५) **बाहे आफळिली**–बाहू उभारला.

**पिंडें पिंड खेळों**–विषयसुखाचा आस्वाद घेऊं.

**पोतें**—ब्रह्मचर्यरूपी गांठोडें, ठेंवा.

**तुज असावें, मा जावें** –ते असले किंवा गेलें, त्याचें तुला काय ?

(६) खेटभट, नाथो, सारंगपडित, जानोउपाध्ये हे सर्व चक्रधरांचे शिष्य व साधा (येल्हाई ही शिष्या होय. उमाइसा ही सारंगपडिताची पत्नी.)

**प्रसादाची रोटी**—श्री चक्रधराच्या पानातील प्रसादाचा शेष.

(७) **शोधु**- स्मृतिकाराच्या माहितीत अधूनमधून कोणी काही भर घातल्यास त्या नवीन माहितीचा उल्लेख ' शोध ' या शब्दाने करण्यात येई. महानुभावीय स्मृतिग्रंथातून असे अनेक शोध आले आहेत.

**उमाइसा**–नागदेवाचार्यांची बहीण.

**निवास**-- नेवासें ? (सं. निधिवास)

**दोहीं देवाचें**- चक्रधर व गोदिंदप्रभु यांचें.

**चणाख्य**- ऋद्धिपूर येथील गोविदप्रभूचें समाधिस्थान.

**क्र. १०**

## पूजावसर

'भावे देव व्यास' या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या प्रसिद्ध गद्यकाराचें मूळ नांव 'बाइदेव बास' असें आहे. हा मूळचा गोदातीरावरील नेवासें या

गांवचा राहणारा. नागदेवाचार्य हे त्याचे दीक्षागुरु. नागदेवांच्या मृत्यूनंतर महानुभाव पंथाचें आचार्यपद बाइदेव बासाकडे आलें. चक्रधर व गोविंदप्रभु या दोघांचेंहि सान्निध्य त्याला भरपूर लाभलें असल्यानें त्यांच्या पश्चात् त्यांच्या स्मृतिविषयांच्या दर्शनानें बाइदेवबास अति उदास होई. चक्रधरानें ज्या गांवाहून उत्तरेकडे प्रयाण केलें त्या 'बेलापुरा जाइन तरी तेथ बाइयाचें देह जाइल' या कल्पनेनें एकदां नागदेवाचार्यानें त्या बाजूस जाण्याचें टाळलें. या आख्यायिकेवरून बाइदेव बासाच्या अंतःकरणाची कल्पना येईल. (स्मृ. २७, २९). तो नागदेवाचार्यांच्या मृत्यूनंतर तीन वर्षानीं म्हणजे शके १२३१ मध्यें मरण पावला.

'पूजावसर' किंवा 'नित्यदिनीलीला' हा बाइदेवबासाचा प्रमुख ग्रंथ होय. त्यात चक्रधराच्या दिनचर्येचें अतिसूक्ष्म वर्णन आलें असून प्राचीन मराठी गद्याचा हा आदर्शच आहे असे म्हटल्यास चालेल. बाइदेवबास मोठा मार्मिक असावा. भास्कर कवीच्या शिशुपाळवधावरील 'कवीश्वर हो, ग्रंथु निका जाला : परि निवृत्ताजोगा नव्हेचि' हा प्रसिद्ध अभिप्राय बाइदेवबासाचा आहे. (वृद्धाचार, ९).

पृ. २५ **भटोबास**—नागदेवाचार्य.

पृ. २६ **वानरें**—नागदेवाचार्यास चक्रधर मौजेनें 'वानरेया' म्हणत.

पृ. २७ **दसांग धूपु**—दशविध द्रव्यांनी युक्त असा धूप.

**आठै सात्विक**—अष्टसात्विक भाव.

**तीथीवारु जाणवीति**—त्या दिवशीचें तिथिवासरादि पंचांग सांगत.

**क्र. ११**

## चक्रधरोक्त सूत्रपाठ

महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर हे पैठण येथें प्रगट झाल्यापासून तों शके ११९४ मध्यें ते उत्तरापंथीं प्रयाण करीपर्यंत त्यांचा ७–८ वर्षांचा जो काळ तो नित्य पर्यटनांत जात असे. या भ्रमंतींत ते अनेकांशीं चर्चा करीत. वादविवादाचे आखाडे घालून अजिक्यपत्र मिळविणें हा जरी त्यांचा हेतु

नसला तरी समर्पक असे व्यावहारिक दाखले देऊन विषय सुगम करण्याची हातवटी चक्रधरापाशी असल्यामुळें त्याचें बोलणें सहजच परिणामकारक होई. मात्र आपले बोलणें लेखनिविष्ट करून या तात्त्विक चर्चांना ग्रंथरूप देण्याचे त्याच्या मनांत कधीच आलें नाहीं. पुढे चक्रधराच्या प्रयाणानंतर त्याच्या आठवणी म्हाइंभटाने आपल्या 'लीला चरित्रां'त संग्रहित केल्या व याप्रमाणे 'मार्गासि उपयोगा जाईल' या बुद्धीनें त्याचें बोलणे 'काळाक्षरीं प्रतिपन्न' करून ठेविले. या 'लीळा चरित्रां'तून आलेले चक्रधराच्या तोंडचे सूत्रबद्ध सिद्धात पुढे नागदेवाचार्यांच्या अनुज्ञेवरून केसोबासानी एकत्र केले व अशा रीतीने 'चक्रधरोक्त सूत्रपाठा'ची सांप्रदायिक संहिता सिद्ध झाली.

या 'सूत्रपाटाचे' संचलनकार केसोबास किंवा केशीराज बास हे मूळचे पापदंडी रामपुरीचे विद्वांस व्याख्याते असल्याचें 'स्मृतिस्थळ' कार सांगतात. नागदेवाचार्यांशी झालेल्या चर्चेने केसोबासांच्या अगी विरक्ति बाणली व त्याचें शिष्यत्व पतकरून ते तरुणपणीच पंथांत प्रविष्ट झाले. केसोबासांचें मन पुन. संसाराकडे वळावें म्हणून त्यांच्या सासऱ्यानें प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण सारें व्यर्थ. प्रत्यक्ष त्यांच्या पत्नीनेंहि 'आतां हे योगिये जाले' असे म्हणून हात टेकले. भटोबासांनीं मात्र केसोबा यांचें हें तीव्र वैराग्य पाहून 'माझा केशवु शुकयोगींद्र की गा' असें म्हणून परम समाधान मानलें. केसोबांसाची धर्मशास्त्रपटुत्वाविषयीहि ख्याति होती. 'केशवदेया, भटमार्गा वेधले जीव तुमचेया गळां झोंबतील गा' अशा शब्दांत नागदेवाचार्यांनी त्यांचें धर्मज्ञान गौरविलें आहे. 'स्मृतिस्थळ' कारांनी पथाची प्रतिष्ठा राखण्याबद्दल केसोबासांचा गौरव केला आहे. ते म्हणतात, 'एकें अनिष्ट आलेयां आपणेयातें राखिलें: एकें एकातें राखिलें. केशवदेनि मार्गातें राखिलें गा' (स्मृ. १०६). केसोबासांच्या पंथसेवेची योग्यता नागदेवाचार्यांनीं चांगली जाणली होती. ते म्हणत, 'माझें शास्त्र माहींभटा लक्ष्मीधराचेनि नुजळेचि : तें पंडित केशवदेयासि चर्चा करितां उजळे: केशवदेया: मजमागां शास्त्र जाए ना ऐसें तुवा केलें: एणें शास्त्रें पुढां मार्गाचे झगडे तुटतील:' (स्मृ. ६८, २२४). केसोबास हे खरे पंडित होते. ते, राघोभट व पंडित दामादरबास हे तिघेजण सदा शास्त्रचर्चा

करीत. कवीश्वरबास त्यांना ' एकमूर्ति त्रये भागा ' असे म्हणत. या तिघांना ' शास्त्रसंवादेंविण जो उठितां बैसता रिकामेया दाखवील तयासि मी होड सारीन गा ' याप्रमाणें नागदेवाचार्यांनी एकदा पैज मारली होती ( स्मृ. २५२ ). असो. केसोबास भटोबासांच्या नंतर शके १२३८ मध्ये मरण पावले.

'रत्नमाला स्तोत्र' हा केसोबासाचा पहिला ग्रंथ संस्कृतात असून त्यात त्यांनीं म्हाइंभटकृत ' लीळाचरित्रा ' तील अनेक लीळांचा संस्कृत पद्यात अनुवाद केला आहे. केसोबासाची ही वाक्पूजा नागदेवाचार्यांना मानवली. परंतु ग्रंथरचना संस्कृतांत न करतां ती मराठीत करण्याविषयी त्यानी त्यास सुचविलें. त्याचा परिणाम होऊन केसोबास संस्कृताकडून मराठीकडे वळले व म्हाइंभटाच्या ' लीळाचरित्रां ' तून त्यांनीं चक्रधरोक्त 'सिद्धांतसूत्रपाठ' सिद्ध केला हा सूत्र-पाठ लक्षण, विचार व आचार अशा तीन प्रकरणांत विभागला गेला असून प्रस्तुत उताऱ्यांत त्यापैकीं आचारविषयक सूत्रातील कांही संग्रहित केली आहेत. सूत्रपाठ हा महानुभाव पंथाचा आदिग्रंथ असून प्रत्येक पंथीयाच्या तो नित्यपठनात असतो. स्वतः चक्रधरानें एकहि ग्रंथ लिहिलेला नसला तरी हा सूत्रपाठ म्हणजे खरोखर चक्रधराच्याच उक्ती होत. त्याचा संग्रह करून पंथीयांसाठी त्याची अधिकृत पाठसंहिता सिद्ध करण्याचें श्रेय तेवढे केसोबासां-कडे जाते. म्हणजे सूत्रपाठाच्या बाबतीत केसोबास हे केवळ संकलनकार ठरतात. हें संकलनाचें कार्य त्यानी इ. स. १२८० च्या सुमारास केले असावें.

**सूत्र** –" स्वल्पाक्षरं असंदिग्धं, सारवत् विश्वतोमुखम् । अस्तोभं अनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ॥ " सूत्राच्या या व्याख्येस ही चक्रधरोक्त सूत्रे उतरतात.

चक्रधरोक्त वचनांचें यथार्थ ज्ञान व्हावे म्हणून पुढील महानुभावीय पंडितांनीं सूत्रपाठावर भाष्यें, महाभाष्यें, व्याख्यानें इत्यादि विविध व विपुल रचना केली आहे. पैकीं गुर्जराशिवव्यास व सिद्धांते हरिव्यास यांनी शके १३२५ च्या सुमारास रचिलेलें ' आचारस्थळ ' महत्त्वाचें असून त्यांतून कांहीं सूत्रांवरील भाष्यटीपा रूपानें पुढें देतों.

पृ. ३०. **स्वदेशसंबंधु त्याज्य** ..... " स्वदेश भणिजे जिए देशीं होता, जेथ दिधलें घेतलें, आहारविहार केले, तो स्वदेश त्यजावा । ... संबंधियांचा

संबंधु भणिजे लेकरुवें बाळे मातापिता सोएरी–धाएरी गोत्रकुटुब एयांचा संबंधु विशेषें साडावा। विशेषता संबंधु त्याज्य भणिजे दुरूनिहीं अंतःकरणीं नाठवावे।" (आचारस्थळ).

पृ ३०. **नावडत नावडत सेवी ......** "... जैसें प्रथमकाळी धाकुटीये कुमारीसी वरैत नावडे,सासुरेया बोळवितां रडे। तयाचा अनुभव लाहे आणि तोचि आवडौनि ठाके। मग मायेबापातें दुऱ्हावी। तो जीवें न संडे। तैसें पाहिले पुरुषासि सत्वाचेनि लाठें विषयांची नावडी असे। मग सेवितसाता देवधर्माते दुऱ्हावी परि विखो न संडे ...।" (आचारस्थळ)

पृ. ३१. **स्त्री भणिजे...** "दर्शनमात्रें भणिजे दृष्टीचि। तेहि समग्र नाही, अल्प। दर्शनमात्रे, स्पर्शनमात्रे, संभाषणमात्रें माजवी। हे एकएकचि परि अल्पेचि माजवी। मा यें तिन्ही संपूर्ण आणि अखंड, तो कैसा वाचैल ? ... भणौनि रान सेवावे।" ( आचारस्थळ ).

पृ. ३१. **विषयाचिये एकासनीं न बैसावें...** "एकासन भणिजे जवळीक, हातपावो लागे ऐसें एकासनी बैसणे। तेणेंसी उठिबैसी गोष्टी मातु तें न करावें। आसनाचे तीन भेद। येका घोगडेया वरि, येकी जाडी सत्रंजीवरि, एका लाकुंडचीरेयावरि। घोगडा थोर दोष। तयाहुनि जाडी साना। तयाहुनि लाकुडचीरा साना। घोगडा तीन भेद। एक हात पावो लागे तैसें बैसणें, एक अर्धासनीचें उपट बैसणे, एक सेवटी बैसणें। तैसेंचि एरा दों ठाइं। एक समीप, एक दुरांतरे, एक सेवटी। पदन्‌ पडों नेदी तो उत्तम, बैसका पडों नेदी तो मध्येंम्, बैसलेया चुकवी तो कनीएसु। तरि कां चुकवावे? ना, पुढीलाचा भावो आपुलेयाचा ठाइ प्रवेशे। तैसेचि हावभाव उपजति।"( आचारस्थळ ).

पृ. ३१. **महाराष्ट्रीं असावें...** "महतराष्ट्र म्हणोनि महाराष्ट्र। महंत म्हणजे थोर। एकु देश भूमी थोर, एकु देश मनुष्यें थोर, एकु देश ऐश्वर्ये थोर, एकु देश सामर्थ्ये थोर। एके देशी मनुष्यें देशांतरियासि विष सुति, एके देशी देशांतरिया भाला घालीति। एके देशीं देशांतरिये धरिती, विकिती बांदिये करिती। एके देशीची मनुष्यें राजसें, एकेदेशीचीं मनुष्यें तामसें।... महाराष्ट्र सात्विक। तेथचे जडचेतन पदार्थ तेहि सात्विक। तेथ असतां शारीर मानसिक कव्हणीचि उपद्रव नुपजति। आणिके देशीं शारीर मानसिक

उपद्रव उपजला असे, तो महाराष्ट्रीं असतां शमे। तेथचां अन्नोदकीं शमे। तेथचां औषधीं शमे। तेथचा वारा झडि पाउस तोहि सात्विक। तेणें सकळ उपद्रव शमेति। महंत भणिजे निर्दोष। आणि एक देश निर्दोष होति परि सगुण नव्हेति। महाराष्ट्र निर्दोष आणि सगुण। तेथ असतां अनाचार करावे. याची बुद्धि नुपजे। आणि उपनली तर करूं न ल्हाइजे। आपण अनाचार न करी, आणिकांसि करूं नेदीति तें महाराष्ट्र। धर्म सिद्धी जाए तें महाराष्ट्र॥" (आचारस्थळ).

पृ. ३१ **गर्डी सिडीं असावें**....दोन भाषांचा सीमाप्रांत तो 'गडी व विषयपदार्थशून्य खेडी म्हणजे 'सिडी' अशा व्याख्या 'आचारस्थळ' कार करतात. नागदेवचार्याची कल्पना थोडी निराळी आहे. 'लज्जाहरण वस्त्र नाही, क्षुधाहरण अन्न नाही तया गावातें सिडी म्हणिजे। यें दोन्ही असति तयातें गडी म्हणिजे।' (स्मृतिस्थळ, ५१).

पृ. ३१ **हाळियां पाळियां असावें**—'हाळिया तिया सानिया दाहापांचा घरांचिया। पाळिया म्हणजे अनियत वास यथा वंजारवाडिया।' (आ. स्थ. ३६). 'चालती घरें, चालतीं उखळे, चालतिया चुली, तयातें पाळी बोलिजे। जेवावया तळी नाहीं, वाढावया पळी नाही तयातें हाळी बोलिजे। (स्मृतिस्थळ, ५१).

पृ. ३१ **मुंगी रांड मोहावी** -- 'पायाखालीं मुगी पडलेयां सरे ना... येणेंकरूनि देहाची निर्बळता आन मनाचें आलस्य' (आ. स्थ. ६०). तात्पर्य, कायावाचामनें अहिंसक.

पृ. ३२ **खळाळीं मोकलावें** —'खळाळ म्हणजे वाघासापांची संभावना, चोराचा कुरुठा ऐसी स्थानें। ...देहावरी उदास, आस्था सांडिली, सुख नाशंसी, यातें मोकलणें बोलिजे॥' (आ. स्थ. ७४; ७६).

पृ. ३२ **ऐसा आसे वटोवटो**—वटोवटो म्हणजे आर्त भक्त. मूल जसें आईसाठी तसें हा देवासाठीं वटवट करतो. 'चारी दीस म्हणजे आर्तातें बहुतर काळ न लगे' (आ. स्थ. ६९).

पृ. ३२ **हाडांची रांगवळी करावी**— देह मातीवर ठेवल्यास हाडांच्या सांपळयाचें रांगोळीसारखें चित्र उमटेल असा देहाचा अस्थिपंजर करणें.

पृ. ३२ **कटंकटीयेमान**—साधकानें आपला देह कडकड वाजणाऱ्या लोखंडी पत्र्याप्रमाणें करावा. "कटंकटिये म्हणजे देह शेष उरूनि असे। जैसा कां वारेनि पडैल।" (आ. स्थ. ७८).

पृ. ३२ **भिक्षा राज्य बाह्र** —'राज्य तें स्वातंत्रिये भिक्षा मागून भोजन करणें यातेंचि बोलिजे.'—(आचार बंद ९१). आपल्या भिक्षारूपी राज्यांत भिक्षुक म्ह. साधक हा पचनपाचनार्थ इतरांवर अवलंबून नसल्यानें स्वतंत्र असतो म्हणून भिक्षा हेंच राज्य.

पृ. ३२ **चातुर्वर्ण्यं चरेद्भैक्षम्** ..साधकानें चारहि वर्णांच्या घरीं भिक्षा मागावी. हा ब्राह्मण, हा शूद्र असा विकल्प चित्तांत आणूं नये.

पृ. ३२ **घर न निवडीत भिक्षा कीजे**--"हें घर सानें, हें थोर ऐसें निवडावें ना: निवडिल्या आज्ञाभंग" (आचार स्थळ, ८२).

पृ. ३२ **तोरणमंडळाचेया घरा न वचावें**—"तोरण म्हणजे जेतुलें शुभकार्य, विवाह, मुंजी, अष्टांगुळें, बारसें, उष्टावन, इत्यादि. तेथ गेलिया लेइल्या नेसल्या स्त्रियांचें दर्शन होये." (आ. स्थ. ८४).

पृ. ३२ **एकीकडौनि रिगिजे......निगिजे**—कारण "मागौतें तेयाचि बिदी आलेयां ओळखी, परिचयो...सांडिल्या पदार्थांचें दर्शन श्रवण होये" म्हणून. (आ. स्थ. ८५).

पृ. ३२ **भिक्षा आणिजे पारधी**—"एक दीं पदार्थ मिनला दुसरा दीं मिळे ऐसे नाहीं। म्हणौनि पारध."--(आ. स्थ. ९०).

पृ. ३२ **मिनलेयांहि न सेविजे** ...या सूत्राचें कारण म्हणजे महदायिसेला लागलेली तुपाची संवय. तूप न मिळालें तर आपलें पोट दुखत आहे असें तिला वाटे. पण हें वाटणें केवळ मानसिक होतें.

पृ. ३२ **नीरसें विरसें अन्नें** ... "निरसे म्हणजे ठायींचाचि रस नाहीं: अंबील, भात, दिवसे, मुटकुळे, चना, तुरी। विरस म्हणजे रस होता मा गेला: विटली खीर, शिळे पदार्थ।" (आ. स्थ. १११).

पृ. ३३ **सात पांच**--'सात पांच एवं बारा दीस एकत्र असणें।' (आ. स्थ. १३४).

पृ. ३३ **हें अधीत शास्त्र**—हें परमेश्वरशास्त्र पूर्णपणें धारण करतां येणें शक्य नाहीं इतकें तें विशाल आहे.

पृ. ३३ **आतांचें तंव ऐसें घेपे**--आधी श्रद्धा, मग ज्ञान. 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्'–( गीता, ४–३९ ).

पृ. ३३ **तुम्हीं अच्युतगोत्रीय**—परमार्गांतील सर्व लोक हे अच्युत गोत्रीय होता. कारण त्यांना परमेश्वराचें अच्युत प्रेम लाभतें.

पृ. ३४ **धर्मा धरु दीजे**--ज्ञानी पुरुषानें अज्ञ परंतु आर्त अशा जनास शास्त्रज्ञान द्यावें, पण तें योग्यायोग्य पाहून द्यावें. 'धर द्यावी धर्मासि कीं। धर्म नाहीं तरी त्यजावा।' ( आ. स्थ. १९७ ).

पृ. ३४ **तुम्हीं चतुर्विध भूतग्रामा**...' जीवमात्राचां ठाइं ईश्वरबुद्धि देखे। जणु काइ तोचि दुखवला। का जे सर्वात्मक म्हणौनि। महंत आत्मा म्हणौनि महात्मा।' ( आ. स्थ. २३२ ).

पृ. ३८ **अनुसरलेयाचा देवो**—'येथ अधीन होइजे, येथौनि भणितलें कीजे तें अनुसरण।' ( आ. स्थ. २८३ ). ज्ञान झाल्यानंतर सर्वसंगत्याग करून पूर्णपणें देवाधीन होणें याचें नांव अनुसरण.

**क्र. १२**

**दृष्टांतपाठ**

चक्रधरोक्त 'सूत्रपाठा' चे संकलनकार केसोबास यांच्याच लेखणींतून 'दृष्टांतपाठ' हा ग्रंथ उतरला आहे. 'दृष्टांतपाठ' हें चक्रधरांच्या उद्धवण-सिद्धांतावरील जणु एक उपनिषदच असून त्यांत केसोबासांनीं चक्रधरोक्त तत्वज्ञान शास्त्रोक्त पद्धतीनें मांडून दाखविलें आहे. चक्रधरांची वाणी मूळांतच वेधवती होती व त्यांत त्यांच्या श्रोतृवर्गांत समाजांतील सर्व थरांचे प्रतिनिधि असल्यानें आपलें निरूपण सर्वांना समजावें म्हणून त्यांना तें व्यवहारांतील दृष्टांतांनीं सुगम करावें लागे. हे दृष्टांत एकूण ११४ असून ते चक्रधरांनीं आपल्या भ्रमंतींत पैठण, डोमेग्राम इत्यादि गांवीं मुख्यतः भटोबास म्ह. नागदेवाचार्य, महदाइसा, रामदेव आणि बाइसा या चार शिष्यांना अनु-

लक्षून सांगितले आहेत. दृष्टांतनिरूपणाचा काळ 'लीळाचरित्रां' तील पूर्वार्धं उत्तरार्धाचा म्हणजे स्थूलमानानें इ. स. १२६८ ते ७३ असा ठरतो.

प्रत्येक दृष्टांताचे तीन भाग पडतात. प्रथम शिरोधार्य सूत्र, नंतर उदाहरण किंवा दृष्टांत, व शेवटीं दार्ष्टांतिक. पैकी सूत्र व दृष्टांत चक्रधरोक्त असून दार्ष्टांतिकच तेवढे केसोबासांचें आहे. चक्रधरोक्त सूत्रें व दृष्टांत यांचा काळ वर लिहिल्याप्रमाणें इ स. १२६८ ते ७३ च्या दरम्यानचा असून केसोबासांनी आपलें दार्ष्टांतिक चक्रधरांच्या पश्चात् गोविंदप्रभूच्या सन्निधानांत इ.स. १२८०च्या आसपास तयार केले असावे. दोघांच्या भाषाशैलींत पुष्कळच फरक आहे. चक्रधरांची सरणी जिवंत व अकृत्रिम तर केसोबासांची तर्ककर्कश व पंडिती वळणाची वाटते. असो. 'दृष्टांतपाठा' वर विवरणात्मक असे पांचपन्नास ग्रंथ असून त्यांत विश्वनाथ बासाचें 'दृष्टांतस्थळ' व मुरारी बासाचें 'दृष्टातमालिकाभाष्य' हे दोन टीपग्रंथ महत्त्वाचे आहेत. दृष्टांताचें लक्षण आनेराजानीं आपल्या 'बत्तीस लक्षणी टीपेंत' केले असून त्यावर पुढें जी मराठी व्याख्यावृत्ति तयार झाली तीतहि दृष्टान्तविषयक चर्चा आढळते. त्यांतून दोन उतारे पुढें देतों.

'परेणोक्तं प्रमाणं च सर्वबुद्धेरगोचरम् ।
येन दृष्टः प्रमेयान्तः तं दृष्टान्तं प्रचक्षते ॥' (लक्षणरत्नाकर)

'जीवासि प्रमाण बुझावेया दृष्टांत होवावा लागे : दृष्टादृष्ट निरूपूनि तत्सादृश्यें दृष्टादृष्ट बुझविजे त्यें दृष्टांतसूत्र' (बत्तीस लक्षणाची टीप). स्वत· केसोबासांनी आपल्या दृष्टान्तपाठाचें एक 'लापणिक' म्हणजे विषयानुक्रमें पृथक्करणात्मक अशी अनुक्रमणिका तयार केलेली असून तिची उपयुक्तता निर्विवाद आहे.

दृ.१–हा दृष्टांत आउसेला डोंबेग्रामीं सांगितलेला आहे. जीवास पूर्व संचितामुळें भोगावें लागणारें दुःख पाहून त्याविषयीं अनुकंपा वाटणें हें अनाठायी होय, हा अभिप्राय (मूळ क्र. १३).

**हा कां गा खांडुं देईल**–हें सूत्र चक्रधरांनीं एका व्रणातं बैलास उद्देशून म्हटलें होतें. हा बैल जसा निमूटपणें चीरफाड करूं देणार नाहीं, तसा जीव सुखानें पापनिष्कृति होऊं देणार नाहीं, असा अर्थ.

**एथ, एथोनि** – स्वतः चक्रधर, परमेश्वरावतार.

**सों सों** – ( सुवोंसुवों ) पुनः पुनः खुपसून.

**वाटा घे** – वाटमारी करी.

**दृ. २**– हा दृष्टांत रामदेवास करंजखेडीं सांगितला. ( मूळ क्र. २५ ).

**विद्या**– ब्रह्मविद्येहून हीन अशा जीवदेवतांच्या विद्या.

**दृ. ३** – रामदेवास करंजखेडीं ( मूळ क. २६ ).

**दृ. ४** –हा दृष्टांत रामदेवास अनुलक्षून डोंबेग्रामी महदाइसेसा सांगितला. हा दृष्टांत म्हणजे मागील दृष्टाताची पूर्वावस्थाच होय. ( मूळ क्र. २७ ).

**गुंडा**– 'टाकी लावूनि घडिले घोटिले नव्हेति। वाहताचि मवाळ जाले असती' ( दृ. स्थ. ).

**दृ. ५** – डोंबेग्रामीं म्हाइंभटास. परमेश्वर हा अवयवी व त्याच्या शक्ती हे त्याचे अवयव असा भावार्थ. (मूळ क्र. ४३ ).

**उरोधिती** – 'आणिकाचें हीन,आपुलेंचि थोर या नांव उरोध '(दृ स्थ.).

**दृ. ६**– चांगदेवास एलापुरी. (मूळ क्र. ४४ ).

**वासना**– संस्कार.

**दृ. ७** – हा दृष्टात नाथोबास अनुलक्षून माणिकदंडीस सागितलेला आहे. ( मूळ क्र. ४९ ) ' जैसें पडाळीं खुटदावे असें तैसें स्त्री खुटदावें। '

**दृ. ८** – हा दृष्टांत प्रासंगिक असून तो डोमेग्रामी देमाइसेला सागितलेला आहे. देमाइसा ही पैठणजवळ पिंपळगांव येथे राहत असे. सद्गुरूच्या शोधार्थ घराबाहेर पडून, एकदोन गुरूंचे विपरीत अनुभव घेऊन अखेरीस ती चक्रधराकडे आली व त्यांच्या अनुग्रहानें तिचें संपूर्ण समाधान झालें. या दृष्टाताच्या प्रसंगी चक्रधर देमाइसेला आपल्या गावी परतण्यास सांगत होते व तिच्या मनांतून तर परत जावयाचें नव्हतें. ती चक्रधरांना म्हणते, "हे काइ जी ? आपुलें सकळै सांडुनि गोसावियाचेआ दर्शना येइजे आणि गोसावी पाठऊंचि लागती। कांही अपूर्व निरूपिती ना." यावर चक्रधरानी तिची समजूत घालून 'कसें वागावे' या तिच्या प्रश्नाचें उत्तर दृष्टांताच्या शिरोभागींचीं सूत्रें उच्चारून दिलें. (मूळ क्र. ५३).

**देमती** – देमाइसा (चक्रधरशिष्या)

**श्रीकराचेनि अनुकारें** – स्वतः चक्रधरांनीं हस्तविक्षेप करून दाखविलें.

**पाठीं तियें आलीं** – "मनलज्जा जनलज्जा आलीं। प्रीतितंव येती ऐसें नाहीं।" (दृ स्थ.).

**दृ. ९** – हा दृष्टांत हिवरळी येथे महदाइसेला सांगितला. सामान्य दृष्टीला जें प्रयोजक म्हणजे योग्य तें परमेश्वराच्या दृष्टीनें अप्रयोजक म्हणजे अयोग्य असा सूत्राचा भावार्थ. (मूळ क्र. ५४).

**महात्माः**– "तोचि उभयदर्श्या। तयाचिये अंतरीं जीवोद्धरणाची प्रवृत्ति तोचि परिसु।" (दृष्टांतस्थळ).

**लोखंडें**– "षड्विधकर्मे ही लोखंडें." (दृ. स्थळ).

**कुजांतर** – "परज्ञान ते अन्यथाज्ञानें कुजातर म्हणितलें." (दृ. स्थळ).

**दृ १०** – पैठण येथें नागदेवास सांगितला. अनन्यभक्तीस परमेश्वर वश होतो हा भावार्थ (मू क्र. ७२).

**हातातळीं हात वाडवीति ताळीं** – याचनेप्रीत्यर्थ हात पुढें करीत नसत.

**अर्धराज्य......समान करी** – "सकळेया·शक्ती दान करिती तेंचि आपणेया समान करणे। अविद्यांतरें मोक्ष देति ते पाठीसि घालणें ते अर्धराज्य बोलिजे." (दृ. स्थळ.)

**दृ. ११**– बेलोपुरी नागदेवास. ज्ञानाच्या प्रथमावस्थेंत म्हणजे अपरिपक्व-दशेंत साधकानें फार जपून राहिलें पाहिजे असा भावार्थ. (मूळ क्र. ७६.).

**शेळियां मेंढियांचा** – "जैसी सेळी वरील डिरी खुडी परि मूळ उपटीना। आन मेंढी ते खूर खरवडुनि मूळहि खाये, तैसा विकार सेविलेया अनुसरण जाए पर तत्काळ बोध न वचे। आन संकल्पें अनुसरणासहित बोध उल्लेख-मात्रेंचि जाए।... मग ज्ञान जालेयां अन्यकथन ते सेळी आन विपरीत बुद्धि ते मेंढी" ( दृ. स्थळ. )

**दृ. १२** – छिन्नपापी येथें प्रसाद वाटतांना नागदेवास इतरांप्रमाणें दोन चिमटी न देतां त्यास अधिक देऊं काय असें आउसेनें विचारल्यावरून चक्र-धरांनी हा दृष्टांत तिला सांगितला. साधकानें व्रतस्थ असावें, नित्याचरणांत यत्किंचितहि ढिलेपणा होऊं देऊं नये, हा भावार्थ. (मूळ क्र. ९४).

**पाए पसरुनि**–"स्वभावसरळीं वर्तन करणें तेंचि पाए पसरणें."(दृ. स्थळ).

क्र. १३

## पंचतंत्र

" मूळ पंचतंत्र हा अति प्राचीन ग्रंथ. आज शेंकडों वर्षे या भरतभूमींत वाढून या देशाबाहेरील सर्व जग त्यानें आक्रांत केलेलें, अशी त्याची कीर्ती· इतक्या परिभ्रमणात त्यानें पुष्कळ वेषांतर व रूपांतर करावें हें हिशेबीच आहे. निरनिराळ्या पंचतंत्रांतून जी मजकुराची तफावत दिसते ती यामुळेच. पंचतंत्राची जी toxtus simplioior छापली गेली आहे तें पंचतत्राचें साधें स्वरूप होय. कालदेशप्रसंगानुसार हे साधें स्वरूप जाऊन त्यास जी कमजास्त फुगीर स्वरूपे आलीं त्याप्रमाणें जशी प्रत रूपांतरकाराचे हातीं आली तशी घेऊन रूपांतरें झालीं असणार. मूळ एक संस्कृत व त्याची अनेक गद्यपद्य मराठी रूपातरें असा वास्तविक प्रकार दिसत नाही तर संस्कृत मूळेंच थोडीं भिन्नभिन्न; अर्थात् तदनुगामी मराठी रूपातरेंहि निराळी दिसली तर नवल नाही."...वरील उद्‌गार प्रो. द. वा. पोतदार यानी आपणास सापडलेल्या मराठी गद्य पंचतंत्राच्या एका जुनाट प्रतीचा परिचय करून देताना काढले आहेत (पहा— भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष ३). तत्पूर्वी वि. ल. भावे यांनी 'महाराष्ट्र कवीं'त एक मराठी पंचतंत्र छापून प्रसिद्ध केलेच होते (शके १८२९). महानुभाव पथांतील एका पंचतंत्रापैकीं कांही भाग ह. ना. नेने यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकातून प्रसिद्ध केला होता. तात्पर्य, मराठीत पंचतंत्रे अनेक झालीं. पैकीं प्रो. पोतदारांनीं उजेडांत आणलेलें पंचतंत्र भाषादृष्ट्या प्राचीनतम वाटतें. तें ज्ञानेश्वरकालीन असण्याचाहि संभव आहे मात्र ते अति त्रुटित आहे.

प्रस्तुत उतारा वि. ल. भावे-संपादित पंचतंत्रापैकीं असून तें १४ व्या शतकांतील असावें. लेखकाचा उल्लेख कोठेंहि नाहीं. मूळ संस्कृत पंचतंत्राची भूमिका अनुवादकारानें कायम ठेविली आहे. प्रस्तुत अनुवादाचा प्रारंभ असा आहे —

'पूर्वी महिळारोप्यनाम नगरी। तेथें अमरशक्ति नाम राजा होता। तयासि तिघे पुत्र। वसुशक्ति। अनंतशक्ति। उग्रशक्ति। हे तिघेजण प्रबुद्ध थोर जाले। परंतु मूर्ख। तरि हें पढवा। आणि राज्यायोग्य करा। ऐसें सांगितलें। मग

मंत्रियें विष्णुशर्मा नामे ब्राह्मणु बोलाविला। राया तुझे पुत्र सां मासां प्राज्ञ पढते राज्यायोग्य करीन।'...

याप्रमाणें विष्णुशर्म्यानें राजपुत्रांना मित्रभेद, मित्रसंप्राप्ति, काकोलूकीय, लब्धप्रणाश व अपरीक्षितकार्य अशीं एकूण पांच तंत्रें किंवा आख्यानें सांगितलीं. म्हणून हें पंचतंत्र किंवा पंचोपाख्यान.

क्र. १४

## क्रिस्तपुराणाची प्रस्तावना

हा उतारा फादर थॉमस् स्टीफन्स यानें आपल्या 'क्रिस्तपुराणा'स लिहिलेल्या प्रस्तावनेंतून निवडला आहे. स्टीफन्स हा हिंदुस्थानास येणारा पहिला इंग्रज. त्याचा जन्म इंग्लंडमध्यें विल्टशायर परगण्यातील बुलस्टन या गांवी इ. स. १५४९ त झाला. पुढें रोममध्ये धार्मिक शिक्षण पुरे करून वयाच्या २१ व्या वर्षी तो हिंदुस्थानाकडे येण्यास निघाला व दक्षिण आफ्रिकेला वळसा घालून ता. २४ ऑक्टोबर १५७९ रोजी गोंव्यास येऊन उतरला. स्टीफन्सचें यापुढील सर्व आयुष्य साष्टी प्रांतात क्रिस्ती धर्माचा प्रसार करण्यांत गेलें. तो 'पाद्री एस्तेवा' या नांवानें सर्वत्र ओळखला जाई. मराठी भाषा आत्मसात् करून त्या भाषेच्या द्वारां साष्टी प्रांतांतील ब्राह्मणवर्गात क्रिश्चन धर्माचा प्रसार करणारा हा लोकप्रिय इंग्रज मिशनरी वयाच्या ७० व्या वर्षीं म्हणजे इ. १६१९ त आपल्या कर्मभूमीमध्येंच स्वर्गवासी झाला.

'क्रिस्तपुराण' हें आपलें महाकाव्य फा. स्टीफन्सनें प्रथम पोर्तुगीज भाषेंत रचिलें व त्याचें ओवीबद्ध मराठी भाषांतर त्यानेंच स्वतः इ. स. १६१४ मध्यें पुरे केले. बायबलमधील Old व New Testament च्या आधारें लिहिलेल्या या काव्याचे 'पैले पुराण' व 'दुसरे पुराण' असे दोन भाग असून त्याची ओवीसंख्या एकूण अकरा हजारांवर आहे. रोमन लिपीमध्यें लिहिलेल्या या मराठी ग्रंथांत कोंकणी व पोर्तुगीज शब्द विपुल आहेत. पोर्तुगिजांची हिंदूंच्या भाषेवर व त्याच्या देवनागरी लिपीवर वक्रदृष्टि असल्यामुळें स्टीफन्सनें आपलें 'पुराण' रोमन लिपीमध्यें रचिलें असणें शक्य आहे. त्यानें केलेलें लिप्यंतर मात्र समाधानकारक नाहीं. ग्रंथास स्टीफन्सनें एक प्रस्तावना

जोडली असून ती गद्यांत आहे. पाद्री एस्तेवांच्या नांवावर कोंकणी भाषेचें व्याकरण व क्रिश्चन धर्माचें विवरण असे आणखी दोन ग्रंथ आढळतात. 'क्रिस्तपुराणा'ची श्री. सालढाणा यांनीं इ. स. १९०७ मध्यें संपादित केलेली आवृत्ति आज दुर्मिळ झाली आहे. फादर स्टीफन्सवरील प्रो. गो. बि. तुळपुळे यांचे दोन लेख--'रत्नाकर,' १९२७--अभ्यासकास उपयुक्त वाटतील.

पृ. ५३ **पाद्री थॉमस एस्तावा**--Padre Thomas Estevam फा. स्टीफन्सचें रूढ नांव.

पृ. ५३ **फळस्त सुफळ**-- इच्छा सफळ होतील.

पृ. ५४ **वैकुंठा आणि यमकोंडासी**--Heaven & Hell

**सांटा वांजेलाचा**--Saint Angel

पृ. ५४ **अभंग केलें**-- 'क्रिस्तपुराण' ओवीबद्ध असून स्टीफन्स ओवीसच अभंग म्हणत आहे.

क्र. १५

## एकनाथी भारुड

एकनाथांचें (इ. स. १५३३ ते ९९) नांव घेतलें की त्याचीं भारुडें डोळ्यांपुढे उभी राहतात. हीं भारुडें मुख्यतः पद्यात्मक असली तरी त्यातील काहीं गद्यहि आहेत. देहगांवचे किंवा शरीराबादचे सुभेदार जीवाजीपंत व ब्रह्मपुरीचे सरकार आत्मारामपंत या दोघांतील ताकीदपत्रें, अर्जदास्ती, जाबचिठ्ठ्या, कौलनामे इ. नाथांनीं रचिलीं असून ती सर्व रूपकात्मक आहेत. त्यांतील जीवशिवसंबंधातील वर्णनाची सूक्ष्मता पाहण्यासारखी आहे. भाषा सरकार-दरबारी म्हणजे फारसीमिश्रित आहे.

(१) **आलेकुम् सलाम**- (फा.) तुम्हांस सुखशांति लाभो!

**जरासंध चोपदार** – वृद्धत्वाचा सूचक.

**यमाजीपंत**- मृत्यूचा सूचक

**मेटें बसलीं** – गुडगे धरले; हिंमत खचली.

क्र. १६

प्रस्तुत उतारा हनुमंतस्वामीकृत समर्थांच्या बखरींतील आहे. हनुमंत स्वामी हे रामदासांचे वडील बंधु जे श्रेष्ठ त्यांच्या नातवाचे नातू होत ही बखर हनुमंतस्वामींच्या नांवावर प्रसिद्ध असली तरी ती त्यांनीं स्वत: लिहिलेली नाही. त्यांच्या आज्ञेवरून चाफळ संस्थानचे कारभारी रंगो लक्ष्मण मेढे व प्रसिद्ध बखरकार मल्हार रामराव चिटणीस यानीं जुनी सांप्रदाइक कागदपत्रें वगैरे पाहून ती प्रथम शके १७१५ मध्यें रचिली व पुढें शके १७४० मध्यें सुधारून वाढविली. स्वत: बखरकार म्हणतात, कीं रामदासाचे नातू जे गंगाधरस्वामी यानीं रचिलेल्या समर्थ-चरित्राच्या आधारें आपण प्रस्तुत बखर लिहीत आहों. ते कसेहि असो, समर्थ-चरित्राचें एक साधन या दृष्टीनें ही बखर बरीच विश्वसनीय आहे यात काही शंका नाही.

पृ. ५९ **मऱ्हाटें राज्यवृद्धि**– "मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥ "–रामदास.

**आम्ही गंगातीरीं राहणार**– गोदावरीच्य परिसरांतील जाब हें रामदासाचे जन्मस्थान व तेथे त्याचें घराणे अनेक पिढ्या राहत होतें. शके १५६६ त रामदासानी कृष्णातीरीं येऊन आपल्या सप्रदायाची उभारणी केली.

पृ. ६१ **निमिष्यांत कोण स्थळपासून कोणे स्थळीं जातात**

"जातें स्थळ तें सागेना । सागेल तेथें जाईना ।
आपुली स्थिति अनुमाना । येवोचि नेदी ॥ " –दासबोध.

पृ ६३ **त्रयोदशाक्षरी मंत्राचा अनुग्रह केला**—

"श्रीराम जयराम जयजय राम " हा मंत्र. शिवाजीनें रामदासांकडून अनुग्रह चाफळनजीक सिंगणवाडीच्या बागेंत शके १५७१ वैशाख शु.९ गुरुवारीं घेतला असें 'वाकेनिशी टिपणा' वरून स्पष्ट होतें. परतु यासंबंधी मतैक्य नसून शिवसमर्थांची पहिली भेट शके १५७१ त न होतां ती शके १५९४ मध्यें झाली असें मानणारा एक पक्ष आहे.

क्र. १७

प्रस्तुत उतारा तंजावर येथील प्रसिद्ध शिलालिखित बखरींतून निवडला

आहे. मराठेशाहीची ही बखर म्हणजे एक अतिदीर्घ असा शिलालेख असून तो तंजावर येथील श्रीबृहदीश्वराचें देवळांतील भिंतीवर सभोंवार खोदलेला आहे. हें खोदकाम मार्गशीर्ष वद्य १५ शके १७२५ ( १३ डिसेंबर इ. स. १८०३ ) या दिवशीं पूर्ण झालेलें असून शिलालेखाच्या शेवटीं पुढील नोंद आहे—

'प्रथमवर्ण ( म्हणजे ब्राह्मण ) महाराष्ट्रजाति भगवंतरायाचे पौत्र विठ्ठलरायाचे पुत्र प्रस्तुत चोळदेशाधिपति श्रीमंत राजेश्री महाराज छत्रपति शरफोजी महाराज याचे निजसेवक....'

वरील उल्लेख कोरक्याचा नसून लेखकाचा आहे. लेख अति प्रचंड म्हणजे छापील पृष्ठें शेंसवाशे भरतील इतका आहे. लेखांतील सर्व मजकूर शेजारींच तामीळ भाषेंतहि खोदलेला आहे. मराठी लेखांतील भाषा तंजावरी वळणाची, अर्थात् अशुद्ध आहे. लेखांत मराठेशाहीचा समग्र इतिहास दिला असून तो अत्यंत अविश्वसनीय आहे. म्हणजे भाषा आणि इतिहास अशा दोही दृष्टींनी लेख उपेक्षणीय खराच. एक अतिविस्तृत असें शिलालिखित म्हणून मात्र तो अमोल आहे. लेखाचें वाचन आणि प्रकाशन तजावरचे श्री. सांबमूर्तिराव यांनी इ. स. १९०७ मध्यें केलें आहे.

पृ. ६५ मोगलाचे घोड्यांना पाण्यामध्ये धनाजी जाधव दिसे, शिवाजी नव्हे, बखरकार ऐतिहासिक घटना मागेपुढें करीत आहे.

## क्र. १८

शिवाजीचा पहिला चरित्रकार कृष्णाजी अनंत सभासद यानें रचिलेल्या बखरीतून क्र. १८ व २० हे दोन उतारे निवडले आहेत. या बखरकराचें गोत्र काश्यप व उपनांव हिरेपारखी. शिवाजीपासून राजारामाच्या अखेरपर्यंत तो दरबारीं सभासद असल्यानें त्या नांवानें ओळखला जातो. सभासद म्हणजे राजसभेंत नसून सल्लामसलत देणारा शिष्ट. यानें आपली शिवाजीची बखर राजारामाच्या आज्ञेवरून चंदी येथें शके १६१९ त लिहून संपविली. लेखनाचें काम तीन वर्षेपर्यंत चालू होतें. सभासदी बखरींतील माहिती त्रोटक व स्थूल असली तरी एका समकालीन जाणत्या माणसानें लिहिलेलें शिवचरित्र या

दृष्टीनें तें विश्वसनीय समजण्यास हरकत नाहीं. (पहा–राजवाडे, ऐतिहासिक प्रस्तावना, पृ. २१७–८)

प्रस्तुत उतारा शिवचरित्रांतील आग्र्याहून सुटकेच्या प्रसंगींचा आहे.

क्र. १९

मराठेशाहीचा प्रसिद्ध बखरकार मल्हार रामराव चिटणीस याने मराठी राजांच्या बखरी मोठया परिश्रमानें रचिल्या आहेत. मल्हार रामराव हा पेशव्याचे सरदार सखाराम हरि गुप्ते आंबेगांवकर यांचा जांवई. सातारच्या प्रतापसिंह छत्रपतीचा हा चिटणीस होता. त्यानें लिहिलेल्या बखरीचा रचना-काळ इ. स १८१३ च्या आसपास आहे.

प्रस्तुत उतारा शिवछत्रपतीच्या सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील राज्या-रोहण–विषयक आहे. बखरकार म्हणतात त्याप्रमाणें राज्याभिषेक–समारंभ शके १५९६ ज्येष्ठ शु. १३ स ( ६ जून इ. स. १६७४ ) झाला हे खरें.पण पुढें तेराव्या दिवशीं राजमाता जिजाबाई निवर्तली,तेव्हां निश्चलपुरी नावाच्या गागाभट्टकृत शिवराज्याभिषेकविधीतील कांही दोष दाखवून तात्रिक रीतीनें ललितापंचमीस ( आश्विन शु. ५ ) शिवाजीस पुनः राज्याभिषेक केला. या द्वितीय समारंभावर ' श्रीशिवराज्याभिषेक–कल्पतरु ' या नावाचा ग्रंथ निश्चलपुरीनें रचिला असून तो संस्कृत भाषेंत आहे. (भा. इ. सं. मं. त्रै., वर्ष ११, अंक १ ).

पृ. ७० **अष्टप्रधान**:– १ प्रधान, २ अमात्य, ३ सचीव, ४ मंत्री, ५ डबीर, ६ न्यायाधीश, ७ न्यायशास्त्री, ८ सेनापति.

पृ. ७२ **गागाभट्ट**:– काशीस जाऊन तेथें नांवलौकिक मिळविलेलें पण मूळचे पैठणचे जें भट्ट घराणें त्यातील दिवाकरभट्टाचे गागाभट्ट हे पुत्र होत. यांचें मूळ नांव विश्वेश्वरभट्ट, पण वडील लाडानें गागाभट्ट म्हणत व पुढें तेंच नांव रूढ झालें. गागाभट्टाची ग्रथरचना विपुल आहे. गागाभट्टाचा शिव-राज्याभिषेकाशी संबंध कसा आला यासंबंधी एकमत नाहीं. प्रसगाचें महत्त्व जाणून शिवाजीनें भालचंद्रभट पुरोहित व सोमनाथभट कात्रे यांना मुद्दाम काशीस पाठवून गागाभट्टांस रायगडीं आणविलें असें दिसतें. राज्याभिषेकाच्या

कामी त्याला विरोधहि झाला. पण गागाभट्टानें पुढाकार घेऊन समारंभ यशस्वी केला.

क्र. २०

प्रस्तुत उतारा सभासदी बखरींतील असून त्यांत शिवाजी-एकोजी संबंध वर्णिला आहे. एकोजी किंवा व्यंकोजी (इ. स १६३१ ते ८५) हा शिवाजीचा सावत्र भाऊ. शहाजीच्या पश्चात् यानें तंजावरास मराठ्यांचें स्वतंत्र राज्य स्थापिले तरी तो विजापूर-दरबारचा पक्ष घेऊन आपल्या भावास विरोध करी. शिवाजीनें इ. स. १६७७ त कर्नाटकावर स्वारी केली तेव्हां त्यानें व्यंकोजीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण व्यंकोजीच्या हेकेखोरपणा-मुळें त्याची समजूत न पटून तो दुराग्रहास प्रवर्तला व शिवाजीच्या गोटांतून पळून तंजावरास गेला. त्या प्रसंगीचा हा उतारा आहे

क्र. २१

मल्हार रामराव चिटणिसांनी आपल्या 'सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रां'त वर्णिलेली शिवाजीसारख्या राजकारणी पुरुषाची ही दिनचर्या क्र. १० तील भावेदेवव्यासानें वर्णिलेल्या चक्रधरासारख्या निवृत्त संताच्या दिनचर्येशी तोलून पाहण्यासारखी आहे.

क्र. २२

हा उतारा चिटणीसकृत शिवचरित्रांतील आहे (पहा-टीप क्र. १९). शिवाजी रायगडास दोषिक ताप येऊन शके १६०२ चैत्री पौर्णिमेस (३ एप्रिल १६८०) मरण पावला. बखरकारानें केलेल्या वर्णनांत कल्पित पुष्कळच आहे.

क्र. २३

उतारा चिटणीसकृत संभाजीचरित्रांतील आहे. कलुषाचें विश्वसनीय असें पूर्ववृत्त उपलब्ध नाहीं. हा हिंदुस्थानी कनोजी ब्राम्हण काशीस भोंसल्यांचा क्षेत्रोपाध्याय असून इ. स. १६६६ मध्यें आग्र्याहून परत येतांना संभाजीची व याची गांठ पडली असणें संभवनीय आहे. कलुषास 'कविकलश' असा

किताब असून इतिहासांत तो कबजी (हिंदी-कविजी ?) म्हणूनहि ओळखला जातो. कागदोपत्री मात्र कविकलश किंवा कब्कलश असें नांव आढळतें. हा व्यसनी हिंदी कवि तंत्रमंत्रविशारदहि असावा असें त्याच्या नावामागील ' कर्मकांडपरायण, दैवतैकनिष्ठाग्राहिताभिमान ' अशा विशेषणांवरून वाटतें. 'शेवधि: सर्वसिद्धीनाम्' असेंहि याचें वर्णन कोठें आढळतें. कलुषाची मंत्रविद्या आपणास विजयी करील या भावनेनें समानशीलव्यसन अशा संभाजीनें त्यास जवळ केलें असावे. त्यासाठी त्यानें 'छदोगामात्य' हें स्वतंत्र पद निर्मिले व राजकारणहि तो त्याच्याच सल्ल्यानें करूं लागला. शिर्क्यांच्या शिरकाणासारखीं अनन्वित कृत्यें संभाजीनें केवळ कलुषासाठीं केली. कलुषास सगमेश्वरीं संभाजीबरोबरच पकडून ठार मारण्यांत आलें (इ. स. १६८९).

क्र. २४

उतारा चिटणीस-विरचित राजाराम-चरित्रांतील असून त्यांत मराठयांच्या गनिमी काव्याने हैराण झालेल्या औरंगजेबाचें व त्याच्या सेनेचें चित्र आहे.

क्र. २५

'पेशव्यांची बखर' रचणारे कृष्णाजी विनायक सोहोनी हे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यांतील सोमेश्वरचे राहणारे. पेशवाईच्या उत्तरार्धांत ते कोंकण सोडून देशावर आले व स्वत:च्या कर्तृत्वावर त्यांनीं पेशवे-दरबारीं सुभेदारी मिळविली. पुढे पेशवाईच्या अस्तमानाबरोबर कृष्णाजीपंतांचें वैभवहि फिकें पडून त्यांचें लक्ष संन्यासमार्गाकडे वळलें व त्याप्रमाणें उर्वरित आयुष्य त्यांनीं वैजनाथाच्या देवालयांत एकाद्या तपस्व्याप्रमाणें काढलें. त्यांनीं रचलेल्या ' पेशव्यांच्या बखरीं ' त बाळाजीपंत नाना यांनी श्रीवर्धन सोडल्यापासून तों पुण्यांतील शनिवार वाड्यावर इंग्रजांचें निशाण फडकेपर्यंतची सर्व हकीकत आली आहे. ही बखर १९ व्या शतकाचें प्रारंभीं रचिलेली असून त्या वेळीं बखरकाराचें वय पाऊणशेंच्या घरांत असावें. प्रस्तुत उताऱ्यांत पहिला बाजीराव व निजाम यांच्या भेटीचा प्रसंग आहे. वर्णनांत इतिहासापेक्षां कल्पनाच अधिक दिसते.

**क्र. २६**

क्र. २६ व क्र. २८ हे दोन उतारे भाऊसाहेबांच्या बखरींतील आहेत. ही प्रसिद्ध बखर कृष्णाजी शामजीच्या नांवावर मोडते खरी, पण तिचें कर्तृत्व संशयित आहे. शिंद्यांच्या नौकरींतील कोणी चिंतो कृष्ण वळे--फडणीस हा सदर बखरीचा लेखक असावा अशी कल्पना पुढें ग्वाल्हेरचे श्री. आनंदराव फाळके यांनीं पुढें मांडलेली असून प्रो. शेजवलकर यांनी ती उचलून धरिली आहे. एवंच, बखरीच्या कर्तृत्वाचा प्रश्न विवाद्य आहे. इतकें मात्र खरे, की लेखक शिंद्यांचा पक्षपाती असें बखरीच्या एकंदर थाटावरून वाटतें. प्रस्तुत उताऱ्यात दत्ताजी शिंद्यांच्या मर्दुमकीचें वर्णन आलेले असून पानिपतच्या प्रसंगानें शिंदे होळकर एक झाल्याच्या वृत्तांत आहे.

**दत्ताजी शिंदे**–हा राणोजी शिंद्याचा मुलगा. पानिपतपूर्व संग्रामात बदाऊच्या घाटावरील लढाईंत ता. १० जानेवारी इ. स. १७६० रोजी यास शूराचें मरण आलें.

**जनकोजी शिंदे**-- हा जयाप्पा शिंद्याचा मुलगा व दत्ताजीचा पुतण्या. वयाच्या अवघ्या १८ व्या वर्षीं पानिपतच्या लढाईंत मेला.

**खंदारचा पातशाहा**-- अहमदशहा अबदाली. ( मृत्यु इ. स. १७७२ )

पृ. ८७ **उधो माधो कहे**-- उद्धव माधव या नांवाचा हिंदी संतकवि.

**मल्हारराव होळकर**– ( इ. स. १६९३ ते १७६६ ) शिंदे–होळकरांची चुरस राणोजी शिंद्यांच्या वेळेपासूनच होती. " मल्हारराव व राणबा एके जागी राहत नाहीत. (पुरंदरे–दप्तर, १–१५९ ).

**क्र. २७**

प्रस्तुत उतारा रघुनाथ यादवविरचित 'पाणिपतच्या बखरी' तील आहे. बखरीचा रचनाकाल पानपतच्या पाठोपाठ म्हणजे इ. स. १७६४–६५ असा आहे बखरकार चिटणीस घराण्यापैकीं असून लेखणीचा खंदा दिसतो.

**सदाशिवराव भाऊ**– भाऊसाहेब पेशवे ( इ. स. १७३० ते १७६१ ) चिमाजीआप्पाचा मुलगा. पानपतच्या गर्दीत हा नाहीसा होईपर्यंत नाना फडणीस याजपाशीं होता. आपल्या आत्मचरित्रांत नानानें भाऊस स्वकीयांचें न ऐकतां दुराग्रहास प्रवर्तल्याबद्दल दोष दिला आहे (पहा क्र. २९ ).

**विश्वासराव**--इ. स. १७४२ ते १७६१ बाळाजी बाजीराव ऊर्फ नाना-साहेब पेशवा यांचा मुलगा.

**क्र. २८**

क्र. २६ वरील टीप पहा.

पानिपतचा हा सग्राम पौष शु. ८ शके १६८२, म्हणजे १४ जानेवारी १७६१ या दिवशी झाला.

पृ. ९२ **पीळबाळा घोडा**--' दिल्पाक घोडा ' असा कांहीं ठिकाणीं उल्लेख आहे.

**समशेर बहादर**--बाजीराव व मस्तानी याचा मुलगा. पानपतावर जखमी होऊन दीग येथें इ. स. १७६१ त मरण पावला.

पृ. ९३ **इब्राहिमखान गाडदी**--

पादिचेरीतील फरेच कामगाराच्या पालखीपुढील हा साधा छडीदार पुढें अंगच्या कर्तबगारीवर स्वत.ची पलटण राखून स्वतंत्र उद्योग करूं लागला. लढणे हा याचा धदा असला तरी तो वचनाचा सच्चा होता व भाऊसाहेबांस दिलेले इमान त्यानें प्राणपणानें राखलें.

पृ ९६ **वानरतेल निघालें**- अविचाराने वागल्यामुळे सर्वनाश झाला. ' वानरतेल निघणे ' हा एक रूढ वाक्प्रचार असून त्याचें मुळ पंचतंत्रांतील एका कथेत (पंचतत्र, ५–१०) आहे. (पहा महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश, भाग २. पृ. ४९८ )

**क्र. २९**

नाना फडणीस (इ स. १७४२ ते १८००) हा मराठेशाहीच्या अखेरच्या काळातील एक थोर मुत्सद्दी. नानाचें सबंध नांव बाळाजी जनार्दन भानू. फडणिशीचीं वस्त्रे नानाला वयाच्या १४ व्या वर्षी मिळालीं. पानपताच्या पळात भाग घेणाऱ्या मानानेंच पुढें बारभाईचें कारस्थान यशस्वी केलें व मराठेशाहीला नवें वैभव आणून दिलें. नाना बुद्धीनें तेजस्वी, वृत्तीनें खिन्न प्रकृतीने अशक्त, व मनाने धार्मिक होता. आपल्या ' आत्मचरित्र्यां ' त

त्यानें माधवरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळेपर्यंतचा वृत्तांत लिहिलेला असून हें आत्मवृत्त मोठें सडेतोड उतरलें आहे.

पृ. ९६ **पित्याचा काळ** – पिता, जनार्दन बल्लाळ भानू

**श्रीरंगपट्टण** – ही स्वारी इ. स. १७५५–५६ मध्यें झाली.

पृ. ९७ **चरमण्वती** – मंबळा नदी.

पृ. ९८ **पृथ्वीपती** – जवानबख्त या नांवाचा दिल्लीच्या तख्तावर भाऊंनीं बसविलेला शहाजादा.

**उत्तरेकडील यवन** – अहमदशहा अबदाली पठाण.

पृ. ९९ **बापूजीपंत** – हरिपंत फडके यांचे ज्येष्ठ बंधु.

पृ १०० **रामाजीपंत** – रामाजी अनंत दाभोळकर, उपनांव काळे. शिंद्यांचा दिवाण.

पृ १०१ **पुरुषोत्तम महादेव** – उपनांव हिंगणे.

पृ. १०२ **गुरुजीजवळ** – महादाजी बल्लाळ करकरे गुरुजी.

**क्र. ३०**

प्रस्तुत उतारा 'हरिवंशाच्या बखरी' तील आहे. हरभट हा जो पटवर्धन घराण्याचा मूळ पुरुष त्याच्या वंशजाच्या म्हणजे पटवर्धन सरदारांच्या हकीकती बखरीत असल्यामुळे ही 'ही हरिवंशाची बखर' म्हणून प्रसिद्ध आहे. बाळकृष्णराव हरिहर पटवर्धन, आंबेकर, हा बखरकार असून बखरीचा लेखनकाल "शके १७६४ शुभकृन्नामसवत्सरे वैशाख शु. ५ इंदुवार" असा आहे. ग्रंथसमाप्ति "मु. आंबे, नजिक श्रीक्षेत्र पंढरपूर, श्री भीमातीर, श्रीउत्तरेश्वरसंन्निध" झाली. बखर अव्वल इग्रजीत रचिली गेली हें उघड आहे. बखरीत ऐतिहासिक सत्याचा विपर्यास नसला तरी स्थलकाळव्यक्तिविषयक चुका भरपूर आहे. लेखक माहितगार, हौशी, अभ्यासू व चौकस दिसतो. तसेंच बखर एकतर्फी नाही. बखरीची फलश्रुति सांगताना बखरनवीस लिहितो— "हे श्रमें करून वाचिल्यास मनोरथ पूर्ण होतील व वंशवृद्धि होईल. याची फलश्रुति हीच. हरीवंशीचे कीर्तीचें वर्णन करील व हरिवंश वाचील त्याचे वंशाची वृद्धि होईल. या वंशाची प्रत लिहून जो आपलें गृहाचे ठायी संरक्षण करील त्यास दुःख–दारिद्र्य प्राप्त होणार नाहीं याप्रमाणें फलश्रुति असे."

प्रस्तुत उतारा नारायणराव पेशव्याचे वधप्रसंगीचा आहे. आनंदीबाईनें 'ध' चा 'मा' केला या म्हणण्यास सबळ असा ऐतिहासिक पुरावा नाही.

पृ १०३ सासुरवाडी—कृष्णाजी हरि साठे याचे घरी.

क्र. ३१

प्रस्तुत उतारा कृष्णाजी विनायक सोहनीकृत पेशव्यांच्या बखरीतील असून त्यात सवाई माधवराव पेशव्याच्या विवाहाचें वर्णन आहे. हा समारंभ शके १७०४ ( फेब्रुवारी १७८३ ) मध्ये पुण्यात साजरा झाला. नारायणराव पेशव्याच्या वधानंतर नानाआदि बारभाईनी केलेल्या कारस्थानाचे प्रत्यक्ष फळ म्हणजे सवाई माधवराव. साहजिकच हा समारंभ पाहून बारभाईच्या डोळ्याचे पारणें फिटावे यात नवल नाही. यावेळी सवाई माधवरावाचें वय अवघे ९–१० वर्षाचें होतें हा त्यांचा प्रथम विवाह व टोकेकर थत्ते याची कन्या ही त्याची पहिली बायको. ही पुढे दहा वर्षानी वारली तेव्हा सवाई माधवरावाने दुसरे लग्न केले.

क्र. ३२

प्रसिद्ध बखरकार मल्हारराव चिटणीस याच्या हातची एक 'राजनीति' उपलब्ध असून ती सप्तप्रकरणात्मक आहे. प्रस्तुत उतारा त्यातील 'बल-प्रकरणां' तून निवडला आहे.

क्र. ३३

ज्या 'आज्ञापत्रा' तून प्रस्तुत उतारा निवडला आहे त्या 'आज्ञापत्रा' चें कर्तृत्व संशयित आहे. हें प्रकरण आजवर रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांच्या नावावर ओळखले व छापलें गेलें असले तरी अंतर्गत प्रमाणावरून तें अमात्यकृत नसावें असें वाटू लागतें. 'आज्ञापत्रा' च्या प्रारंभी तें शंभू छत्र-पतीनें ( म्ह राजारामास राजसबाईपासून झालेला संभाजी ) रामचंद्रपंत अमात्यास उद्देशून लिहिल्याचा स्पष्ट असा उल्लेख आहे. प्रो. कोलते यांच्या मतें शंभू छत्रपतीचा पंतप्रधान नीळकंठ मोरेश्वर पिंगळे हा आज्ञापत्राचा

खरा लेखक असल्याची शक्यता फार आहे. या प्रश्नाच्या सविस्तर विवेचना साठी अभ्यासकानी 'आज्ञापत्रा' स ( वीणाप्रकाशन, नागपूर, १९४५ ) जोडलेल्या प्रो. पांढरीपांडे व प्रो. कोलते या विद्वद्वयाच्या प्रस्तावना पाहणें.

'आज्ञापत्रा' ची रचना राज्याभिषेक शक ४२, म्हणजे इ. स. १७१६ मध्यें झाली. त्याचें कर्तृत्व कोणाकडेहि जावो, हें राजनीतिविषयक प्रकरण विचार-दृष्टया व भाषादृष्टया अमोल आहे यांत कांही शका नाही. त्याची एकूण प्रकरणे ९ असून प्रस्तुत ५ व्या प्रकरणात इंग्रजासारख्या घरघेऊ व्यापाऱ्याशीं कसें सावधगिरीनें वागावें याचें मार्मिक विवेचन आहे. ही राजनीति रचणारा राजकारणांतील मुरब्बी असावा असें पदोपदी वाटतें.

### क्र. ३४

हें अमोल पत्र रामदासांच्या हातचें आहे. शके १५९६ च्या चातुर्मासांत रामदास हेळवाकच्या घळीत होते, व पुढें तेथें शीतबाधा झाल्यामुळें तिकडील कार्ये दिवाकर गोसाव्यांचे व्याही रघुनाथभट गोसावी यांजवर सोंपवून ते चाफळच्या उष्ण हवेंत परतले. त्यानंतर लगोलग रघुनाथ भटास लिहिलेल्या या पत्रांत समर्थ आपलें हृदय व्यक्त करीत आहेत. मूळ पत्र धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत सुरक्षित आहे.

### क्र. ३५

**मशारुल अनाम** – लोकप्रसिद्ध ; लोकमान्य ( मशारुल = प्रसिद्ध; अनाम = लोक ) एक फारसी मायना.

**जुमलेदारानी** – इ. ही प्रथमेची अनेकवचनीं रूपें आहेत.

**दिमत पायगो** – पागेसबधीच्या.

### क्र. ३६

मामले प्रभावळीचा सुभेदार जिवाजी विनायक यानें आरमाराचा ऐवज व गल्ला नेमल्याप्रमाणें पावता केला नाही याबद्दल शिवाजी त्यास ताकीद देत आहे.

क्र. ३७

राजकारण तर साधावें, पण भाऊपणाहि तुटू नये अशा धोरणानें शिवाजी आपला सावत्र भाऊ व्यंकोजी याच्याशी वागत होता. प्रस्तुत पत्रांत शिवाजीचा आत्मप्रत्यय व त्याचें थोर मन व्यक्त होत आहे.

क्र. ३८

हें पत्र म्हणजे शिवाजीनें चाफळ मठास दिलेली सनद होय. रामदासांनीं शके १५७० मध्यें चाफळास श्रीची स्थापना केल्यापासूनचा त्यांचा व आपला ऋणानुबंध शिवाजी या सनदेंत वर्णीत आहे. सनद ऐतिहासिक दृष्टचा महत्त्वाची असून शिवसमर्थयोग हा शके १५७१ पासूनचा आहे व रामदास हे शिवाजीचे स्फूर्तिस्थान होय या मतास ती बळकटी आणणारी आहे.

क्र. ३९

आपण दक्षिण जिंकल्यानें आपला सावत्र भाऊ व्यंकोजी हा मनानें उदास व निष्क्रिय झाला आहे हें पाहून शिवाजी प्रस्तुत पत्रात त्याची समजूत काढून त्यास कार्यप्रवृत्त करीत आहे.

**श्रियासह** – वैभवयुक्त

**कैलासवासी स्वामींनीं** – शहाजीने.

क्र. ४०

रामदासांच्या पश्चात् त्यांचे शिष्य दिवाकर गोसावी व उद्धव गोसावी या दोघात कांही तंटा उत्पन्न झाला. त्या प्रसंगीं समर्थ-संप्रदायास कलक लागूं नये या बुद्धीने समर्थशिष्य कल्याणस्वामी दिवाकरास गौरवून त्याची समजाविशी करीत आहेत.

**श्रीशिवथरचे घळीस** – दासबोधाच्या कांहीं भागाचें रचनास्थळ.

**हा महाबळेश्वरकर आहे** – दिवाकर गोसावी हा मूळचा महाबळेश्वरचा. रामदास त्यास ' दुराखी मोहरा ' म्हणत.

४१

संभाजीचे पश्चात् मराठी राज्यावर आलेल्या प्राणसंकटांतून त्यांस वांचवावे या एकाच हेतूनें पंत अमात्य, संताजी घोरपडे, धनाजी जाधव ही सर्व मंडळी झगडत असतां एकमेकांत निष्कारण गैरसमज कसे उत्पन्न होत हें या पत्रावरून दिसतें.

**क्र. ४२**

कर्जानें हैराण झालेला बाजीराव प्रस्तुत पत्रांत आपले गुरु ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांजपाशी रडगाणे गात आहे. या गुरुशिष्याची तुलना रामदास व शिवाजी या जोडीशी करण्यासारखी आहे. ब्रम्हेंद्रस्वामी ( इ. स. १६४९ ते १७३८ ) हे मूळचे वऱ्हाडांतील. येत येत ते धावडशीला येऊन राहिले. छत्रपति शाहू व पहिले बाजीराव यांचे ते गुरु असल्यानें, व त्याहिपेक्षां स्वभावच उलाढाल्या असल्यानें स्वामीना तत्कालीन राजकारणात महत्व आलेले दिसते. ( पहा–चरित्र व पत्रव्यवहार, पारसनीस ).

**चिरंजीव तुझा** – स्वतः बाजीराव.

**श्रीरंगपट्टणचे वेळेस** – इ. स. १७२७ तील श्रीरंगपट्टणची मोहीम.

**मीन आम्ही** – माशाप्रमाणें गरीब जे आम्ही.

**क्र. ४३**

बाजी रेठरेकर लढाईत पडल्यावर स्वतः बाजीराव पेशवा त्याच्या आईचें पत्रद्वारे समाधान करीत आहे.

**क्र. ४४**

आपला अल्पवयी मुलगा रघुनाथराव यास बाजीराव पेशवा प्रस्तुत पत्रद्वारे पढवीत आहे. बाजीरावाच्या मनांत रामदासांची ती प्रसिद्ध चतुःसूत्री असावी काय ?

**चाणाख्य** – चाणाक्यनीति.

**मातुःश्रीबाई** – राधाबाई ( डुबेरकर बर्वे घराण्यांतील ).

**ताई** – काशीबाई ( बाजीरावाची बायको; चासकर महादजी कृष्ण जोशी याची कन्या ).

**अनुबाई** – घोरपडे घराण्यांत दिलेली बाजीरावाची बहीण

**गोविंदराव** – खंडोबल्लाळ चिटणीसाचा मुलगा. हा शाहूचा चिटणीस असून त्याच्या मर्जीतील होता.

**क्र. ४५**

बाळाजी बाजीरावाने सरदार नाना पुरंदऱ्यांस लिहिलेले हे रूपकात्मक पत्र मोठे सूचक आहे. पैशाचा ओघ उत्तरेकडून व दक्षिणेकडून पुण्याकडे सतत वाहता असावा, मराठे सरदारानी तो मध्येंच स्वत:कडे वळवून घेऊं नये हें पेशवा सुचवीत आहे.

**कैलासवासी यांनीं** – बाळाजी विश्वनाथ.

**चोविस वर्षे** – इ. स. १७१९ ते ४३.

**मागें रघूजी फत्तेसिंग** – इ. स १७२५–२६ मध्ये नागपूरकर रघूजी भोसले यानी.

**एक कावेरी मात्र** – कावेरीस बधारे घालून तिचें पाणी तामीळनाडात खेळविलें होते.

**गौणजनकार्य** – मधल्या सरदाराचें.

**क्र. ४६**

शिंदे-होळकरांतील तेढ इतिहासात प्रसिद्धच आहे. हे दोघे एक होऊन घरभेद नाहीसे व्हावे या बुद्धीनें प्रस्तुत नानासाहेब पेशवा शिंद्यांचा कारभारी रामचंद्रबावा याची समजूत काढीत आहे.

**उमद्या उमद्यांचें** – थोरामोठ्यांचे.

**क्र. ४७**

रामदासी संप्रदायांतील एक महंत मुद्गलस्वामी हे निधन पावले त्याप्रसंगीं भालगावचे मठपति खंडेरावस्वामी हे डोमगावचे मठपति भीमाजी व रामजी यांचें सांत्वन करीत आहेत. पत्रांतील रामदासी वळण स्पष्ट आहे.

क्र. ४८

पटवर्धन–घराण्यांतील शूर पुरुष गोपाळराव गोविंद यास दौलताबादेच्या मोहिमेवर पाठविलें असताना तो सरळ हल्ला न करता राजकारण चालवितो हें पाहून नानासाहेब पेशवा त्यास ताशेरा लिहून त्याचे रागलोभ खिजवीत आहे.

**उभयतां चिरंजीवांनीं** – सदाशिवराव भाऊ व रघुनाथराव दादा.

क्र. ४९

पानपतचा तडाखा मराठेशाहीस असा काहीं जबरदस्त बसला, कीं त्यामुळें दौलतीच्या तणावाच तुटत चालल्या. अशा बिकट परिस्थतीत अवघा अठरा वर्षांचा माधवराव पेशवा मातुःश्री गोपिकाबाईस राज्याच्या भवितव्याविषयीं मोठ्या पोक्त बुद्धीनें लिहीत आहे.

**कारभारी यांचे** – सखारामबापू बोकील.

**नासले त्यास** – एक रघुनाथराव दादा घरभेदी निघाले, त्यात आपणहि तसेंच केल्यास सर्वस्वाची हानि होईल.

क्र. ५०

आनंदीबाई स्वभावाने कशीहि असो, मराठी राज्य इंग्रजांच्या घशात जात आहे याची तिला तीव्र जाणीव होती हे प्रस्तुत पत्रावरून स्पष्ट होतें. सखारामबापू बोकील हा पेशवाईतील नाना फडणिसांचा प्रतिस्पर्धी. बापूचा ' प्रतिसृष्टि करणारा, ' ' शहाणा ' असा उल्लेख समकालीन पत्रव्यवहारांतून आढळतो. ' सख्या, देवा, विठ्ठला ' या तत्कालीन तीन पूर्ण शहाण्यांत अग्रपूजेचा मान सखारामबापूकडे आहे. तेव्हां आनंदीबाईनें संकटसमयी त्याच्याकडे धांव घ्यावी यांत नवल नाही. या समयी ती धारच्या किल्ल्यांत अटकेंत होती.

**हुजुरचीं पत्रें** – राघोबादादाचीं.

**नवी भावजय** – सखारामबापूनें उतार वयांत दोन–तीन लग्नें केलीं, म्हणून हा टोमणा आहे.

क्र. ५१

विठोबादादा चातुर्मासे हे कविवर्य मोरोपंताचे समकालीन सत्पुरुष. मोरोपंतांनीं विठोबादादांना एकूण चाळीस एक पत्रें लिहिली असून त्यांत स्वतःच्या नवकाव्यनिर्मितीचें निवेदन केलें आहे. प्रस्तुत पत्र भारतरचना-काळांतील आहे.

**श्रीमंताजवळ** – मोरोपंताचे यजमान बाबूजी नाईक बारामतीकर.

**आपलाहि समाज श्रीक्षेत्रीं** – विठोबादादा परिवारासह पंढरपुरी.

**श्रीगुरुपुत्राकडील** – हे गुरुपुत्र म्हणजे पंतांचे गुरु केशव पाध्ये यांचे पुत्रद्वय सदाशिव व यज्ञेश्वर यांपैकीं एक असणार. कारण आपल्या 'गंगा-वकिली'त पंतांनी "मद्‌गुरुपुत्र सदाशिव यज्ञेश्वर यांसि भेट दे यश दे" (गं. ७८) याप्रमाणें त्या दोघांची वकिली केली आहे.

**जन होतो** – स्वतः मोरोपंत.

**मैराळबाबा** – हे विठोबादादांचे पुत्र पंतकाव्याचे भक्त होते.

क्र. ५२

सवाई माधवरावाची आजी गोपिकाबाई ही नाशिकनजिक गंगापुर येथे वास्तव्य करून होती. आपल्या होतकरू नातवास प्रस्तुत पत्रद्वारें ती राज-नीतीचे धडे देत आहे.

**वडिलीं सर्वत्याग** – विरक्त गोपिकाबाई.

**सूर्यग्रहणसंधि** – नारायणरावाचा खून हें सूर्यग्रहण व सवाई माधव-रावाचा जन्म हा पुण्योदय.

**कागदावर निशाणें** – 'आज्ञा प्रमाण' ही लिखिताच्या अखेरची मुद्रा.

**गुरुजी** – (कलम १) – महादाजीबल्लाळ गुरुजी. थोरल्या माधवरावाचा इतबारी.

**सर्वाक्ष देऊन** – सर्वांकडे कटाक्ष टाकून.

**दिल्ली प्रकरणीं** – दिल्लीकर मोगल व शिवाजी यांच्यांतील प्रसंगाविषयीं.

**ताईसाठीं** – पेशव्याची आजी (आईची आई).

क्र. ५३

नाना फडणिसास कलाकुसरीच्या वस्तूंचा व चित्रांचा संग्रह करण्याचा नाद होता. या कामी शंकराजी सखदेवानें नानासाठीं दिल्लीत जी खटपट तिचा वृत्तांत प्रस्तुत पत्रांत आहे.

**या काळाप्रमाणें** – नवीन धर्तीच्या, आधुनिक.

क्र. ५४

अलीबहादर हा समशेरबहाद्दराचा मुलगा, म्हणजे पहिल्या बाजीरावाचा नातू. त्यास कृष्णसिंग असेहि म्हणत. धर्मानें मुसलमान असूनहि हा पेशव्यांचा अभिमानी व कृष्णभक्त होता. वि. ल. भावे- संपादित ' मराठी दप्तरा 'तील बहुतेक सर्व पत्रव्यवहार अलिबहादराच्या घराण्यातीलच आहे. प्रस्तुत पत्र अलिबहादरास त्याच्या आईनें म्हणजे मेहरबाईनें मथुरेहून पाठविलेले असून त्यावरून ही बाई, ' अनेकरूप ' राजनीतीत प्रवीण दिसते.

पृ. १४४ **पाटीलबावा** – महादजी शिंदे. याचे व अलिबहादराचे प्रथम चांगले असलेलें संबंध हिंमतबहादराच्या प्रकरणापासून बिघडले व दोघांत उघड विरोध सुरू झाला.

पृ. १४५ **गोसावी** – हिंमतबहादर गोसावी. याच प्रकरणात महादजी शिंदे व अलिबहादूर यांचें वाकडें आलें.

पृ. १४५ **दिनकरपंत** – दिनकर बल्लाळ गोरे अलिबहादरचा पुण्यांतील खाजगी कारभारी.

क्र. ५५

अलीबहादर स्वारीवर गेलेला असतांना त्याच्या घरांतील कटकटी त्याचा पुण्यातील खासगी कारभारी दिनकरपंत गोरे हा त्यास प्रस्तुत पत्रातून कळवीत आहे. पत्राचें महत्त्व सामाजिक व भाषिक असें दुहेरी आहे.

**रहिमतबिबी** – अलिबहादराची राख.

क्र. ५६

सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत मराठ्याचा ध्वज उत्तरेकडे फडकावून महादजी शिंदे बारा वर्षांनी म्हणजे इ. स. १७९२ मध्ये पुण्यास परतले, तेव्हा बादशाही फर्माने स्वीकारण्याचा समारंभ पुण्यास झाला. त्यास फर्मान-वाडीचा दरबार असे म्हणतात. या प्रसंगाची वर्णने नाना फडणिसाने पेशव्याचा निजामाकडील वकील गोविंदराव काळे यास लिहून कळविली. ती वाचून झालेले समाधान गोविंदराव काळे प्रस्तुत पत्रात नानापाशी व्यक्त करीत आहे.

**ऐशियास** – येथवर नानाच्या पत्रातील मथितार्थ असून येथून पुढे त्या पत्रावरील गोविंदरावाचे भाष्य आहे.

**चकत्यांनीं** – झगताईखानाच्या वंशजांनी; मोगलांनी.

क्र. ५७

**श्रीलक्ष्मीनारायणकल्याण नाटक** –– तंजावर येथील ' सरस्वति-महाला ' त जी अनेक प्राचीन मराठी नाटके आहेत त्यांपैकी हे एक होय. ते प्रथम उजेडात आणण्याचें श्रेय कै. राजवाड्याचें आहे. नाटकाचा कर्ता कोण हे समजत नाही. शाहू राजाच्या नांवावर मोडत असले तरी ते त्याचेंच असेल असें म्हणवत नाही. कोणा आश्रिताने काव्य रचून त्याचें कर्तृत्व आश्रय-दात्या राजाकडे देण्याची परंपरा जुनीच आहे. तसा काही प्रकार येथें असण्याची शक्यता आहे. प्रस्तुत शाहू राजा किंवा शहाजी हा व्यंकोजीचा वडील पुत्र. व्यंकोजीच्या पश्चात् तंजावरचें राज्य याच्याकडे आले. तो विद्याकलांचा भोक्ता असून कवींना आश्रय देई. हे नाटक शहाजीच्या मृत्यू-पूर्वी म्हणजे इ. स. १७०० च्या सुमारास रचिले गेले असावें. नाटकांत पदें पुष्कळ असून त्यांपैकी येथें कांही थोडींच घेतली आहेत. नाटक एकांकी असून संगीतमय आहे. नाट्य ही पदवी त्यास कितपत शोभेल याचीहि शंकाच वाटते. सूत्रधाराची भूमिका प्रमुख असून संविधानक जुळविण्यासाठीं तो कथाभाग एकसारखा सांगत आहे.

दरु -- (तामीळ 'तरुवु' सं. ध्रुव ?) मद्रास विद्यापीठानें प्रकाशित केलेल्या तामीळ भाषेच्या शब्दकोशांत 'तरुवु' या शब्दाची व्याख्या पुढील-प्रमाणें आढळते --"A Stage-song in a peculiar metre and tune," (Tamil Lexicon, Vol. III, p 1767.) अर्थात् दरु म्हणजे नाटकांतील पद. पात्र रंगभूमीवर प्रवेश करतें तेव्हां बहुशः 'दरु' म्हणण्यांत येते.

---

# शब्दकोश

(१) कोशांतील आंकडे मूळांतील क्रमांकांचे आहेत. (२) संक्षेपांचा खुलासा इं.– इंग्रजी; क. कन्नड; ता. तामीळ; फा. फारसी; सं. संस्कृत.

**अकृत्रिम** ४५. सामान्यजन.
**अजब** ३६. (फा.) आश्चर्य.
**अटण-न** ९, ५, ११. भ्रमन्ती.
**अंदू** २६ (फा.) साखळदंड.
**अधींत** ११. धारण करण्यास अशक्य.
**अनाम** ३४. (फा.) लोक.
**अनुकार** ७, ८, ९, १२, अंगविक्षेप.
**अप्रास्य** ९. कष्ट; उपासतापास.
**अबधी** १४. (सं. अबद्ध)
**अर्ग्यें** १४. (सं. अर्घ्य).
**अर्जणें** ३९. मिळविणें.
**अर्जदस्त** १५. (फा.) विनंतिपत्र.
**अवकाळ** ९. अकाली.
**अवंदा** ४२. यंदा.
**अवसीं** ८. तिन्हीसाजा.
**अवस्वरु** १०. अवसर; समय.
**असामी** २८. (फा.) व्यक्ति.
**आसि** २. बाजारांतील मालावरील कर.
**असुध** ७. (सं. अशुद्ध) रक्त.
**अहेवपण** २६. सौभाग्य.
**आइत** १३. तयारी; सिद्धता.
**आकर्खिणें** १०. (सं. आ-कृष्) ओढणें.
**आगळा-ळी** ३. अधिक.
**आंगीं** ६. आंगरखा.
**आंचळें** ११. (सं. अंचल) अपुरें; तोटके. (ऋद्धिपूर,८४).
**आजार** ३५. (फा.) उपद्रव.
**आझुई** १२. अद्यापि; अजूनहि.
**आढें देवढें** ११. आडवेतिडवे(?).
**आण** ७.(सं. आज्ञा) वचन; शपथ.
**आदब** ३१. (फा.) मुजरा; वंदन.
**आदा** ३६. (फा.) भरणा.
**आधारींचा** १२. संग्रहांतील; जवळचा.
**आन** ६. (सं. अन्यत्) आणि.
**आपजौनि** ११. मुद्दाम; आवर्जून.
**आपणपें** १४. स्वयमेव, स्वतःसिद्ध.
**आपैसें** १४. आपोआप.
**आबादान** ३३. (फा.) सुरक्षित.
**आमदरफ्ती** ३३. (फा.) ये–जा; दळणवळण.
**आरत** १४. (सं. आर्त) उत्कट इच्छा.

**आरल** ११. फूल.
**आरावा** २८. तोफांचा मार.
**आरोगण-णा** ७. भोजन.
**आरोग्यवाउळी** १०. भोजनोत्तरची शतपाउली.
**आलापाला** १२. कोवळया डिगऱ्या.
**आवरोध** ४७. अडथळा.
**आसू** २. एक यादवकालीन नाणे
**आस्थानि** ९. सभा.
**आस्वपात** ९. (स अश्रुपात ).
**आहाचपण** ११. वरवरचें; दिखाऊ.
**आळीव** १०. आळवलेल्या.
**आळोंचु** ११. कानगोष्ट; हितगुज.
**ईखीति** १०. (सं. ईषत्) किंचित्.
**इज्जत** ३५, ३७. (फा.)अब्रू; प्रतिष्ठा.
**इतबारी** ५४. ( फा. ) विश्वासू.
**इतमाम** ३१. (फा. ) सन्मान.
**इमान** २८. (फा.) वचन.
**इरेनें** २६. अटीतटीनें; निकराने.
**इस्तमेल** ३१. (फा. इस्तकबाल) सामोरे.
**उगवणें** ७. गुता सोडविणें.
**उगाणा** ७. कारकून; हिशेबनीस.
**उजुवाड** १४. उजेड, प्रकाश.
**उघटणें** २.(सं उद्–घट्) मांडणें; उघडणें.
**उजरी** २६. उदय; उत्कर्ष.
**उतर** १४. (सं. उत्तर) वचन.
**उद्दीम** १३, ३३. ( (सं उद्यम).
**उपंगळी** ७, ८, ९. खादा.
**उपतिष्ठणें** ३९. प्राप्त होणे.
**उपहुड** १०. उठणे.
**उपरी** ७. माडी.
**उपराळा** २३. मदत.
**उपाणौ--णहौ** १०. (सं. उपानह). वहाणा.
**उपेगु** १४. (सं. उपयोग).
**उंवर** ८. भोक नसलेला वडा.
**उब** १० ऊन्ह.
**उभड--डा** २६. हुंदका.
**उरोधणें** १२. विरोध करणें.
**उल्लोच** १९. (सं ) छत; मंडप.
**उवाया** ९. लघुशंकेस.
**एकदांच** १६, १९, २६, २८, ३१. एकदम; एकसमयावच्छेदेंकरून.
**एकदील** २४, २६,४६. एकमताचे.
**ओखटी** ७, ११ वाईट.
**ओडवणें** ११ पुढें करणें.
**ओडेर–रि** ३. (क. वोडेर)धनी ; प्रभु.
**कजाखी** २४. साहसी; लढाऊ.
**कटंकटी** ११. पातळ पत्र्याचा होणारा कडकड असा आवाज.
**कटकै** ८. भ्रमन्ती; वनवास.
**कठिया** १२. गुरव; पुजारी.

**कडनिकड** २८. अटीतटी; गर्दी.
**कडिसरां** ११. बाजूस; कडेस.
**कनवृत्ति** ७ कणकण भिक्षा मागून राहण्याचे व्रत.
**कपाट** ११. (सं.) गुहा; दरी.
**कपाट** २९ (स.) कवाड; दार.
**कबिला** २६. बायकामुले, परिवार
**कमकसर** २९. (फा). कमीत कमी.
**कमाविसदार** १५ (फा.) वसुलाचा अधिकारी.
**कऱ्हा** १२. मातीचा घट.
**कर्जवाम** ३३. (फा.) ऋण.
**कयासा** १५–१. (फा.) विचार; अनुमान.
**करणी** १४, कृत्य; चरित.
**करदन** ५२. (फा) बेरीज–वजाबाकी.
**करीणा** १८. (फा.)अनर्थ.
**कलगी** ३१. पागोट्यावरील रत्नखचित शिरोभूषण, तुरा.
**कलम** १५. बाब; विषय.
**कलवड** २६. शेणामातीनें आच्छादिलेला गोवऱ्याचा ढीग.
**कवडा** १२. वडी; गोळा.
**कसबे** १५. परगण्याचें मुख्य ठाणें; जुनी वसाहत.
**कसाला** १५. (फा.) पीडा; दु.ख.
**काईत** ५३. (सं. कायस्थ).
**कांटाळा** १२. थरकांप; हुडहुडी.
**कानवडा** १०. आडपडदा. (सं. कृष्णपट्ट–?).
**काबू** ५८. (फा) बदोबस्त.
**काफरशाही** ५६. (फा.) नास्तिकाचे, चोराचे राज्य.
**कार्याकारणें** ४५, ५२. कामापुरते.
**कारखाना** १९, २१ (फा) उद्योगशाळा; खाते.
**कारिगर** ५३. (फा) कारागीर, कलावन्त.
**कारिगिरी** ४६. (फा) कारस्थान; करामत.
**कारुवेळारुवे** ११. कामकरी लोक; मजूर.
**काश** १५ (सं) कासे गवत.
**काष्टी** १०. समाधि.
**किडडी** ८. तिरडी.
**किनखाप** १९. (फा.) बहुरंगी जर्तारी कापड.
**किमया** ५६. (फा) अद्भुत, अलौकिक कृत्य.
**किवी** १२. (स. कीटकी) कीड.
**कुजांतर** १२. (सं. कुयंत्र) तंत्रमंत्र, चेटुक.
**कुमक** २६, २८. (फा.) मदत; उपराळा.
**कुल** १८, २८, ५३. (फा.) सर्व.

**कूपकांटी** १२. कांटेरी कुंपण.
**केणें** २. ( सं. क्रयण ) बाजारांत आलेला विक्रीचा माल.
**कैची** २६. दारूच्या बाणांची जुडी.
**कैली** ४४. मापी ( हिशेब ).
**कोठी** ७,५० कोठावळा; वखार.
**कोथळा** १२. भरलेले पोते.
**कोनटा** ११; १२. कोपरा.
**कोना** ५५. कोपरा ; मर्यादित भाग.
**कोपरदुटी** ११. कोपराइतके येणारे वस्त्र; पटकुर.
**कौल** १५. आश्वासन ; अभय.
**क्रिया** २७. वचन; शपथ.
**खडी** १६. उचवटा, टेकडी.
**खडू** १२. गवत; चारा.
**खरस** २८. फेस, थुकी.
**खराबी** २७.(फा.)दुर्दशा, हलाखी.
**खलक** ३५. (स.) नीच; क्षुद्र.
**खवासखाना** २८, ३१. (फा.) अबारीत खाशाच्या मागील मानकरी. बसण्याची जागा.
**खळाळ** ११. हिंस्र पशूचें वसति-स्थान.
**खळी** ११. खाच; खड्डा.
**खळीव** ९-१. खळ लावलेलें; कोरें.
**खाड** ७. वस्त्र.
**खाड** ८. दाढी.
**खांडणें** १२. (सं. खंड्) तोडणें; कापणें.
**खांडणी** १०. विभाग.
**खांडदेउळी** ११. भग्न, मूर्तिशून्य देऊळ.
**खांडें** ७, ११. तरवार.
**खातर** २७. विचार; हिशेब
**खानदान** २८. अभिजात; थोर कुळांतील.
**खामखा** ४६. (फा ) कांही झालें तरी; निश्चयें-करून.
**खामी** २४. (फा ) नुकसानी; खराबी.
**खावणी** ११. युक्ति; कला.
**खावंद** २६, ३३. (फा.) धनी; मालक.
**खाशानिशीं** २८. जातीने; स्वतः.
**खांसा** २६, ३७. श्रेष्ठ; मातबर; स्वतः.
**खासवदार** ३१. (फा. खासबदार) खाशाचा बदुक्या.
**खिचटें** १२. खिचडी.
**खिजमतगार** २५, २६, २८, २९, ३०, ३१, ५२, सेवक, हुजऱ्या.
**खीळी** १०. कडी; खीळ.
**खुदावंत** २४. (फा.) प्रभु; खावंद.
**खुररव** १२. (सं. क्षुर–) पायाच्या खुरानी तुडविणें; खुदळणें.
**खुषवक्त** ३१. संतुष्ट; खूष.
**खून** ३०. (फा.) रक्त; धुंदी.

**खेत** २८. (सं. क्षेत्र).
**खेमा** १४. (सं. क्षमा).
**खैरी** १२. घाण्याचें लाकूड.
**खोलबुंथी** १०. डोक्यावरून घेतलेला बुरखा.
**गडद्रा** ११. खांचखळ्गा
**गडी** ११. दोन भाषांचा सीमाप्रांत (टीपा पहा).
**गनिम** २३, ३३, ३६. (फा.) शत्रु.
**गनि-ली-म** २६. मराठे; लुटारू.
**गयफ** २८. (फा.) अदृश्य.
**गर्द-र्दी** २७, ३७, ५३. नाश; क्रांति; घालमेल.
**गर्मा** १८ (फा.) उष्मा.
**गरगशा** १९. (फा.) गोंधळ; दगल.
**गव्हर** ११. गुहा; गुफा.
**गळदंडा** १०. गळ्यांतील हार.
**गाडदी** २८, ३०. (इं. गार्ड).
**गाशा** ३० आच्छादनाचें कापड; पातळ गादी
**गिराईक** ५०. ( सं. ग्राहिक ) धनी; मालक.
**गंडा** १२. (फा.) दगड; गोटा.
**गुढारिला** ११. शृंगारलेला.
**गुदडी** २९. मठ; आखाडा.
**गुमास्ता** २९. मुनीम; प्रतिनिधी.
**गुळळा** ८. गुळणा; चूळ.

**गैब** १८. (फा.) गुप्त; अदृश्य.
**गैरवाखा** ५२. ( फा. ) बनावट हकीगत.
**गो** ३७. ‘गोसावी’ याचा संक्षेप.
**गोट** २८. तळ; छावणी.
**गोंडीबुंथी** ११. गोंड लोकांच्या पद्धतीचें डोक्याचें टोपरें.
**गोमटें** ११. बरें; चांगलें.
**गोरुवें** ७. गुरे
**घंटा** १२. समूह.
**घरैंतेवरैंते** ११. नवराबायको; दांपत्य. (अमृतानुभव, १-४९).
**घृणा** १२. (सं.) दया; अनुकंपा.
**चराठी** २३. चऱ्हाट; पाल्हाळ.
**चाटे** ७. ब्राह्मणपुत्र ; कापडव्यापारी..
**चांदोवा** १०. छत्र; छत्राकार.
**चिंतणिका** ४४, ५२, चिंतन.
**चीरचोळी** ८. साडीचोळी.
**चुची** ८ (सं. चूचुक) स्तनाग्र.
**चोखट** १० शुद्ध; स्वच्छ.
**चोपाळा** २९ चौपाळा; झोंपाळा.
**चौथ्रा** २६. चबुतरा.
**छबी** २६. तोंडावरील तेज; मुद्रा.
**छाटा** २४, २६. टप्पा; अंतर.
**जगती** ९. मठाचें आवार.
**जंजिरा** ३३. (फा.) जलदुर्ग;-पाणकोट.

**जतु** १०. ( सं. जयतु ). आरति.
**जप्तनमुलुक** ४१. (फा).प्रदेशजेता.
**जमेत** ३७,३९. (फा.) जमाव; सैन्य.
**जरबाब** ३३. (फा.) भरजरी वस्त्र.
**जरामिना** ३३. (फा.) रेशमी वस्त्र.
**जरू** ८. ( सं. ज्वर ).
**जलाल** ३३. ( फा. ) जुलुम.
**जळकेली** ६. (सं. जलक्रीडा).
**जाज्ती** ३५. ( फा. ) कडक शिक्षा.
**जाडी** १०. चादरीसारखें जाड वस्त्र
**जाणिव** ९. ( सं. ज्ञा ) अवस्था; हकीकत.
**जाफत** २५. (फा.) आतिथ्य; मेजवानी.
**जाबता** १९ (फा.) नियम; यादी.
**जाबसाल** २६,५५. (फा.) प्रश्नोत्तर; संभाषण.
**जिलबी** २६, ३१ (फा.) स्वारी; लवाजमा.
**जीद** ५५. (फा. जिद्) हट्ट; निकड.
**जुआर** ७. (सं. द्यूतकार) जुगारी.
**जूं** ७ (सं. द्यूत) जुगार.
**जे** ३८. (सं. यत्) कीं. (अव्यय)
**जेजाल** २८. लांब नळीची बंदूक.
**जेठी** ५२. ( सं ज्येष्ठी ) वस्ताद; मल्ल.
**जेर** ३६. (फा.) हैराण; त्रस्त.
**जेरदस्त** १५. (फा.) काबीज.
**जेहेगा** १९. (फा.) पागोट्यावरील एक रत्नालंकार.
**जोरावारी** २०. (फा.) बळजबरी; सक्ती.
**झकविणें** ६. फसविणें.
**झड** १२. जोराचा पाऊस.
**झळंबुका** १०. गुच्छ; झुबका.
**झांजरणें** १२. खरचटणें.
**झील** २६. दलदलीची जागा.
**झेला** १०. गजरा.
**टोपरें** १० टोपडें; शिरोवस्त्र.
**टोपीकर** ३३. युरोपीय लोक.
**ठावो** ८, १२. ताट; पाटपाणी.
**ठिकडें** २३ तुकडा.
**डाउ** ८. लग्नाची सुपारी.
**डांपणें** १४. झांकणे; मिटणें.
**डिंगमार** ३३. ( इं. डेन्मार्क ).
**डिळी** १२. पुरलेला लाकडी खांब.
**डुळकणें** १२. ओकणें; उलटून टाकणें.
**डेरेदांडे** २५. तंबू व राहुट्या.
**डोळी** ११. डोली.
**डोळीकार** १२. डोली वाहणारा; भोई.
**डोहणा** ४१. बखेडा; तंटा.
**ढाणक** ३०. नीच जात; चांडाल.
**तख्त** १८, ३१. (फा.) सिंहासन; नृपासन.

**तगडें** १९. पत्रा.
**तजकरा** २३. ( फा. ) दंड.
**तण** १३. (सं. तृण).
**तणावा** ४९. ताणदोर; आधार.
**तफरका** १५. (फा.) दाणादाण; हैराण.
**तमा** २७. (फा.) पर्वा, फिकीर.
**तमाचा** ५५. थप्पड, फटका.
**तमामी** ३१. (फा.) जरतारी.
**तमाशा-सा** २६, ३९, ५६ (फा) प्रदर्शन; प्रेक्षणीय खेळ; शोभा.
**तर्हुद** २९, ३१. (फा.) व्यवस्था; कसोशी.
**तलब** १५, ३० (फा.) पगाराची बाकी.
**तलाश** ५३. (फा.) चौकशी.
**तंवाई** २७. (फा.) आपत्ति; नुकसान; खोट.
**तवारीखनामा** ५५. (फा.) इतिहास; बखर.
**तसवीस** ३५. (फा.) त्रास; तोशीस.
**ताति** ११. चौकशी; विचारपूस.
**तांबतौली** १०. तांबली; तांब्याची तपेली.
**तारीफलायक** ५३. (फा.) प्रशंसनीय.
**तालेवार** २६. दैववान; भाग्यशाली.
**तावो** ८. (सं. ताप).
**तिरंदाजी** २१. (फा.) धनुर्विद्या.
**तीटत** १२. ठिबकत.
**तुता** १२. लोखंडी हातोडा.
**तुरुक** ३७. मोगल.
**तुरुकबंदी** २६. मोगलांची कैद.
**तोंगल** ८. (का. तोंगु = लोंबणें). लोंबणारे झुबके.
**तोड़गळसुरी** ९. (का. तोडु = अलंकार). मणिमंगळसूत्र.
**त्रिसुधि** ७. (सं त्रिशुद्धि) त्रिवार.
**थापु** १०. स्थापना (राजवाडे) ?
**थापे** १२. बोटें झडून थापटका झालेला भाग.
**दरकार** २३, २४ (फा.) प्रयोजन; गरज.
**दरिसन** ८. (सं. दर्शन) नजराणा; भेट.
**दरु** ११. पोटाची पिशवी.
**दरु** ५७. ( ता तरु) नाट्यगीत; रंगभूमीवरील पद.
**दरेंदरकुटे** १०. खांचखळगे.
**दरोगा** ३१. (फा.) मुख्य अधिकारी.
**दरोबस्त** १५. (फा.) सर्व.
**दस्त** १५. अधिकार; अंमल.
**दांडा** ४. गुच्छ; झुबका.
**दांडी** ७; ९; ११. पालखी.
**दादफिर्याद** २१. न्याययाचना.
**दारसंका** १०. दाराची फळी.

**दिमत** ३५, ५०. (फा.) संबंधीं; स्वाधीन; जिम्मेदारी.

**दिलेदारी** ४६. (फा.) दिलदार-पणा.

**दिशेस** ५२. शौचविधीस.

**दीं** ९. ' दिवस ' याची सप्तमी.

**दुटी** ८. दुहेरी वस्त्र.

**दुनी** १०. दुहेरी ( सं. द्विगुण]

**दुभाव** १४. द्विधाभाव; संशय.

**दुवाहीं** ७. दोही बाजूस.

**दूरंदेशी** ४८ दूरदृष्टीचा.

**देकार** १९,३१. दक्षिणा.

**देवचार** १४. सैतान.

**देहाडा** १२. शेत.

**दोहणें** ७. (सं दुह्) धार काढणे.

**दौडणें** ५६. पराभूत पावणें.

**दौलत** २१, २६, २७, ४९, ५२. (फा.) राज्य.

**दौलतखां** ३६. (फा.) राज्याचे हितेच्छु.

**धरू** ११. (सं. धृ) आधार.

**धवळा** ८. (सं. धव+ल) विवाह प्रसंगीचें वरगीत

**धाकुटा** १२. अल्पवयी; कोंवळा.

**धावणें** ९. पाठलाग; धरणें.

**धुर** ८. (सं.) श्रेष्ठ; प्रमुख.

**नगद** ३७. (फा.) रोख.

**नगारची** २६. (फा ) नौबत वाजविणारा.

**नतीजा** ३६. (फा.) शिक्षा.

**नरमी** ३७ (फा.) नम्रता, सौम्यता.

**नहर** १९. (फा ) पाट; कालवा.

**नक्ष** ४६. (फा ) नांवलौकिक.

**नाकार** ५३. (फा.) निरुपयोगी;

**नाचीज** ३९. (फा.) व्यर्थ.

**नादर** ४२ (फा.) कंगाल; दीनवाण.

**नादान** ३६. (फा ) कुचकामी.

**नामी** २३,२६ (फा.) नामांकित.

**नावेक** ९. क्षणभर; काही वेळ.

**निका** ७; ११. चांगला.

**निटळु** १४ स्पष्ट; स्वच्छ.

**निडळ** ९. (सं. निटिल) कपाळ.

**निधावणें** १२. त्रासणे.

**निभार्छिणें** १३. छेडणें, निर्भत्सना करणें.

**निमक** २४. (फा.) मीठ

**निमा** ३१ (फा.) आंतून घाल-ण्याचा अर्धा अगरखा.

**निर्गमून टाकणें** ३७. निकालांत काढणें.

**निर्वचु** ९. निवाडा; खुलासा.

**निरख** २१. (फा.) दर; भाव.

**निरपौनि** ८. निपटून; संपूर्ण.

**निरवणूक** ९ निरवानिरव.

**निशा अकताला** २६. (फा. निशा = कैफ; ताल = दैव.)
**निशाण** २६, २८, २९. ध्वज
**निशाण** ५२. चिन्ह; खूण.
**निशाण** २१. नेमबाजी.
**निसबत** ३१. (फा.) च्या तर्फे.
**निसूर** ३५. (फा.) निष्काळजी.
**निक्षेप करणें** ७, ८. पुरणें, मूठमाती देणे.
**नीच** ७ (सं. नित्य).
**नेकजात** २४. (फा.) अभिजात; शीलवान.
**नेणारू** १८. नेणता; अज्ञ.
**नेमस्त** १३; ३४. (सं. नियमस्थ) नेमके; निश्चित.
**नौबत** ३१. (फा.) डंका.
**पंचगी** १७ पचंगी; पाठपोट झाकेल असे वस्त्र; धोतराची कांस
**पटिसाळ** ८ (सं. प्रतिशाला) पडशाळा; ओवरी.
**पटेल** २६. पाटील.
**पडाळ** १२ गुरे बांधण्याची छपरी.
**पडिताळणें** ८. विचारपूस करणें; समाचार घेणें.
**पढियें** ११. प्रिय.
**पत या तेज** ४९. (सं. प्रतिष्ठाम. पत +फा. 'या' = किंवा,+ सं. तेज.).
**पथके** ४८. पथकमुख्य.
**पन्हरें** ७. सोनें.
**पऱ्हीवा** ८. (सं. प्रवाह) पाट. (पहा–ज्ञानेश्वरी १३–५६२).
**परवर दिगार.** २६. (फा.) पालनकर्ता; ईश्वर.
**परावर्ण** १० (स. प्रावर्ण) पांघरूण; आच्छादन.
**परिच्छिन्न** ६८. निःसदेहपणे.
**परिश्रय** १०. शौच; मलविसर्जन.
**परिहार** ९. निर्वाळा; निरसन.
**पशमी** ३३. (फा.) लोकरी वस्त्र.
**पसीम** १० (सं. पश्चिम.).
**पस्यातपाहार** १० (सं. पश्यत् प्रहर) पहांटेचा प्रहर.
**पहुड** ७; १० निद्रा; आडवें होणें-
**पळपळीतु** ११ पोळलेला; त्रस्त.
**पाइक** ७; १०. १२, १३. पायदळांतील शिपाई; सेवक.
**पाक** ५२. (सं. पक्व;) स्वयंपाक, राधण.
**पाख** ७. (सं पक्ष) पधरवडा.
**पाखारिला** ११. झूल घातलेला; शृगांरलेला.
**पाखाळु** १२. राजदंड; शिक्षा.
**पाग** ९. पागोटें.
**पागा** २२, २३. (फा.) अश्वशाला; रिसाला.

**पागे** ५२. ( फा. ) रिसाल्याचे अधिकारी.

**पाटबाज** ९. नवारीची खाट.

**पाठवणी** ८. निरोप; जाण्याविषयी आज्ञा.

**पांडरी** ४. ग्रामसंस्था; गावठाण.

**पाडु** ११. पाड; योग्यता.

**पांढ(ड)र** ४,१५. पाढरी जमीन; गावठाण.

**पाणिपात्र** ७. (सं.) ओंजळ; भिक्षा.

**पादशाहात** २२. (फा.) अधि-राज्य; साम्राज्य.

**पानद** ८.दोन शेतांतून जाणारी अरुंद वाट. (ज्ञानेश्वरी १६–१८८).

**पायरव** ५० शिरकाव; चंचुप्रवेश.

**पायेवणी** ९ चरणतीर्थ.

**पारपत्य** ४०. व्यवस्था. ५२.शिक्षा.

**पारिसें** १२. शिळे.

**पालमंडें** १०. पात्रविशेष; ताम्हन.

**पालव** १०. पदर.

**पालवी** ८. (सं. पल्लव ) शाखा; खांदी.

**पालाण** २८. (फा.) खोगीर.

**पावखलक** ३५. पायदळ.

**पास** १२. वखर; कुळव.

**पाहातपटी** १०. पहांट.

**पाळी** ११. (क. पळ्ळी) चालतें (Nomadic) गांव. किंवा वसति.

**पिनाकपाणी** २७. (सं.) शंकर.

**पींढें** १२. पाट.

**पीलबाला** २८. हत्तीसारख्या धिप्पाड बांध्याचा.

**पुडती** ९. (सं. पुरतस्) पुनः.

**पुडूवाटोवा** १०. (पुडु + वाटोवा) विडयाच्या पानाची करंडी व बटवा, झोळणा.

**पूर** ८. शरीर.

**पूत** ७. (स. पुत्र).

**पुंस** १२. (स पुच्छ.).

**पेंच** ४६. तेढ.

**पेणें** ७; ९. ( सं. प्रयाग ? ) मुक्काम; टप्पा.

**पेहें** १२. स्तन्य; दूध.

**पैक** ४. पैका; द्रव्य.

**पौळी** ८. आवार; तट.

**फरासीस** ३३. फरेंच लोक.

**फांकणी** ९. विभागणी ; फाटाफूट.

**फारीक** ३३. ( फा. ) पावता; चुकता.

**फाळ** १२. नांगर.

**फाळुकें** ११. वस्त्र; कापड.

**फितूर** ३०. ( फा. ) कारस्थान.

**फिरंगी** ३३.( इं. फरँक) पोर्चुगीज लोक.

**फुटा** ६,८,९. ( सं.. पट ) वस्त्र.
**बा**. ५४. 'बरोबर' याचा संक्षेप.
**बखर** ( फा ) इतिहास; हकीगत.
**बटिक** ११. क्षुद्र, सामान्य मनुष्य.
**बडूवू** ७. चाकर; बडवा.
**बंदगी** १५. (फा.) सलाम; मुजरा.
**बंदा** १५. (फा.) गुलाम; दास.
**बंदेनवाज** १५. ( फा. ) दासानें केलेली स्तुति.
**बरवें** १३,१४. (सं .वरम्) चांगले; सुदर.
**बस्तन** ५२. ( फा. ) ताळा.
**बहीरवास** १०,११ बाहेरील वस्त्र.
**बळगें** २६. भिकार, टाकाऊ.
**बळवंडें** ९. बळेच, मुद्दाम.
**बळिवाडें** १४. मुद्दाम.
**बाजी** ३९. बाजू, डाव.
**बाढ** २५, २६. कनाथ.
**बादली** १९. ( फा. ) भरजरी.
**बार** २८. ( फा. ) घोडा.
**बारगीर** २६. ( फा. ) धन्याच्या घोड्यावरील स्वार–शिपाई.
**बाहीरवाहिरीं** ९.बाहेरच्या बाहेर.
**बिचवा** २७. (फा.) लहान बिन-खांबी तंबू.
**बिछायत** २५. (फा. ) बैठक.
**बिढार** ७, ११, १२ बिऱ्हाड; वसति.
**बितपशील** १५.(फा.) तपशीलवार.
**बिरूद** २०. (सं. विरुद ) मान-चिन्ह, भूषण.
**बीजें करणें** ६, ७, ८. (सं. व्रज्) जाणे.
**बुडडें** ७. एक खाद्य.
**बुणगे** २६. (फा. ) सैन्याबरोबरचे बिनलढाऊ लोक.
**बुंथी** ९, १२. बुरखा; डोक्यावरून घेतलेला पदर.
**बेगमी** ३५. फा. पुरवठा, संग्रह.
**बेतऱ्हा** २९. (फा.) तऱ्हेवाइक; विलक्षण.
**बेनिगा** २३. (फा.) दुर्लक्ष; निष्काळजीपणा.
**बेमुबलक** २४. ( फा. ) असख्य.
**बेरोजगारी** ५३. (फा ) बेकारी.
**बैठी** ३५. मुक्काम.
**बैलौरें** ८. (क. बॅल–ऊरु ? ) उघड्या माळावरील तात्पुरती वसति, अनिकेत भटक्ये ..... ?
**बैसकारु** ६. आदरसत्कार.
**बोडी** ११. डबकें.
**बौलें** ८. बोहलें.
**भणौनि** ६. (सं. भण्) म्हणून.
**भंदें** ११. पसरट भांडें; परात.
**भनंग** ९. भणंग; भिकारी.
**भाजनु** ६. पात्र; भांडें.

**भातारु** ९. नवरा
**भाळीं** ११. (सं. भाल) कपाळ.
**भावार्थी** १४. भाविक; श्रद्धाळू.
**भास** १४. (सं. भाषा).
**भिक्षा करणें** ९.अनुग्रह, उपदेश घेणे.
**भीतुर-रीं** ६,१४. (स. अभ्यन्तर) आंत; मध्ये
**भुलटा** १७ चुरा.
**भेली** ८. खडा.
**मजकूर** २५, २७ (फा )किमत. पाड, विचार.
**मजकूर** १५ (फा.) उपर्युक्त.
**मजरा होणें** ३६. (फा ) भागणें; निभावणें.
**मजल दर मजल** २६. ( फा. ) सारख्या मजला मारीत.
**माधिमा** १४. ( सं. मध्यम ).
**मनसुबा-बी** २१,४६,५६ (फा.) विचार; ठराव; कारस्थान.
**मना** २६, २८, ५५. (फा.) प्रतिबंध; विरोध.
**मर्दानकी** ४६. (फा.) शौर्य.
**मरदो (दु) मी** २७, २८(फा.) शौर्य.
**मरकाढी** १२. असाध्य; मरणानेंच सुटणारा.
**मरफा** ३१. (फा.) एक प्रकारचा नगारा.
**मवजूद** ५६ (फा ) तयार, हजर.
**मवणें** २. (स. मा) मोजणे
**मवासा** ५४. (फा.) लुटारू, पुड.
**मशहूर** ३४.(फा.)प्रसिद्ध, मान्य.
**मसलत** २४, २६, ५२. (फा ) कारस्थान, धोरण.
**महाछाव** ६ (स महोत्सव).
**महाजन** ८. (सं ) न्यायाधिकारी.
**महाल** १९, २१. (फा ) खाते.
**मा** १२ मग.
**मागती-मागौतें** २६,२९,४२,५५. पुनः
**माज** १७, १८. (सं. मध्य) कंबर.
**मातंग** ८ (स.) माग.
**मातबर** २२, २३, २८, २९, ४८, ५३. (फा.) श्रेष्ठ; थोर.
**मादणें** ८. (सं. मर्दन) उष्णोदकाचें स्नान.
**मानकुलें** ७. माणके.
**माबजत** ५३. (फा.) बंदोबस्त; सांभाळणी.
**माळवध** १२. माळवदी घर.
**माळा** १२. शेतांतील पांखरें हांकण्याची जागा.
**माळेकार** १२. माळ्यावरून राखण करणारा.
**मुखजबानी** ५४. (सं.+फा ) तोंडीं निरोप.

**मुतालिक** ३३. (फा.) प्रतिनिधि.
**मुदारत** ३१. (फा.) संभावना; बरदास्त.
**मुदी** ९ (सं मुद्रिका) वेणीतील मूद.
**मुरक्का** ५३. (फा.) बांधीव पुस्तक; आलबम.
**मुरदा** २६, २८, ३०. (फा) प्रेत.
**मुलाहिजा** ३६, (फा) उपेक्षा; पर्वा.
**मुसवर--री** ५३. (फा.) चित्रकार; चित्रकला.
**मुस्तेदी** १८. (फा.) मजबुती; तयारी
**मुक्ष** ८. (स मुख्य).
**मेटें** १५. चौकी, पहाऱ्याची जागा.
**मेहमानी** २०,३३ (फा.). पाहुणचार.
**मेहरी** ८. बाई.
**मैशी** ५७. शाई.
**मोकळणें** ११. (मुञ्च्) सोडून देणें.
**मोट** ७. शिदोरी; अन्नाचें गांठोडें.
**मोबारीं** ३३. (फा.) तोंडी.
**मोमा** १०. मुका; चुबन.
**मोहर-रा** ११. (सं. मुखर) सन्मुख; समोर.
**मोहरा** २५. (फा.) शरीराची ठेवण.
**मोहाछाव** ३८. (सं. महोत्सव).
**यंत्र** २८,३२ (सं.) तोफ.
**यमकोंड** १४ नरक. Hell.
**यादी** ३५ (फा) स्मरण; सावधानता.
**यार** २६ (फा) हत्तीसह लढणारा भालाईत.
**रक्कम** ५६. (फा.) कलम, बाब.
**रंजक उडणें** २८. (फा. रंजक = ठासण्याची दारू). तोफाची फैर झडणे.
**रंजीस** ३४. (फा.) त्रस्त; असतुष्ट.
**रणखुंदल** २६ धुमश्चक्री, मारहाण.
**रवण** ११ विस्तीर्ण जागा.
**रंवदळा रंवदळ** २८. मारामारी; तुडवातुडव.
**रसद्-रस्त** २४,४८. (फा.) युद्धोपयोगी सामग्री.
**राउत** ७ घोडेस्वार.
**राउल-ळ** ७, १३. राजवाडा.
**राउल** २. राजाचा वाटा, भाग.
**राखण** ९. (सं. रक्ष्) लक्ष्; पाळत.
**रांगवळी** ११. रागोळी उमटेल असा सांपळा.
**रांड** ११; २६. विधवा.
**राणी** ९. (सं. रजनी) रात्र.

**रातणें** १३. (सं. रंज्-रक्त) अनुरक्त असणें.
**रातीब** ३५. (फा.) खुराक.
**रांधवण** ७. (सं. रंधस्) स्वयंपाक.
**राबता** १८. (फा.) ये-जा; वर्दळ
**रायांगण** १०. मठाचें प्रांगण.
**रिघणें** ६ प्रवेश करणे.
**रि** ४. (सं. रीति).
**रुईरुई** १५. कशीबशी; जेमतेम.
**रेकला** २८ एक प्रकारची तोफ.
**रेच** २६ (फा.) प्रतिष्ठा, नक्षा
**रेंदाचेंदा** ११ रूक्षान्न, शिळेंपाकें.
**रोखा** ३५ (फा रुक्आ) पत्र.
**रोजमुरा** ३० (फा) दिवसाची मजुरी
**रोवणें** ७, १०. रवथ करणे.
**रोशन** १५ विदित, श्रुत.
**लगामीं** ४९ (फा) स्वाधीन.
**लगी** ३१ निशाण, पताका.
**लवण** १२ वाकण, वळण.
**लाइलाज** ४८. नाइलाज
**लितणें** १२ चिकटणें, माखणें.
**लेकिन** ५६. (फा.) परंतु.
**लेप** ११ चित्र.
**लोखंडें** १२. शेतीची अवजारें.
**ल्याख** ३७. (फा.) लायक, योग्य.
**वखर** १२. जमीन सारखी करण्याचें औत.
**वजनी** ४४. (फा.) तोलण्याचा हिशेब.
**वटोवटो** ११ वटवट; बडबड.
**वरकड** ३०, ३१, ३३, ३५, ५५. इतर.
**वरात** ३६. (फा.) हुंडी.
**वरावर्द** ४४. (फा) हिशेब; अंदाज.
**वरिष-दीस** ९. वर्ष सहा महिने.
**वऱ्हाड** ८. लग्नकार्य.
**वलंदेज** ३३. (इं हॉलडर्स?) डच लोक.
**वस्तु** १४. (स) कथा.
**वळिवट** ८ वळीव पदार्थ; शेवया; गव्हले.
**वाखारी** ७. भाडारातील नगद शिल्लक.
**वागारा** ११. लगाम.
**वांजेल** १४. (इं एंजल) देवदूत.
**वाण** २६ (स. उपायन) व्रत; नियम.
**वानरतेल** २८. अविचारामुळें होणारा सर्व नाश. (टीपा पहा).
**वानेर** १२. रानगवत.
**वाळसरा** १३. वाळवंट.
**विखो** ११, १२. (सं. विषय).
**वितान** १९. चांदवा; छत.
**विभाग** ९. मृत्यु.
**विला (य) त** ३५. प्रदेश; प्रांत.

**विल्हे** ३५. व्यवस्था.

**विवरू** ४. विवरण ; तपशील.

**विव ( वि ) क्षा** ६, ३२.स्पष्टीकरण.

**विवळणें** १२. उजाडणें.

**विवेकु** १४. विवेचन.

**विहिणें** ९. आज्ञा करणें ; आदेश देणें.

**वीरु** ११,१३. ( सं. वैर ).

**वीसोवा** २. विसावा भाग

**वीळवेऱ्हीं** ७, ९. सायंकाळपर्यन्त.

**वीळीचा** ७; ९, १२. सायंकाळीं.

**वेकास जाणें** ९. उणें अधिक बोलणे.

**वेंचला** १२. मग्न, व्याप्त.

**वेंझ** १२. धडक; टक्कर.

**वेढे करणें** १० फेऱ्या घालणें.

**वेतसी** ३२. वेत.

**ेत्यास** ५६ (सं. व्यत्यास) अंतर; व्यत्यय

**वेऱ्हां-रीं** १४. पर्यत.

**वेव्हारा** ९, १२. (सं. व्यवहारक) सावकार; व्यापारी.

**वोखटे** ९; १३. वाईट; दोष; अपकृत्य.

**वोलि** ८; ११. तलम रेशमी वस्त्र.

**वोवर** ५. ओवरी; खोली.

**वोवांडणें** १२. झुकणें; वळणें.

**वोहर** ८; १२. (स. वधूवर).

**वोळगणें** १२ सेवा करणें.

**व्याळी** ७; ८. सायंकाळचें जेवण.

**शर्थ** २४, २७, २८. पराकाष्टा; कसोशी.

**शह** ४८. (फा.) चढाई.

**शहरपन्हा** ४८. ( फा. ) तटबंदी; कोट.

**शाका** २६. ( फा. ) कत्तल; हत्या.

**शाखामृग** १३. झाडांच्या शाखां-वरून वावरणारा वनचर.

**शादी** ३१. (फा.) विवाहसमारंभ

**शाहाजणें** २६, २८. ( फा. ) मोठा नगारा.

**शिरपेंच** १९. पागोटयावरील अलंकार.

**शिष्यमंडळी** ५२. पाणके, वाढपी. इ.

**शेकदार** १५. (फा.) वसुली कामदार.

**शोधनी** ९. चौकशी.

**श्रवण** ९. उपदेश.

**श्वानकुंडली** ११. कुत्र्याप्रमाणें पाय पोटाशी घेऊन निजणें.

**सख्त-ख्ती** ४८. ( फा.) कडक; निकरानें.

**संगडें** १४. योगानें ; साधनानें.

**सतानीक**. ८. शतायुषी–? ( प्रो. कोलते ).

**सत्र** ३. (सं. छत्र).

**सद्र** १८. (फा.) राजसभामंडप.
**संधी** ३७ (सं.) सलोखा; तह.
**सफेजंगी** ४८ (फा) खडाजंगी; घनघोर युद्ध.
**सर** (कारकून) २२. प्रमुख; मुख्य.
**सरखेल** ३१. (फा) सेनापति. (आंग्रे यांचा किताब).
**सरंजाम** ३१. (फा.) साधन-सामुग्री; व्यवस्था.
**सरणें** ८. मरणें.
**सलाम** १५. (फा.) वंदन.
**सलूख** २७. सख्य; सलोखा.
**सल्ला** २८. (फा) तह; सामोपचार.
**सव** ८. (सं. शव) प्रेत.
**सवी** ६. शिवी.
**सवे** ११, १२. संवय.
**सवेंचि** ९. पाठोपाठ; लगोलग.
**साइली** १२. सावली.
**साउमा** ९, ७, १०, ११, १२. सामोरा.
**साउला** ८, ९. वस्त्र.
**साकवती** १०. पालेभाजी.
**सांगड** ८. सांठवणीचें भांडें.
**सागळ** १०. कापडाचें केलेलें भांडें.
**सांगाती** १३. सोबती; मित्र.
**साचोकारें** ८ खरोखर.
**सांट** १४. (इं. सेंट) सत.
**सांडणी स्वार** ३१. उंटिणीवर बसून डाक पोंचविणारा.
**साडे** ८. लग्नानंतर ऐरणी पूजनाच्या वेळी वधूवरास वस्त्रें देण्याचा सोहळा.
**सादृष्ट** १४. साक्षात्.
**साद्रउ** १२. आर्द्र, रसमय.
**सापटें** १२. जीर्ण वस्त्र.
**सांपु** १४. साप्रत; वर्तमान.
**साफ** २६. (फा.) स्पष्ट; सरळ.
**सामक** १०. सामवेद गायक.
**सारी** ७ सारीपाट; सोंगट्या.
**सावळें** २६. सोवळे वस्त्र.
**साहेब नौबत** ३१. (फा) हत्ती-वरील मोठा डंका.
**सिडी** ११. विषय–पदार्थ-शून्य खेडें.
**सीक** ८. (सं. शिक्षा).
**सीलिका** १०. (सं. शलाका) काडी.
**सींव** ७. (सं. सीमा) शीव.
**सुचीक** ९. सूचना ; इशारा.
**सुडा** ७, ३५. चार हातांचें वस्त्र.
**सुणें** १२. घालणें.
**सुतरनाल** २६, २८. उंटावरील तोफ.
**सुतरस्वार** ३१. उंटावरील स्वार.

**सुत्ताले** १. ( क. ) ओवऱ्या व सभोंवतींचा तट.

**सुध** १४. (सं. शुद्ध).

**सुपवती** ७. गादी.

**सुभेमामले** १९. ( फा. ) प्रांताचे वसुलाधिकारी.

**सुरत** १७. (फा.) प्रतिमा; चित्र.

**सुरतपाक** २५. (फा.) देखणा.

**सुवेळें** १० सोवळें.

**सूजगरें** (होणें) १०. जागें होणें.

**सेंगुळें** ७. डाळीच्या भरड्याचे मुटके.

**सेजिया साइालिया** १२. शेजारणी पाजारणी.

**सेतडी** १२. शेतांतील खळ्यावर जाऊन मागितलेली भिक्षा.

**सेव** ९. कण ; बारीक तुकडा.

**सोखन** ९. (सं. शोषण) उपोषण.

**सोनेसळा** ८. रेशमी सोनेरी वस्त्र.

**स्छल-ळ** ३,४७. (सं. स्थल).

**स्याले** १०. (सं. शीतकाल) थंडीचे दिवस.

**हजरत पन्हा** २४. (फा.)आश्रयदाता; स्वामी.

**हमेषा** २६,५३. (फा.) नेहमीं.

**हरामजादा** १५. ( फा. ) स्वामिद्रोही.

**हरामी** २६. (फा.) कपटी; दुष्ट.

**हशील-कलम** २३. ( फा. ) तात्पर्यार्थ; मतलब.

**हस्तनाल** २८. ( सं. + फा. ) हत्तीवरील तोफ.

**हलभल** ३७. भीतिग्रस्तता ; अगतिकता.

**हाकारा** ९. हांक; बोलावणें.

**हारि** ७ हार; पड; माघार.

**हाल** ३५. (फा.) त्राण; सुस्थिति.

**हासिया** ५३. (फा.) किनार; कांठ.

**हालळवील्हळीं** ८. स्फुंदून स्फुदून.

**हाळियांपाळियां** ११. (क हळ्ळीपळ्ळी) खेडोपाडीं.

**हाळोहाळियां** ११. (क. हळ्ळी) खेडीपाडी.

**हुजरात** २८ (फा.) खास हुजूरची खडी फौज.

**हुन्नर** १८. (फा.) युक्ति; चमत्कार.

**हुन्नरवान** १८. (फा.) कावेबाज.

**हैवान** १८. (फा.) पशु.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | ११ | नग | नगरें |
| १० | २६ | वर्तले | निवर्तले |
| १३ | ९ | पटीसोळवरी | पटिसाळेवरी |
| १६ | ५ | चक्रधराची लेक | गोविदप्रभूची लेक |
| २३ | ९ | भग | मग |
| २८ | १६ | चादोबा | चादोवा |
| ३२ | १९ | निनलेयाही | मिनलेयाही |
| ३२ | २७ | पश्चात | पस्यात |
| ३३ | १६ | अष्टरीत | अष्ठरीत |
| ३५ | १२ | असे देव मा | असे मा |
| ५१ | १४ | दर्पेंच | दर्पोंच |
| ५१ | २२ | जांबुळरुढि | जांबुळबुढि |
| ८१ | १५ | बचेंग ता | बचेंगे तो |
| ८७ | ६ | आर | और |
| ९४ | २५ | इनाम | इमान |
| ११० | २५ | व जू | वाजूं |
| ११९ | ७ | साम | सामा |
| १२३ | ४ | सिरलकटे | सिरलकोट |
| १५४ | ७ | लग्नसिहि | लग्नसिद्धि |
| १६७ | ७ | निघावें | नेघावें |
| १६९ | ७ | चक्रश्वर | चक्रधर |
| १७० | ११ | चक्रथर | चक्रधर |
| १७२ | १ | सासीट | सासटि |

| | | | |
|---|---|---|---|
| १७२ | १४ | खेटभट | खेड्भट |
| १७२ | २२ | गोदिदप्रभु | गोविंदप्रभु |
| १७६ | ७ | पाहिलें | प'हिलें |
| १७६ | १९ | पदन | पदन |
| १७९ | १९ | उद्धवण | उद्धरण |
| १८२ | १३ | वाडवीती ताळी | वोडवीति ना |
| १८३ | ७ | toxtus | textus |
| १८७ | २४ | नसून | बसून |
| १८८ | १३ | निश्चलपुरी नांवाच्या | —पंडितानें |
| १९२ | ७ | पीळबाळा | पीलबाला |
| १९२ | २४ | मानानेंच | नानानेंच |
| १९२ | २६ | आत्मचरित्र्यांत | आत्मचरित्रांत |
| १९३ | ५ | अंबळा | चंबळा |